A

# MANUAL OF HINDUISM

**PART 1.**

BY

BABA PADMANJI.

# हिंदुधर्माचें स्वरूप.

**भाग १.**

पुरुष जसजसा शास्त्राचा अभ्यास करितो तसतसा विशेषेंकरून ज्ञाता होतो. शास्त्राभ्यासी पुरुषाला अन्यशास्त्रीय ज्ञानही रुचतें.—**मनु.**

सर्वांची पारख करा, जें चांगलें तें धरा.—**पौल.**

BOMBAY TRACK AND BOOK SOCIETY.

Marathi 12mo Series.

**Fourth Edition.**

1000 Copies.—A. D. 1913.

**मुंबईमध्यें**

**जी. एन्. कुळकर्णी यांच्या**

"कर्नाटक" छापखान्यांत छापिलें.

# अनुक्रमणिका.

## उपोद्घात.

### खंड १–वैदिकधर्म.



### खंड २–षट्दर्शनें.

## खंड ३.–धर्मशास्त्रें.



## खंड ४.–ऐतिहासिक काव्यें.

### रामायण आणि महाभारत.



## खंड ५.–पुराणें.

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

ह्या ग्रंथाचे दोन भाग केले आहेत; प्रथम भागांत हिंदुधर्माचें स्वरूप वेदशास्त्रादि ग्रंथांत दृष्टीस पडतें तें दाखविलें आहे. दुसऱ्या भागांत तो धर्म लोकाचार, धर्मकर्मे व भक्ति यांत जसा दिसतो तसा दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे. हा समग्र ग्रंथ काशीचे ख्रिस्ती पंडित रेव० नेहमया नीलकंठशास्त्री गोरे [किंवा आमचे नवीन ख्रिस्ती बंधु पंडित नारायण वामन टिळक] यांच्यासारख्या जाडया विद्वानांनीं लिहिला असता तर ह्याची रचना उत्कृष्ट झाली असती. परंतु ज्या अर्थी हें काम ही प्रस्तावना लिहिणाराकडे मुंबईच्या त्राक्ट सोसैटीनें सोपिलें, त्या अर्थी त्यानें आपल्या सामर्थ्यानुसार याची रचना केली आहे. यांत जे विषय आले आहेत ते ग्रंथाधाराशिवाय घेतले नाहींत; केवळ कुलाचार व रूढी यांचें वर्णन लेखी आधारानें करितां आलें नाहीं. हिंदु लोकांचे कुलाचार व रूढि हीं सर्वत्र समान नसून त्या सर्वांची खरी व पूर्ण माहिती एका मनुष्याला किंवा एका स्थळीं मिळणें अशक्य आहे.

ह्या पुस्तकास कित्येक मित्रांनीं उदार बुद्धीनें अनेकप्रकारें सहाय केलें, त्याबद्दल पुस्तककर्त्ता त्यांचा फार आभारी आहे. पुस्तककर्त्याचे विद्या व धर्मगुरु रेव० डाक्तर नारायण शेषाद्री, त्याचे सहाध्यायी व प्रिय मित्र रा० जनार्दन रामचंद्रजी, व पंडित नारायण केशव वैद्य यांनीं आपल्या जवळचीं व दुसऱ्यापासून मागून आणलेलीं पुस्तकें दिलीं.

रेव० ल्युकास मलोबा जोशी व मि० बाबाजी शिवराम भोसले यांनीं कांहीं विषय लिहून पाठविले. तसेंच कित्येक सुज्ञ व सन्मान्य हिंदु छापखानेवाले व उदार मनाचे ब्राह्मण बुकसेलर यांनीं विक्रीचे मोठया किंमतीचे व सोंवळ्यांत वाचायाचे ग्रंथ पाहावयास दिले; इतकेंच नाहीं, तर कित्येकांनीं ह्या पुस्तकाची समाप्ति होईपर्यंत ते त्याच्यापाशीं मेहरबानीनें राहूं दिले. ही गोष्ट एका अर्थानें आश्चर्य मानण्याजोगी आहे, कारण कित्येक कर्मठ लोक आपले धर्मग्रंथ दुसऱ्यास दाखवित नसतात, आणि तशांत धर्मांतर केलेल्या मनुष्याचा तर त्यांला स्पर्श होऊं देत नाहींत. एका हिंदु गृहस्थानें आह्मांस असें सांगितलें कीं, त्याला अशा प्रकारचें पुस्तक रचण्याची इच्छा होऊन कांहीं ग्रंथांची गरज लागली असतां त्याच्या स्वतांच्या चुलत्यापाशीं जे ग्रंथ होते ते पाहायास मिळाले नाहींत. अशा काकाजींनीं ख्रिस्ती मनुष्याला तर त्यांचें दर्शनही होऊं दिलें नसतें !

---

## तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

ह्या पुस्तकाची तिसरी आवृत्ति छापण्याचा ठराव मुं० त्रा० सोसायटीनें केल्यावर तींत कांहीं फेरफार करण्यास ग्रंथकर्त्यास फारच थोडा अवकाश मिळाला. तेवढया अवकाशांत पूर्वींची कांहीं सिद्धता व सामग्री नसतां जितकी करवेल तितकी सुधारणा केली आहे. तिचा सर्व तपशील न सांगतां जे नवीन ठळक विषय ह्यांत घातले आहेत ते मात्र सांगतों. ( १ ) **पहिल्या भागांत** दुसऱ्या खंडांत "अनु-

गीता " हें एक नवीन प्रकरण. (२) भगवद्गीतेच्या प्रकरणांत कांहीं भर. (३) तिसऱ्या खंडांत मनुस्मृतींतील कांहीं जास्त उतारे. (४) पांचव्या खंडांत बौद्ध व जैनधर्म यांविषयीं विशेष माहिती. (५) उपसंहारांत कांहीं फेरफार. (६) ख्रिस्ती धर्माविषयींचे प्रकरणाचें नांव बदलून त्यास दुसऱ्या भागांतील त्याच विषयाच्या प्रकरणाचें नांव दिलें आहे. (७) सूचीपत्रांतील विषयांची संख्या वाढविली आहे. **दुसऱ्या भागांत** जे नवीन विषय घातले आहेत ते येणेंप्रमाणें:—(१) गायत्री मंत्राचे अर्थ. (२) "संध्या व वैश्वदेव" यांतील कित्येक मंत्रांचें भाषांतर. (३) अधिक मास. (४) "श्राद्ध" प्रकरणांत कांहीं भर. (५) "पंथांच्या" प्रकरणांत वल्लभाचारी पंथाचे गुरू, व रामानुज यांविषयीं विशेष माहिती. (६) नानकपंथाविषयीं नवीन प्रकरण. (७) "संतभक्ति" या प्रकरणांत कांहीं भर. (८) पुरवणींत "खंडोबाच्या लवाजम्याची हकीकत." (९) उपसंहारांत कांहीं फेरफार. (१०) "ख्रिस्ती धर्माचें स्वरूप" यांत कांहीं भर.

ह्या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीस ज्या मित्रांनीं पुस्तकद्वारें सहाय केलें त्यांपैकीं कित्येकांचीं नांवें त्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत सांगितलीं आहेत. एथें इतकेंच सांगणें अवश्य दिसतें कीं, त्या मित्रांपैकीं दोघे खेरीज करून बाकीचे सर्व परलोकवासी झाले आहेत, तथापि त्यांच्या प्रीतीचें, स्नेहाचें व उपकारांचें स्मरण माझ्या मनांतून नष्ट झालें नाहीं.

ह्या पुस्तकाची प्रथमावृत्ति बाहेर पडली तेव्हां त्याजविषयीं वर्त्तमानपत्रकर्त्यांनीं व हिंदु ख्रिस्ती मित्रांनीं जे अभिप्राय दिले होते ते ऐथें उतरून घेतां आले नाहींत, कारण त्यांचा मीं पृथक् संग्रह करून ठेविला नाहीं. बहुतेक अ-

भिप्राय खासगत पत्रद्वारें मिळाले होते, व तीं पत्रें आतां माझ्या हजारों पत्रांच्या पुडक्यांतून धुंडाळून काढणें सोपें नाहीं. तथापि एक विद्वान् व समान्य गृहस्थ एका सभेंत एकदां जें याजविषयीं बोलले होते, तें एथें स्मरणांतून सांगतों. ते ह्मणाले कीं, सांप्रतकाळीं आमच्या तरुण (हिंदु) मंडळींत हिंदुधर्माचें ज्ञान उत्तरोत्तर कमी होत चाललें आहे, व शेवटीं आह्मांला तें प्राप्त करून घेण्याकरितां "हिंदुधर्माचें स्वरूप" ह्या ग्रंथाकडे जावें लागेल, हे भाषणकर्ते मुंबईतील एलफिन्स्तन हायस्कुलाचे माजी प्रिन्सिपाल प० वा० रा० रा० वामनराव आबाजी मोडक हे होत.

ह्या अभिप्रायांच्या संबंधानें आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं, युरोपांतील बेलजियम व फ्रान्स ह्या देशांतील दोघां विद्वानांनीं ह्या ग्रंथाविषयीं मला पत्रें पाठविलीं. एकाचें पत्र इंग्रेजींत व दुसऱ्याचें फ्रेंच भाषेंत होतें. एकानें ह्याची एक प्रत स्वदेशांतच संपादून त्याच्याविषयीं एका फ्रेंच मासिकांत स्वाभिप्राय प्रगट केला होता. (ह्या मासिकाची एक प्रत एथें मला एका मित्रानें मिळवून दिली आहे.) दुसऱ्यानें ह्याची एक प्रत माझ्याकडून मागविली व तिच्या मोबदला आपण प्रकाशित केलेल्या संस्कृत—फ्रेंच सटीक "वृद्धचाणाख्य" नामक ग्रंथाची एक प्रत पाठविली. पत्रांत असा अभिप्राय होता कीं, हें पुस्तक वाचल्यापासून आपल्यास हिंदुधर्माचें जसें ज्ञान झालें तसें पूर्वी कोणत्याही पुस्तकावरून झालें नव्हतें. याप्रमाणें परदेशीय लोक हिंदु वगैरे परकीयांचे धर्माचें ज्ञान प्राप्त करून घेण्याविषयीं उत्सुक असून प्रयत्नही करितात. आमच्या लोकांपैकीं किती जणांस ख्रिस्ती, महंमदी, पारशी वगैरे धर्मांची व धर्मग्रंथांची

माहिती करून घेण्याची इच्छा असते व ती पूर्ण करून घेण्याविषयीं ते काय प्रयत्न करितात ?

हें पुस्तक मिशनांच्या कित्येक ईश्वरविद्येच्या पाठशाळांत व वर्गांत शिकवितात, व देशी मिशन कामदारांच्या परिक्षेच्या विषयांत याचें नांव नमूद केल्याचें समजतें. याचप्रमाणें परदेशीय मिशनरींच्या मराठी परिक्षेंतही याची योजना करावी व मिशन हायस्कुलांतही वरच्या वर्गांस तें शिकवावें अशी माझी सूचना आहे. शिक्षणाच्या कामीं ह्याचा उपयोग केला जाईल असें आरंभीं माझ्या ध्यानीं आलें नव्हतें, नाहीं तर विद्यार्थ्यांच्या विशेष उपयोगी पडावें अशी याची रचना केली असती.

ह्या पुस्तकाच्या प्रथम भागाचें गुजराथी भाषांतर झालें आहे, व इंग्रजींतही तें व्हावें अशी फादर नीळकंठ शास्त्री गोरे यांच्या इंग्रेजी चरित्रांत त्याच्या विद्वान् कर्त्यानें सूचना केली आहे. असें झाल्यास हिंदुस्थानांतील इतर भाषांत त्याचा तर्जुमा होण्यास मार्ग मोकळा होईल.

शेवटीं, परमेश्वरापाशीं माझी हीच प्रार्थना आहे कीं, जसा त्यानें ह्या पुस्तकाच्या दोन आवृत्तींस आशीर्वाद दिला तसा ह्या आवृत्तीसही देऊन ती माझ्या देशबांधवांमध्यें जे सत्यार्थि आहेत त्यांस मार्गदर्शक होऊन व जो "**मार्ग सत्य व जीवन** आहे" त्याकडे नेण्यास कांहीं अंशीं कारणीभूत व्हावी.

ग्रांटरोड,
मुंबई; जून, १९०१.

**बाबा पदमनजी.**

ता० क०—वरील मजकूर कंपोज झाल्यावर, मी आपल्या जुन्या पत्रांचें एक पुडकें उघडून पाहिलें, त्यांत त्या फ्रेंच गृहस्थांच्या पत्रांपैकीं एकाचें पत्र सुदैवानें मिळालें, व त्या सोबत त्या पत्राचें इंग्लिश भाषांतरही मिळालें. हें भाषांतर माझे प्रिय ख्रिस्ती बंधु रेव० माणिकजी मोदी यांची विद्वान् पत्नी मिसेस तेरेझा मोदी यांनीं माझ्या विनंतीवरून केलें होतें. ( ही प्रिय बहीण आतां प्रभुपाशीं गेली आहे ), तें खालीं उतरून घेतलें आहे. त्याचें मराठी भाषांतर दिलें नाहीं, केवळ पत्र लिहिणाराचें नांव वगैरे सांगतों:—नांव, दाक्तर ए. लिपि-टर, प्रोफेसर आफ् कंप्यारेटिव फायलॉलॉजी; गांव, लायन ( फ्रान्स ); ता० ९ आक्टोबर, १८९१. दुसऱ्या गृहस्थाचें पत्र शोधांतीं मिळाल्यास तें दुसऱ्या भागाच्या पुरवणींत दाखल करण्यांत येईल. त्यांचा छापील अभिप्राय एका फ्रेंच मासिकांत आहे, पण त्याचें भाषांतर करायास आतां अव-काश नाहीं.

---

## फ्रेंच पत्राचें इंग्लिश भाषांतर.

*Lyon, October 9, 1891.*

Honoured Sir,

The work that you have been kind enough to send me, arrived at my address during the vacation, that is to say at a time when I was travelling as a relaxation from intellectual labours. I was not therefore able to

attend to it immediately, and to reply as soon as I could have wished. Now that I have been able to go through it, I must thank you in the first place for the gift that you have favoured me with. Secondly, I will offer you my warmest congratulations on the manner in which you make your readers comprehend what Hinduism is. Your summary of the literary history of your country is as complete as possible in a work of limited size. But what I particularly like in this work is the picture that you have traced of the Hindu institutions. You have given us, better than any one else, a graphic and faithful picture of the manners and customs of your country. I have been happy in learning in your school what Brahmin life is, what are the festivals of your country, and the worship of the gods, with many other interesting things.

I hope to be able to send you later on a work on India, when I shall feel myself sufficiently able to give my ideas on that subject. In the meantime, until I can thus testify to you my gratitude, I beg you to accept, honoured Sir, my grateful and warm regards.

Yours,

DOCTOR A. LEPITRE,

Professor of Comparative Philology.

---

ह्या पुस्तकाचें इंग्लिश भाषांतर व्हावें असें एका आमच्या विद्वान् मित्रानें आपल्या एका ग्रंथांत सुचविल्याचें आह्मीं प्रस्तावनेंत सांगितलें आहे. तें लिहून गेल्यावर त्या सन्मान्य

मित्राकडून एक पत्र आलें त्यांतही ह्या गोष्टीचा उल्लेख केला आहे, त्याचा उतारा त्यांच्या पत्रांतून खालीं दिला आहे:—

## रेव० फादर गार्डनर यांच्या पत्रांतील उतारा.

*Poona City, 7th June 1901.*

* * * * *

"I am very glad that the third edition of your Manual of Hinduism" is so near its completion. I only wish you saw your way to translate it; but unless you had a publisher who would guarantee all the expenses (which he ought to do) I suppose it would be vain to wish it. Such a book is really much wanted for English readers, and has by no means been provided by European scholars.

* * * * *

Yours sincerely,
C. E. GARDNER, S. S. J. E.

# हिंदुधर्माचें स्वरूप.

## उपोद्घात.

कोणत्याही धर्माची माहिती करून घेणें असलें तर प्रथम त्या धर्माचे ग्रंथ पाहिले पाहिजेत. हिंदुधर्माचे मुख्य ग्रंथ वेद, दर्शनें, धर्मशास्त्रें, इतिहास-पुराणें व तंत्रें हे आहेत. हे सर्व ग्रंथ मूळ संस्कृत भाषेंत असून ते ईश्वरप्रणीत आहेत असें हिंदुलोक समजतात.

मुख्य ग्रंथ.

भागवतांत असें सांगितलें आहे कीं, व्यासानें वेद रचिले व त्याचे चार विभाग केले. नंतर त्यानेंच इतिहास व पुराणें रचिलीं त्यांस पांचवा वेद ह्मणतातः—“त्यानें वेद पैलास व इतरांस दिले. इतिहास व पुराणें सूताचा पिता लोमहर्षण यास दिले; नंतर हे ग्रंथ स्त्रिया व शूद्र यांस प्राप्त होणार नाहींत असा विचार मनांत येऊन त्यानें त्यांच्या करितां भारत रचिलें. तरी त्याच्या मनाचें समाधान होईना. मग तो चिंताग्रस्त होऊन सरस्वती नदीच्या तीरीं भ्रमण करीत असतां त्यास नारद भेटला, त्यानें त्याला ज्यांत वासुदेवाच्या भक्तीविषयीं विशेष असेल असा ग्रंथ रचायाची मसलत दिली. त्याप्रमाणें त्यानें भागवत रचिलें”:—

ग्रंथकार.

चातुर्होत्रं कर्म शुद्धं प्रजानां वीक्ष्य वैदिकम्।
व्यदधाद्यज्ञसंतत्यै वेदमेकं चतुर्विधम्॥
ऋग्यजुःसामाथर्वाख्या वेदाश्चत्वार उद्धृताः।
इतिहासपुराणं च पंचमो वेद उच्यते॥ इ०

(भा. १ स्कं. अ. ४ श्लो. १९–२२.)

श्रुति, स्मृति व इतिहास.

वैदिक ग्रंथांस **श्रुति** ह्मणतात; ह्या पदाच्या पोटीं मंत्र, ब्राह्मण, आरण्यकें व उपनिषदें ह्या ग्रंथांचा समावेश होतो. वेदांगें ( शिक्षा, व्याकरण, छंद, ज्योतिष, निरुक्त, सूत्रें ) व मन्वादि धर्मशास्त्रें यांस **स्मृति** ह्मणतात; रामायण व महाभारत यांस **इतिहास** ह्मणतात. त्यांच्या मागून **पुराणें** व **तंत्रें** झालीं.

ग्रंथांचा काळ.

ह्या सर्व ग्रंथांत वेद फार प्राचीन आहेत. त्यांची रचना ख्रि० पू० १५००—१२०० ह्या काळांत झाली असावी, व पुराणांचा काळ ख्रि० स० १२००—१६०० पर्यंतचा आहे असें पाश्चात्य विद्वानांचें अनुमान आहे, व ह्या मतास अर्वाचीन हिंदु विद्वानांचीही संमति आहे. प्राचीन हिंदुमताप्रमाणें वेद अनादि आहेत.

प्राचीन व अर्वाचीन धर्म.

प्राचीनकाळीं हिंदुलोकांचा वैदिक धर्म होता; ह्मणजे वेदांत वर्णिलेले इंद्र, अग्नि, वरुण इ० दैवतांची भक्ति ते यज्ञद्वारें करीत असत. अर्वाचीनकाळच्या हिंदुधर्मांत देव व देवी, अनेक कर्में, व्रतें, उपवास व आचार वाढले आहेत. त्यांत मूर्तिपूजा, ब्राह्मणांची व गाईची पूजा, जातिसंबंधी आचार तीर्थयात्रा हीं मुख्य आहेत.

ईश्वरप्राप्तीचे मार्ग.

ईश्वरप्राप्तीकरितां जे अनेक मार्ग हिंदुधर्मांत दाखविले आहेत त्यांत **ज्ञानमार्ग, योगमार्ग, कर्ममार्ग, भक्तिमार्ग** हे मुख्य आहेत. यांविषयीं हिंदुलोकांचा समज असा आहे कीं, हे ईश्वरप्राप्तीचे वेगळे वेगळे पर्याय आहेत. ज्ञानमार्ग हा उत्तम व कर्ममार्ग हा कनिष्ट आहे. कोणी कोणी भक्तिमार्ग श्रेष्ठ

समजतात. ईश्वरविषयक ज्ञानाला **ब्रह्मज्ञान** ह्मणतात, व त्याच्या शिकविण्याला **ब्रह्मवाद** ह्मणतात. ह्या ज्ञानाचें बीज उपनिषदांत आहे, व त्याचा विस्तार वेदांतादि षट्द्-र्शनांत आहे. दुसऱ्याही ग्रंथकारांनीं अनेकप्रकारें त्याचें विवे-चन केलें आहे.

मुख्य धर्ममतें.

हिंदुधर्मांत तीन मुख्य मतें आहेत. ह्मणजे **वैष्णवमत, शैवमत** व **शाक्तमत**. ह्या मतांप्रमाणें विष्णु, शिव व देवी यांचे निरनिराळे अवतार मानून त्यांची उपासना चालू आहे.

पंथ.

हिंदुधर्मांत प्राचीनकाळापासून आजपर्यंत बहुत सुधार-णारे, तत्वविवेचक व धर्मोपदेशक झाले; त्यांनीं अनेक पंथ स्थापिले व आपल्या मागून आपलीं मतें चालावीं ह्मणून आपल्या उत्तराधिकाऱ्यांची, शिष्यपरंपरेची, मठांची, आश्रमांची व मूर्तींची स्थापना केली.

अनेक जन्म; कर्मविपाक.

मनुष्यास **अनेक जन्म** प्राप्त होतात व त्यांत तो पूर्व-जन्मांत केलेल्या कर्मांचें फळ भोगतो हें हिंदुशास्त्राचें एक मोठें मत आहे; तें त्याच्या नाना पंथस्थापकांनीं आदरिलें आहे इतकेंच नाहीं, तर हिंदुधर्माचे देव, शास्त्रें व कर्में हीं त्यजून अगदीं वेगळे झालेले असे जे बौद्ध व जैन ह्यांनीं देखील ह्या मताचा त्याग केला नाहीं. ह्या कर्मांच्या शुभाशुभ फलांस **कर्मविपाक** ह्मणतात व ज्या ग्रंथांत तीं सांगितलीं आहेत त्यासही हेंच नांव आहे.

मूर्तिपूजेच्या संबंधानें अनेक पवित्र वस्तु, पवित्र स्थळें, व पवित्र दिवस यांची उत्पत्ति झाली आहे. पवित्र मानलेल्या

दैवतें, तीर्थं, क्षेत्रें इ०

वस्तु ह्या दैवतांत गणिल्या जातात, पवित्र स्थळास **पुण्यस्थान** किंवा **तीर्थ** ह्मणतात, व पवित्र दिवसांस **पर्वणी, सण,** व **पुण्यतिथि** ह्मणतात.

मंत्रशास्त्र.

हिंदुधर्मांतील मंत्रशास्त्रांत **जारण, मारण, उच्चाटण** व **भेदन** असे चार प्रकार सांगितले आहेत, त्यांच्या योगानें शत्रूचा नाश करितां येतो असा हिंदुलोकांचा समज आहे. तशीच त्यांच्यामध्यें **पिशाचविद्या** आहे, तिच्या द्वारें प्रेत, पिशाच, ब्रह्मराक्षस इ० भूतांशीं संबंध ठेवितां येतो असें त्यांस वाटतें.

याप्रमाणें हिंदुधर्माचें साधारण रूप आहे. ह्या धर्माचे अनेक मतांचे अनेक ग्रंथ आज हजारों वर्षांपासून जमत आले आहेत. त्याशिवाय निरनिराळ्या देशांत याचें स्वरूप कमी ज्यास्ती बदललेलें असतें, त्या सर्वांचें यथार्थ वर्णन करणें अशक्य आहे, इतकेंच नाहीं, तर तें करण्याचा कोणीं प्रयत्न केला असतां त्यास महाभारताएवढा मोठा ग्रंथ लिहावा लागेल; तरी हिंदुधर्मांत काय आहे हें जाणणें अवश्य आहे, व तें ह्या लहानशा पुस्तकांत संक्षेपानें दर्शविलें आहे. ह्यांत जें कांहीं लिहिलें आहे त्याच्या प्रमाणार्थ हिंदुग्रंथांचे आधार दाखविले आहेत ते असे कीं, कित्येक ठिकाणीं संस्कृत मूळ अर्थसहित दिलें आहे, कित्येकांत नुस्तें महाराष्ट्र भाषांतर दिलें आहे, व कित्येकांत त्या स्थळांचे हवाले मात्र दिले आहेत.

ग्रंथसहाय.

हा ग्रंथ अनेक इंग्लिश, संस्कृत व प्राकृत ग्रंथांच्या आधारानें रचिला आहे हें सांगणें नको.

---

# खंड १—वैदिक धर्म.

## प्रकरण १.

### वेद.

**वेद** चार आहेत, ह्मणजे **ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद** आणि **अथर्ववेद**. प्रत्येक वेदाचे **मंत्र, ब्राह्मण** व **उपनिषद** असे तीन भाग आहेत.

वेद व त्यांचे भाग.

वेदाच्या मंत्रसमूहाला **संहिता** ह्मणतात. मंत्र आणि ब्राह्मण ह्यांस **श्रुति** ह्मणतात, कधीं कधीं उपनिषदांसही हेंच नांव देतात.

प्रो० मोक्षमुल्लर हे वैदिक ग्रंथसमूहाचे चार काल कल्पितात, ह्मणजे **सूत्रकाल, ब्राह्मणकाल, मंत्रकाल,** व **छंदकाल.**

वैदिक ग्रंथांचे काल.

सूत्रांचा काल खि. पू. ५०० वर्षें मानिला आहे. सूत्रग्रंथांत यज्ञाचे नियम, स्वरशास्त्र, शब्दव्युत्पत्ति, व्याकरण, वृत्तशास्त्र, धर्म व व्यवहार, भूमिति, ज्योतिष, तत्त्वचिन्ता, या विषयांचें निरूपण आहे.

ब्राह्मणकाल खि. स. ६०० पूर्वीं धरिला आहे.

मंत्रकाल ( खि. पू. ८००—१००० )—ह्या कालांत चार वेदांच्या संहितांतील मंत्रांचा संचय झाला व त्यांची शिस्तवार व्यवस्था लागली.

छंदकाल ( खि. पू. १००० )—ह्या कालांत वेदरूप काव्यें रचिलीं असावींत असें दिसतें.

याविषयीं एक मत नाहीं. आरंभीं एक वेद होता, तीन होते, चार होते; व कित्येक वेद नष्ट झाले अशीं मतें ग्रंथांतरीं आढळतात.

वेदांची संख्या.

ऋचा व सूक्त.

वेदमंत्रांत अनेक दैवतांच्या प्रार्थना व स्तुति आहेत; हे मंत्र पदसमूहात्मक काव्यरूपानें रचिले आहेत. ऋग्वेदाच्या मंत्रास **ऋचा** असेंही नांव आहे; स्तोत्रास **सूक्त** ह्मणतात.

विधि व अर्थवाद.

ब्राह्मणांत वैदिक यज्ञांच्या ठायीं मंत्रांचा व स्तोत्रांचा उपयोग कसा करावा याविषयींचे नियम, यज्ञांची उत्पत्ति, त्यांचा अर्थ व त्यांसंबंधी कथा, आणि उदाहरणें इ० आहेत. जसा यहूदी लोकांच्या जुन्या करारासंबंधी तालमूद ग्रंथ तसाच हा वैदिक लोकांचा ब्राह्मण ग्रंथ होय. ह्याचे **विधि** व **अर्थवाद** असे दोन भाग आहेत.

उपनिषदें.

उपनिषदें हीं ब्राह्मणांस जोडलेले परिशिष्टरूप ग्रंथ आहेत, त्यांचा हेतु वेदाचा गूढार्थ प्रकट करण्याचा आहे.

ऋग्वेद.

सर्व वेदांत ऋग्वेद पहिला असून फार प्राचीन आहे. त्यांत १०१७ अथवा १०२८ सूक्तें, स्तोत्रें किंवा मंत्र आहेत. त्याची रचना ख्रि० स० पूर्वी १५०० वर्षें, ह्मणजे मोश्याचे ग्रंथांमागून किंवा त्यांचे काळीं झाली असावी, असें विद्वान् लोकांचें अनुमान आहे. ऋग्वेदांतील एकंदर शब्दसंख्या १,५३,८२६ आहे असें, हिंदुपंडितांचें मत आहे.

यजुर्वेद.

यजुर्वेदांत यज्ञाचे उपयोगी असा ऋग्वेदाचा पुष्कळ भाग घेतला आहे. यांतील मुख्य विषय यज्ञ व यज्ञसंबंधी मंत्र आहेत. यांत अग्निष्टोम,

राजसूय, पुरुषमेध, पितृमेध, असे अनेक प्रकारचे यज्ञ करण्याच्या पद्धति व क्रिया सांगितल्या आहेत.

सामवेद.

सामवेदांतही सोमाचे विधि करण्यासाठीं ऋग्वेदांतील पुष्कळ भाग निराळ्या प्रकारें रचिले आहेत. त्यांत सोम नामक वल्लीची स्तुति विशेष आहे.

अथर्ववेद.

अथर्ववेद हा सर्व वेदांमध्यें अलीकडचा आहे. यांतही ऋग्वेदांतील पुष्कळ मंत्र आहेत; तरी नवीन विषयही आहेत. भूत, पिशाच्च इत्यादिकांची बाधा व दुसरीं अरिष्टें टाळण्याचे व शत्रूवर अरिष्ट आणण्याचे मारक मंत्रांचा ह्यांत संग्रह आहे.

## ( १ ) वैदिक देव.

देवांची संख्या.

वेदांतील देव पुराणांतील देवांहून निराळे आहेत. इंद्र, अग्नि आणि सूर्य हे वैदिक देवांमध्यें मुख्य होते. एकंदर ३३ देव, "तीन पट अकरा" वेदांत सांगितले आहेत. " हे अग्नि, तुझ्या परिपाठाप्रमाणें तीन व तीस देवांस त्यांच्या पत्न्यांसहित इकडे आणून त्यांस संतुष्ट कर." (ऋग्वेद.)

तरी यज्ञाचे पशु व यज्ञसंबंधी अनेक उपकरणें यांसही देवता मानिल्या आहेत. उदाहरणार्थ, यज्ञाचा घोडा व त्याच्या अघाड्या पिछाड्या, सोमवल्ली व तिचा रस काढण्याचा पाटा वरवंटा, यज्ञपशु बांधण्याचा खांब ह्यांस देवता ह्मटलें आहे, व त्यांचीं स्तोत्रें रचिलीं आहेत. तीनशें, तीन हजार आणि एकुणचाळीस देवांनीं अग्नीची उपासना केली. ( ऋ. वे. ३, ९, ९ ) असें जें ह्मटलें आहे त्यांत हे पदार्थ

देवतारूपांनीं गणले असतील. उषा ( पहांट ), पृथ्वी ह्यांस देवी मानिल्या होत्या. ज्यांस विश्वेदेव ह्मटलें आहे ते २० आहेत, त्यांची याद वे० य० पुस्तकांत येणेंप्रमाणें दिली आहे: वरुण, मित्र, अर्यमा, इंद्र, मरुत्, पूषा, भग, विष्णु, वात, नद्या, ओषधी, रात्र, उषा, पृथिवी, अंतरिक्ष, द्युलोक, वनस्पति, सूर्य, गाई, बृहस्पति. वे. य. पु. २ अंक ७. पृ. ४१७.

हे देव प्रथम मनुष्य होते, ते यज्ञ करून देवत्व पावले. "यज्ञेन हि देवा दिवंगतः। तेतरीयब्रा. इंद्रास "नृतम" मनुष्यांमध्यें श्रेष्ठ असें ऋ० वे०त ह्मटलें आहे. (ऋ.४.२२.२)

हे देव आरंभीं सर्व समान होते परंतु अग्नि, सूर्य व इंद्र यांस श्रेष्ठ होण्याची इच्छा झाली, व ते तपाच्या योगानें श्रेष्ठत्व पावले. आरंभीं अग्नीमध्यें आतांच्या सारिखी ज्वाला नव्हती, इंद्रास पूर्वी शक्ति नव्हती, सूर्यास तेज नव्हतें. श० ब्रा० कांड ४, ५ इ०.

ह्या देवतांची भक्ति आर्यलोक यज्ञद्वारें करीत. यज्ञाचें अन्न भक्षण करून देव प्रसन्न होतात इतकीच कल्पना ह्या लोकांनीं केली होती असें नाहीं, तर त्यांस तेणेंकरून माद व बल येतें, आणि ते शत्रूशीं युद्ध करायास व त्यास जिंकण्यास समर्थ होतात असें त्यांस वाटत असे. "सोम इंद्राला धांववितो, माद आणितो." ( ऋ. १. १. ४. ७. )

त्यांची भक्ति.

हविद्रव्यांतील तूप व सोमरस हीं देवांस अत्यंत प्रिय होतीं:—

"हे दीप्यमान अग्नि, तुजवर तूप टाकलें असतां तूं

उत्तर देतोस; यास्तव सर्व राक्षस आणि आमचे शत्रु यांस भस्म कर." ( ऋ. अष्ट. १. अध्या. )

"आमचें दूध घृताप्रमाणें चिकट आहे." "हा सोमरस पांढरा, शुद्ध, मादक, प्रबळ आहे." ( ऋ. २. १. १३४. ९.)

"ह्या लाह्या तुपानें थबथबीत आहेत." ( –१.१.४.१६ .)

सोमरस.

वैदिक देवांस **सोमरस** परम प्रिय होता. हा रस सोमनामक वल्लीचा काढीत, व तो देवांस अर्पून आपणही पीत. हा मादक होता. सोमरसाची वेदांत अत्यंत स्तुति केली आहे. त्याला "देवांचा पिता," ( पिता देवानां ) "जगाचा प्रथम विधाता," ( प्रथमे विधर्मन् ) "बुद्धि, आकाश, पृथ्वी, अग्नि, सूर्य, इंद्र, विष्णू यांचा जनिता," "जगाचें मन" असें ह्मटलें आहे. "प्रलयकाळीं सर्व देव उदकाच्या उदरांत झांकलेले असतां तो होता. नंतर तो महत् ह्मणजे ब्रह्मदेव होऊन त्यानें इंद्रामध्यें बळ घातलें, आणि सूर्याचें तेज उत्पन्न केलें." देव देखील सोम पिऊन अमर झाले:–"आह्मी सोमरस प्राशन करणारे होतों, तेणेंकरून अमर झालों. आह्मी स्वर्गाप्रत पावलों. आह्मी स्वर्गीय वस्तु जाणते झालों. शत्रु आमचें काय करील? अमरांस क्षय काय करील?" ( ऋ. ८. ४८. ३. )

सामवेदांत सोमाची स्तुति येणेंप्रमाणें केली आहे:–

सोमः पवते जनिता मतीनां जनिता दिवो जनिता पृथिव्याः ।
जनिताग्नेर्जनिता सूर्यस्य जनितो जनितेन्द्रस्य जनितोत विष्णोः ॥

**अर्थ.**–सोम पवित्र आहे, बुद्धीचा उत्पादक, आकाश, अग्नि, सूर्य, इंद्र यांचा उत्पादक आहे. तो विष्णूचा उत्पादक आहे.

"सोम प्रथमच देवांकडे आणिल्यावर त्याचा पहिला घोट कोणीं घ्यावा याविषयीं कलह उत्पन्न झाला. पुढें असें ठरलें कीं, धांवण्याची पैज लावावी, व जो जिंकेल त्यानें प्रथम सोमाचा रस घ्यावा. ह्या धांवण्यांत वायु पणाच्या जागीं पोंचला. त्याच्या मागून इंद्र." ( वैदिक हिंदुधर्म. पृ. ५२ ) सोमरस पितांना इंद्र बैलांचें व रेड्यांचें मांस खात असे. ( ऋ. वे. १०. २८. )

वेदांतील देवांनीं चमत्कार केल्याच्या गोष्टी वेदांत ह्मणजे संहितेंत फारशा मिळत नाहींत, परंतु कोठें कोठें आढळतात. त्यांतून एक दोन सांगतों:—

वैदिक देवांचे चमत्कार.

इंद्राविषयीं अत्यंत चमत्कारिक गोष्टी वेदांत सांगितल्या आहेत, त्यांपैकीं एक अशी आहे कीं त्यानें आपल्या आई-बापांस उत्पन्न केलें ! यावर मोक्षमुल्लर असें ह्मणतात कीं, "ज्या देवाच्यानें एकदां असें करवलें त्याला मागाहून सर्व कांहीं करितां आलें असेल यांत संशय नाहीं." ( वै० हिं. ध. पृ. ३९. )

"हे नासत्यहो, तुह्मी कूप खोदून जवळ आणिला, आणि त्याचा तळ वर आणि तोंड खालीं केलें त्यापासून तृषाक्रांत गौतमाकारणें सहस्त्रावधि संपत्ति लोटल्याप्रमाणें उदकप्रवाह वाहूं लागला." ( ऋ. अ. १. सू. ११६.)

"हे अश्वीहो, पक्ष्याचा पंख तोडल्याप्रमाणें लढाईंत विश्पलेचा पाय तोडला गेला; तेव्हां त्या खेळाच्या विश्पलेला लोखंडाचा पाय करून पुनः युद्धांत संचार करण्यासाठीं तुह्मी एकाएकीं लाविते झालां." ( –,,– ).

## ( २ ) वैदिक देवांच्या प्रार्थना व स्तुति.

**वरुणाची प्रार्थनाः—**

" हे वरुणा, चांगलें ध्यान करणारे आणि स्तुति करीत राहणारे असे जे आह्मी ते तुझ्या सेवेंत सुभाग्यसंपन्न राहूं असें तूं कर." ( ऋ. वे. अ. २. सू. २०.)

**अग्नीची स्तुतिः—**

अग्नीस "आकाशाचें मस्तक," "अन्नाचा पति," "देवांचा दूत," "देवाची जीभ" ह्मटलें आहे. सामवेदांतील आदिमंत्रांत प्रथम त्याची स्तुति आहे. जशी आतां कोणत्याही धर्मकार्यारंभीं गणपतीची स्तुति करितात, तशी प्रथम त्याची करीत असत. अग्नीच्या स्तुतीचे जितके वेदमंत्र आहेत तितके दुसऱ्या कोणत्याहि देवाचे नाहींत.

"अग्नि यज्ञाचा विज्ञानयुक्त होता आणि पुरोहित होय. तो यज्ञाला अनुक्रमानें जाणतो. तो अमर्त्य, हव्यवाहक आणि सकाम आणि प्रियान्न दूत होय. अग्नि बुद्धिमान् आहे." ( सू. २१. )

**इंद्र व अग्नि यांची प्रार्थनाः—**

" हे प्रबळ, हे शक्तिमान् इंद्रा, तूं महान् आहेस. धन जिंकणारा तूं आपल्या पराक्रमांनीं दुसऱ्यांचा पाडाव करणारा आहेस. तूं सकळ भुवनांचा एकला राजा आहेस." ( एको विश्वस्य भुवनस्य राजा ) ( मं. ३. अध्या. ४. )

" हे इंद्राग्नीहो, तुह्मी स्तोत्रांनीं या श्रेष्ठ गाळलेल्या रसाप्रत या. आमच्या उपासनेनें आणिलेले तुह्मी हा सोम घ्या."

" हे इंद्राग्नीहो, या स्तोत्राचा हा अर्पणयोग्य आणि

चेतनाकारी सोम तुह्मां दोघांजवळ मिळून जात आहे. तुह्मी या स्तुतीच्या योगानें हा सोम घ्या." ( सू. १२. )

**इंद्राची प्रार्थनाः—**

"हे इंद्रा, जे तुझे पिवळे घोडे आहेत त्यांसहित तूं तृप्त हो. तूं आपलें तोंड उघड. तूं आपली जीभ बाहेर काढ. तूं प्रीतीनें आमचीं हव्यें सेवन कर. (ऋ. १. १०१.)

**सूर्याची स्तुतिः—**

"हे देदीप्यमान सूर्या, तूं काळें वस्त्र काढून प्रकाश-वस्त्र पसरीत, अत्यंत वहनसमर्थ घोड्यांच्या योगानें जात असतोस. सूर्याचे किरण अंतरिक्षामध्यें अंधकाराला चामड्याप्रमाणें झाडून फेंकून देतात."

"आधारहीन आणि बंधनहीन हा खालीं येतांना आणि वर जातांना पडत कसा नाहीं ? तो कोणत्या शक्तीनें चालतो ? कोणीं पाहिलें आहे ?"

लोकांचा स्तंभ स्वर्गशिखराला मिळून त्याचें संरक्षण करितो." ( ऋ. अ. ३. सू. १३. )

**सोम आणि पूषा यांची स्तुतिः—**

"हे सोम आणि पूषाहो, तुह्मी संपत्तीचे बाप, आणि पृथ्वीचे बाप आहां. तुह्मी उपजतच सकळ भुवनांचे संभाळकर्त्ते आहां."

"हे दोघे देव उपजतांच त्यांचें सेवन इतर देवांनीं केलें. हे जे सोम आणि पूषा यांजकरितां इंद्र कच्या गाईच्या अंगीं पक्व दूध उत्पन्न करिता झाला."

"तुह्मांतून एकानें सकळ भुवनें उत्पन्न केलीं. दुसरा सकळ भुवनांला पाहत आहे. हे सोम आणि पूषाहो, तुह्मी

आमचें स्तोत्र स्वीकारून घ्या कीं जेणेंकरून आह्मी तुमच्या योगानें सर्व सेना जिंकूं."

"सर्वव्यापी पूषा आमची उपासना सफल करो. संपत्तीचा पति सोम संपत्ति देवो. अप्रतिहत, अदिति देवी आह्मांला रक्षो. आणि शूर पुत्रपौत्रांसहित आह्मी यज्ञांत मोठें स्तोत्र म्हणूं असें होवो." ( ऋ. अ. २. सू. ४०. )

**अनेक देवांची प्रार्थनाः—**

"आह्मांकरितां मित्र कल्याणकारक होवो, वरुण कल्याणकारक होवो, आह्मांकरितां अर्यमा कल्याणकारक होवो, इंद्र आम्हांकरितां कल्याणकारक होवो, बृहस्पति कल्याणकारक होवो. लांब लांब पावलें टाकणारा विष्णु आह्मांकरितां कल्याणकारक होवो." ( ऋ. अ. १. सू. ९०. )

**मरुद्गणाची प्रार्थनाः—**

"जो स्वगतिमान् होय, आणि पांढऱ्या ठिपक्यांच्या हरिणी हेच ज्याचे घोडे होत, जो नित्य तरुण, असा जो मरुद्गण तो या स्तुतीच्या योगेंकरून सकल बळांनीं वेष्टित झाला आहे. हे मरुद्गणा, तूं सत्य होस, तूं ऋणनाशक आणि अनिंद्य आहेस. तर तूं गण, या आमच्या कर्माचा प्रबळ संरक्षिता हो." ( ऋ. १. ८७. ४. )

**रुद्राची प्रार्थनाः—**

"द्युलोकांतील वराह असा जो आरक्त, जो जटिल, आणि प्रखररूपी रुद्र, त्यास आह्मी नमस्कार करून येथें बोलावितों. उत्तम औषधें हातांत धारण करून तो आह्मांस आश्रय, अभय आणि थारा देवो." ( ऋ. १. ११४. ५.)

## ( ३ ) वैदिक देवांच्या मूर्ति करीत नसत.

ह्या देवांच्या प्राचीन ऋषि मूर्ति करीत नसत. केवळ

ते देव आपल्या बोलावण्यानें आपल्या घरीं येतात असें कल्पून त्यांस हव्य अर्पण करीत. " हे इंद्रा, ये, बैस, हा ताजा सोमरस पी, " अशी त्यांच्या आमंत्रणाची रीत असे. ते गुडघे टेंकून त्यांची प्रार्थना करीत. " हे इंद्रवरुणहो, क्षेम मिळवायाचें असलें तर गुडघे टेंकून आह्मी तुमचा धांवा करितों." ( ऋ. ७. ८२. ४. २९३. )

---

## प्रकरण २.

## वैदिक यज्ञ.

यज्ञमाहात्म्य.

वेदांमध्यें यज्ञाचें माहात्म्य फार सांगितलें आहे. " यज्ञ हाच पहिला धर्म होय, " "त्याच्या योगानें देव मोठे होऊन स्वर्गास जाते झाले, " इ० त्याचें वर्णन केलें आहे.

यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ।
ते ह नाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः ।
( ऋ. अ. २. ३. १६४. ५०: )

अनेक प्रकारचे यज्ञ व यज्ञाचीं द्रव्यें.

यज्ञ अनेक प्रकारचे होते. मुख्य यज्ञ पांच होते. १ **अग्निहोत्र, २ दर्शपूर्णमास** ( अमावास्येस व पौर्णिमेस करायाचे यज्ञ), **३ चातुर्मास्य, ४ पशुयज्ञ, ५ सोमयज्ञ.** पशुयज्ञांत गाई, ह्मैस, मेंढरें, बकरीं यांचें अर्पण करीत. अरण्यपशूंचें ह्मणजे सिंह, वाघ, सर्प, बेडूक, पक्षी यांचेंही प्रसंगोपात्त अर्पण करीत ( वाजसनेयि संहिता २४. १–३९. तै. ब्रा. ३. ९. १ ). जाड पायांच्या गाईचा यज्ञ इंद्राला करीत, वांझ गाय विष्णूला देत, व तांबडी गाय रुद्रास. परंतु पशुयज्ञांत

मुख्य व मोठ्या महत्वाचा यज्ञ ह्मटला ह्मणजे **अश्वमेध** हा होता. ह्या यज्ञांत खरोखर घोडा मारीत असत, व त्याचें मांस शिजवून स्वतांही खात, ऋग्वे. मंडळ १. सूक्त १६२ पाहा. इतर यज्ञद्रव्यांत **सोमयज्ञ** श्रेष्ठ होता. धान्याच्या यज्ञांत लाह्या ( लाजा ), तांदळांचा भात ( ओदन ), पिठाच्या पोळ्या ( पुरोडाश ), दह्यांत मिसळलेलें यवांचें पीठ (करंभ) इ० द्रव्यें असत. लहानसहान क्षुद्रयज्ञांस **पाकयज्ञ** ह्मणत.

यज्ञकाल.

हे यज्ञ करण्याचे अनेक काळ होते. **अग्निहोत्र** हा यज्ञ नित्य सकाळीं व संध्याकाळीं करायाचा असून तो जन्मवर चालवीत. ह्या यज्ञाच्या कर्त्यास **अग्निहोत्री** ह्मणतात. **दर्शपूर्णमास** हा यज्ञ अमावास्येस व पूर्णिमेस करीत. हा तीस वर्षें करायाचा होता. चातुर्मास्य हा वसंतादि ऋतूंच्या आरंभीं करीत. ह्याचा काळ ७ वर्षांचा होता. पशुयज्ञ नित्य व नैमित्तिक होते. **अश्वमेधाची** तयारी एक वर्षपर्यंत होत असे व तो तीन दिवस चालत असे. घोड्याबरोबर ६०९ पशु मारीत, त्यांत २६० वनपशु असत, परंतु त्यांच्या भोंवतीं अग्नि फिरवून त्यांस सोडून देत, आणि ३५९ पशूंचा खरोखर जीव घेत. हे व आणखी दुसरे बहुत प्रकार आर्यलोकांच्या वेदमंत्रांच्या काळीं चालू होते असें प्रमाण मिळत नाहीं, परंतु ब्राह्मणांच्या काळांत ते वाढले, असें समजावें.

अग्निकुंडांत तूप, लाह्या इत्यादि पदार्थांची आहुति टाकीत. कित्येक प्रसंगीं **नरमेध** ( मनुष्याचा यज्ञ ) करण्याची चाल होती, परंतु ती फार प्रचारांत आली असें दिसत नाहीं. यज्ञांत मद्य व सोमरस यांचेंही अर्पण लागत असे. सर्व वैदिक यज्ञांत पुरुषयज्ञाचें वर्णन फार चमत्कारिक व गूढार्थबोधक

आहे. त्याविषयींचें वैदिकस्तोत्र आहे त्याला **पुरुषसूक्त** ह्मणतात. ह्या पुरुषाला '**प्रजापति**' ह्मटलें आहे, आणि त्याला '**आत्मद**' आपणास देणारा असेंही नांव आहे. सामवेदाच्या तांड्य महाब्राह्मणांत ह्या प्रजापतीनें देवांकरितां आपणाला बळी दिलें असें ह्मटलें आहे. श्वेतयजुर्वेदामध्येंही हीच कल्पना आहे–"प्रजापति देवांचा यज्ञ झाला. यज्ञ देवांचें अन्न आहे, ह्या यज्ञाकडून त्यानें आपणाला त्यांजपासून खंडून घेतलें." शतपथ ब्राह्मणांत हा प्रजापति अर्धा मर्त्य व अर्धा अमर असा वर्णिला आहे, व तो आपल्या मर्त्य भागाकडून मरणाला भीत होता, असें सांगितलें आहे.

यज्ञाचें फल व हेतु.

सर्वांल्लोकान्जयति मृत्युं तरति पाप्मानं तरति ब्रह्महत्यां तरति यो अश्वमेधेन यजते ॥

"जो अश्वमेध करितो तो सर्व लोकांतें जिंकितो, मृत्यूस जिंकितो, सर्व पापांचें प्रायश्चित्त करितो, ब्रह्महत्येच्या पापापासून देखील मुक्त होतो."

पुत्र, धन, धान्य इ० ऐहिक सुखें मिळण्याकरितां यज्ञ करीत. सार्वभौम राज्य मिळण्यासाठींही यज्ञ करीत. ह्या यज्ञाला **राजसूय** यज्ञ ह्मणत.

यज्ञानें देव तृप्त होत व त्यांस बलप्राप्ति होई.

प्राचीन आर्य लोक असें समजत कीं, यज्ञानें देव तृप्त व संतुष्ट होतात, आणि त्यांस आपल्या शत्रूंशीं युद्ध करायास बलप्राप्ति होते. याविषयीं शेंकडों उदाहरणें वेदांत सांपडतात. "हे मरुतांनो, हा आमचा मधुर रस पिऊन आनंदित व्हा ( ऋ. १. १४. ८५ ).

"सोमानें अत्यंत आनंद पावून जेव्हां इंद्र उदकांस आवरून धरणाऱ्या वृत्राला मारिता झाला तेव्हां तो उदकांत पर्वताप्रमाणें स्थिर राहिला आणि बळानें वाढला." ( १. १०. ५२. २. )

---

## प्रकरण ३.

## वेदांचें अनादित्व इत्यादि.

वेद अनादि आहेत.

वेद अनादि आहेत असें बहुत हिंदु ग्रंथकर्त्यांचें साधारण मत आहे, तथापि ह्या गोष्टीविषयीं शास्त्रकारांमध्यें मोठे वाद आहेत, व वेदाचा कोणता भाग अनादि आहे, ह्मणजे त्याचें अक्षर, उच्चार, क्रम, शाखा किंवा काय ह्याचा कोणीं अद्याप निर्णय केला नाहीं.

वेद अनादि नाहींत.

वेद अनादि नाहींत व त्यांची उत्पत्ति पुराणांच्याही मागून आहे, असें मत बाळगणारे देखील हिंदु ग्रन्थकार होऊन गेले. उदाहरणार्थ, न्याय, वैशेषिक आणि सांख्य ह्या शास्त्रांचे कर्त्ते वेदाला प्रमाण मानीत असतांहि त्याला अनादि समजत नाहींत. तो ईश्वराची उक्ति आहे असें त्यांचें मत आहे. आणखी एक मत असें आहे कीं वेदाचा अर्थ अनादि (नित्य) आहे, त्याची रचना किंवा क्रम अनादि नाहीं. तर्कसंग्रहनामक वैशेषिकमताचे ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं वाक्यें दोन प्रकारचीं आहेत ह्मणजे लौकिक व वैदिक. वैदिक वाक्य हें ईश्वरोक्त आहे, यास्तव तें प्रमाण आहे. कैयट नामक पंतजलीच्या महाभाष्यावरील टीकाकार असें

ह्मणतो कीं, वेदांचा कर्ता कोण होता ह्याची आतां आठवण नाहीं ह्या अर्थानें ते अनादि आहेत. "नित्यानि इति कर्तुरस्मरणात् तेषां इति भावः।"

वेदांत पाहिलें असतां नवीं, जुनीं, कारणप्रसंगीं केलेलीं अशीं स्तोत्रें आढळतात, व त्यांच्या कर्त्यांचीं नांवेंही सांगितलीं आहेत. वेदसूक्तांचे रचणारे स्वतां ह्मणतात कीं, "आह्मीं हें सूक्त नवीन रचलें आहे." "हें तुझ्याकरितांच ह्मणून रचिलें आहे." इ०. याचीं आणखी उदाहरणें वेदार्थयत्न नामक पुस्तकांत पाहावीं. वेदांत ऐतिहासिक ह्मणजे घडलेल्या गोष्टी आहेत, लोकांच्या रीतिभाति सांगितल्या आहेत, संकटनिवारणार्थ प्रार्थना केल्या आहेत, वर मागितले आहेत; तर त्या सर्व अनादि कशा असतील ?

वेदाविषयींच्या कथा व समजुती.

वेदाविषयीं ज्या अनेक कथा आहेत, त्यांत एक अशी आहे कीं, मधु व कैटभ हे दोघे असुर ब्रह्मदेव वेद उत्पन्न करीत असतां तो त्याच्यापासून हिसकावून घेऊन पळून गेले; तेव्हां ब्रह्मदेवानें मोठा शोक केला तो येणेंप्रमाणें:—

वेदा मे परमं चक्षुर्वेदा मे परमं बलम्।
वेदानृते हि किं कुर्यां लोकानां सृष्टिमुत्तमाम् ॥

( महाभा. शांतिपर्व. अ. ३४८. )

"वेद माझा मुख्य नेत्र आहे, वेद माझें परम बल आहे, वेदावांचून मी काय करूं ?"

सत्यलोकीं वेद मूर्तिमंत आहेत अशी अर्वाचीन हिंदुलोकांची समजूत आहे.

चार युगांच्या शेवटीं वेद नाहींसे होतात, नंतर सप्तऋषि स्वर्गांतून येऊन त्यांची प्रवृत्ति करितात. (वि. पु. ३. २. १२.)

---

## प्रकरण ४.
## वेदांच्या शाखा.

शाखाशब्दाचे अर्थ.

शाखा ह्मणजे फांदी. वेदाच्या शाखा होण्याचें मूळ कारण त्याचा पाठभेद. ज्यांनीं ज्यांनीं वेदाच्या ऋचा शोधून त्यांची नवीन पाठव्यवस्था केली त्यांची शाखा झाली. याशिवाय शाखाशब्दाचे वेदग्रन्थाच्या संबंधानें दुसरेही अर्थ होतात. वेदाच्या संहितेला शाखा ह्मणतात, व वेदानुयायींमध्यें जे जे कालांतरानें तट किंवा फुटी झाल्या, त्यांसही शाखा ह्मणतात.

ऋग्वेदाच्या पांच शाखा आहेत:—शाकल, बाष्कल, आश्वलायन, सांख्यायन आणि मांडूकायन. यजुर्वेदाच्या ८६ आहेत; सामवेदाच्या एक हजार होत्या; याप्रमाणें दुसऱ्या वेदांच्या समजाव्या. कित्येक शाखांची उत्पत्ति फार चमत्कारिक आहे. यजुर्वेदाच्या प्रथम कृष्णयजुर्वेद व श्वेतयजुर्वेद अशा दोन शाखा झाल्या. त्याचें कारण विष्णुपुराणांत असें सांगितलें आहे कीं, एक वेळ सर्व मुनींनीं मेरुपर्वतावर एकत्र मिळण्याचा संकेत केला, आणि जो कोणी तेथें येणार नाहीं त्याला सात दिवस ब्रह्महत्येचें पाप लागेल असा शाप उच्चारिला. पुढें वैशंपायन ऋषि त्या सभेस गेला नाहीं, त्यामुळें त्याच्या बहिणीचें मूल त्याच्या हातून मरण पावलें. तें पातक दूर व्हावें ह्मणून त्यानें आपल्या सर्व शिष्यांस प्रायश्चित्त करायास

सांगितलें, परंतु त्यांपैकीं याज्ञवल्क्य हा त्याला ह्मणाला कीं, ह्या दुर्बल ब्राह्मणांच्या हातून काय प्रायश्चित्त होणार आहे? मीच एकटा तें करीन, तेव्हां वैशंपायनास मोठा क्रोध आला, आणि ह्मणाला कीं, मला असा अवज्ञा करणारा व ब्राह्मणांची निंदा करणारा शिष्य नको. याज्ञवल्क्यालाही तसाच राग आला, आणि मलाही तुझी गरज नाहीं, व मी जें अध्ययन तुजपाशीं केलें तें आपलें परत घे; असें ह्मणून त्यानें यजुर्वेदाच्या रक्तानें भरलेल्या ऋचा ओकून बाहेर टाकिल्या; तेव्हां दुसरे शिष्यांनीं तित्तिरपक्ष्यांचें रूप धरून त्या पटपटां टिपून गिळून टाकल्या. ह्यावरून तैत्तिरीय शाखा उत्पन्न झाली. नंतर याज्ञवल्क्यानें यजुर्वेदाच्या आणखी ऋचा मिळविण्याकरितां सूर्याची आराधना केली, तेव्हां सूर्यानें घोड्याचें रूप धरून त्या त्याला दिल्या. यावरून त्याच्या शाखेला वाजसनेय ( वाजी घोडा ) असें नांव पडलें ( वि. पु. अं. ३. )

शाखाभेदींचा परस्पर द्वेष.

हे शाखाभेदी परस्परांचे मोठे वैरी होते, व अद्यापहि त्यांच्यामध्यें ऐक्य नाहीं. तें वैर केवळ शाखेच्या संबंधानेंच नव्हतें, तर एका वेदाचे अनुयायी दुसऱ्या वेदाच्या अनुयायींचा देखील द्वेष करीत. परिशिष्ट नामक ग्रन्थांत अथर्ववेदी उपाध्याय असें ह्मणतो कीं, "बव्हृच ( ऋ. वे. चें अध्ययन ) करणारा ब्राह्मण राज्यनाश करितो, अध्वर्यु (यजुर्वेदी ब्राह्मण) संताननाश करितो, आणि छांदोग (सामवेदी ब्राह्मण) धननाश करितो; यास्तव राजाला अथर्व उपाध्याय हाच योग्य गुरु आहे." इतकेंच नाहीं, तर हा ग्रन्थकार अथर्ववेदाच्या

भार्गव नामक शाखेला मात्र कबूल करितो व इतर शाखांचा त्याग करितो.

शाखांतर करणारास शिक्षा.

वसिष्ठ ह्मणतो कीं, आपली शाखा सोडून दुसऱ्याच्या शाखेप्रमाणें चालणें हें महा दोषार्ह आहे. ज्ञानीपुरुष अन्य शाखेचें आचरण करणार नाहीं; व असें जो करितो तो फितुरी ह्मटला जातो. जो आपली शाखा सोडून दुसऱ्याची आचरितो तो अंधतम नरकांत पडतो. तसेंच अज्ञानानें अथवा लोभानें जो शाखांतर करितो तोही पतन पावतो—

शाखांतरीयकर्मकरणे दोषमाह वसिष्ठः। न जातु परशाखोक्तं बुधः कर्म समाचरेत्। आचरन्परशाखोक्तं शाखारंडः स उच्यते ॥ यः स्वशाखोक्तमुत्सृज्य परशाखोक्तमाचरेत् ॥ अप्रमाणमृषिं कृत्वा सोंऽधे तमसि मज्जते ॥ स्मृत्यंतरेऽपि ॥ स्वकर्म पर्युत्सृज्य तु यदन्यत्कुरुते नरः। अज्ञानादथवा लोभात्स हतः पतितो भवेत् ॥

---

## प्रकरण ५.

## वेदांची उत्पत्ति.

वेद अनादि आहेत ह्या मताखेरीज ते ब्रह्मदेवाच्या मुखापासून निघाले असेंही हिंदुशास्त्रांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे, व हेंच मत बहुधा साधारण लोकांस माहीत असून त्याजवर त्यांचा दृढ विश्वासही आहे. तरी वेदांची उत्पत्ति अनेक प्रकारें झाली असेंही हिंदुग्रन्थांत सांगितलें आहे.

( १ ) उष्णतेपासून वेद झाले:—

“ प्रजापतीनें तीन लोकांत उष्णता घातली, आणि ते

तप्त करून त्यांचे रस काढले, म्हणजे पृथ्वीपासून अग्नि, वायूपासून वारा, अंतरिक्षापासून सूर्य, त्यानें ह्या तीन देवांत उष्णता घालून त्यांचा रस काढला, ह्मणजे अग्नीपासून ऋच्, वायूपासून यजुष्, आणि सूर्यापासून साम हे वेद काढले." (छांदोग्य उपनिषद्.)

अग्नेर्ऋचो वायोरयजुमसि साम आदित्यात्.

(२) वेद ब्रह्मदेवानें यज्ञार्थ केले:—

ब्रह्मदेवानें यज्ञाची सिद्धि व्हावी एतदर्थ अग्नि, वायु, आणि रवि यांपासून क्रमेंकरून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद हे तीन वेद उत्पन्न केले.

अग्निवायुरविभ्यस्तु त्रयं ब्रह्म सनातनम् ।
दुदोह यज्ञसिद्ध्यर्थमृग्यजुःसामलक्षणम् ।
(मनु. १. २३.)

(३) वेद पाण्यापासून झाले असें शतपथ ब्राह्मणांत सांगितलें आहे. (—६. १. १, ८.)

(४) ह्याच ब्राह्मणांत वेद व इतर शास्त्रें ब्रह्माचा (ब्रह्मदेवाचा नव्हे) श्वास आहेत असें ह्मटलें आहे (—१४. ५. ४. १०.)

(५) वेद प्रजापतीच्या दाढीचा केस आहे. (प्रजापतेर्वै एतानि श्मश्रूणि यद् वेदाः) ह्याच ग्रन्थांत वेदांची माता वाच् (वाणी) आहे असेंही सांगितलें आहे:—

वागक्षरं प्रथमजा ऋतस्य वेदानां माता अमृतस्य नाभिः ।

(६) विष्णु, भागवत आणि मार्कंडेय पुरणांत चार वेद ब्रह्मदेवाच्या चार मुखांतून निघाले असें सांगितलें आहे.

(७) हरिवंशः—

ब्रह्मदेवानें सृष्टि केल्यावर तीन पदांची गायत्री केली. ती वेदांची माता होय. तिच्यापासून चार वेद झाले.

(८) ह्याच ग्रन्थांत आणखी असें सांगितलें आहे कीं, ब्रह्मदेवाच्या नेत्रांतून ऋग् व यजुष् हे निघाले, सामवेद त्याच्या जिव्हाग्रापासून, आणि अथर्व त्याच्या मस्तकांतून निघाला.

(९) विष्णु वेदमय आहे. (वि. पु. ३. ३०.)

स ऋङ्मयः साममयः स चात्मा स यजुर्मयः ।
ऋग्यजुःसामसारात्मा स एवात्मा शरीरिणाम् ।

(१०) विष्णूनें आपल्या मनांतून सरस्वती नदी व वेद काढिले. (महा भा. भी. पर्व ३०. १९.)

(११) यज्ञाच्या उच्छिष्टापासून ऋच्, साम, पुराणें, यजुष्, आणि आकाशांतील सर्व देव उत्पन्न झाले:—

ऋचाः सामानि छंदांसि पुराणं यजुषा सह ।
उच्छिष्टाज्जज्ञिरे सर्वे दिवि देवाः दिवि सृजः ॥
(अथर्ववेद. ११. ७. २४.)

(१२) कालापासून वेद झाले:—

काले हं भूतं भव्यं च मन्त्रो अजनयत्पुरा ।
कालादृचः समभवन्यजुः कालादजायत ॥
(अथर्व. १९. ५४. ३.)

(१३) वेदऋषि ह्मणतात कीं, आह्मी स्वतः वेदमंत्र रचले. ह्याविषयीं वेदांत अनेक स्थळीं प्रमाणें सांपडतात तीं विस्तारभयास्तव एथें दिलीं नाहींत. "वेदार्थयत्न" व "वेद कोणीं लिहिले?" * हीं पुस्तकें पाहा.

---

* हें पुस्तक मुंबईच्या त्रा० सो. त मिळतें.

## प्रकरण ६.

## वेदांचें माहात्म्य व प्रशंसा.

(१) वेदपठनानें धन, जीवन इ० प्राप्त होतातः—

"जो नित्य वेदपठण करितो तोही धनानें भरून दिलेल्या पृथ्वीपेक्षां तिप्पट अशी अक्षय पृथ्वी मिळवितो. ऋग्वेदाचे मंत्र देवांस दुधाच्या तर्पणाप्रमाणें आहेत. हें जाणून जो नित्य वेदपठन करितो, तो देवांची क्षीरोपहारानें तृप्ति करितो. आणि देव त्याला संपत्ति, जीवन, जननशक्ति, पूर्ण आरोग्य व सर्वश्रेष्ठ दानें देतात." (शतपथ ब्रा. ११. ५. ६.१.)

(२) वेद पितरादिकांचा नेत्र आहेः—

"पितर, देव, मनुष्य यांचा नित्य नेत्र वेद आहे. आणि वेद, शास्त्र हीं अशंक्य, अप्रतर्क्य होत, अशी शास्त्रमर्यादा आहे."

पितृदेवमनुष्याणां वेदश्चक्षुः सनातनम् । (मनु. १२. ९४.)

(३) वेद गतिदाता आहेः—

"वेदाचा अर्थ न जाणणारे यांला वेद हा केवळ पाठमात्रानें पातकाचा नाश करणारा असल्यामुळें शरण (गति) देणारा आहे. त्याचा अर्थ जाणणारे यांला तर अत्यंत गति देणारा होय. स्वर्ग व मोक्ष यांची इच्छा करणारे यांला तर तो उपाय सांगणारा असल्यामुळें त्यांच्या प्राप्तीला कारण आहे." (मनु. ६. ८४.)

(४) वेदाचा जपः—

"यज्ञ, देवता, आणि जीव या सर्वांच्या अधिकारेंकरून

जें वेदांत आणि वेदशास्त्रांत सांगितलेलें ब्रह्मस्वरूप या सर्वांचें प्रतिपादन करणारा जो वेद त्याचा जप करावा." (मनु. ६.८३.)

(५) वेदाध्ययनः—

वेदाध्ययन करणाराला कोणतेही कर्माचें पाप लागत नाहीं.

"तीनलोकस्थ प्राण्यांची हत्या करील, महापातकी इत्यादिकांचें अन्न भक्षण करील, परंतु तो ब्राह्मण ऋग्वेदाचें अध्ययन करीत आहे, तर त्याला कोणतेंही पाप लिप्त होत नाहीं." (मनु. ११. २६१.)

"मंत्रब्राह्मणरूप ऋक्संहिता, यजुःसंहिता, अथवा उपनिषत्संहिता सामसंहिता, यांतून कोणत्याही एका संहितेचा तीन वेळां जप केला असतां सर्व पातकांपासून मुक्त होतो." (मनु. ११. २६२.)

वेदाध्ययनकाल.

"शुक्लपक्षाचे ठायीं वेदपठन करावा. कृष्णपक्षांत वेदांगें पठन करावीं." (मनु. ४. ९८.)

अनध्याय.

"अमावास्या, चतुर्दशी, पौर्णिमा आणि अष्टमी ह्या दिवशीं वेदपठन करूं नये." (मनु. ४. ११४.)

वर्ज्य स्थल.

नगरें, ग्राम, दुर्गंधीचीं स्थळें यांमध्यें व गांवांत प्रेत असतां अनध्याय असावा. (मनु. ४. १०८, १०९.)

अवस्था.

"बिछान्यावर, दोन्ही मांडया खालीं असतां, मांस, सूतकान्न भक्षण केलें असतां वेदपठन करूं नये." (मनु. ४. ११२.) "ब्राह्मण श्राद्धाचें आमंत्रण घेईल तर आमंत्रण घेतल्यापासून तीन दिवस आणि

राजाचें जननाशौचादिक व चंद्रसूर्यांचें ग्रहण हीं असतां तीन दिवस वेदपठन करूं नये." (–११० )

( ६ ) वेदाची पवित्रता.—

वेद इतका पवित्र मानिला आहे कीं, तो स्त्रियांनीं व शूद्रांनीं शिकूं नये, असें ब्रह्मसूत्रांत व मनुसंहितेंत व भागवतांत सांगितलें आहे. अतिशूद्राच्या व शिखासूत्रनष्ट लिंगाइताच्या व यवनाच्या कानीं देखील वेदध्वनि पडूं नये ह्मणून ब्राह्मण फार जपतात. तसेंच वेदविक्रय करणें महापातक मानिलें आहे.

---

## प्रकरण ७.

## वेदांची असमानता.

(१) चाऱ्ही वेद समान योग्यतेचे नाहींत:—

"ऋग्वेद तामसगुणी आहे, यजुर्वेद सत्वगुणाचा आहे, सामवेदांत तमोगुण आहे, आणि अथर्ववेदांत तम आणि सत्व असे दोन गुण आहेत."

ऋचो रजोगुणाः सत्वं यजुषां च गुणो मुने ।
तमोगुणानि सामानि तमःसत्वमथर्वसु ॥

( मार्कण्डेय पु. १०२, ७. )

(२) सामवेदाचा ध्वनि अशुचि आहे:—

"सामवेदाचा ध्वनि श्रुत झाला असतां ऋग्वेद अथवा यजुर्वेद कदापि पठण करूं नये. ऋग्वेद देवतारूपी, आणि त्याची देवता देव आहे. यजुर्वेद मनुष्यरूपी व देवताही मनुष्य. सामवेदाची देवता पितर आहेत, ह्मणून तो पित्र्य होय. सामवेदाचा ध्वनि अशुचि आहे." मनु. ४. १२३.

जर वेद ईश्वरोक्त आहेत तर त्यांत आशौच कसें असावें? विष्णुपुराणांतही सामवेद अशुद्ध आहे असें सांगितलें आहे:—

"ब्रह्मा ऋग्वेदमय आहे, विष्णु यजुर्वेदमय आहे, आणि रुद्र सामवेदमय आहे, यास्तव सामवेदाचा ध्वनि अशुद्ध आहे:—"

रुद्रः साममयोऽताय तस्मात्तस्याशुचिर्ध्वनिः ॥ ( वि. पु. २. १३.)

(३) वेदोक्तकर्मांचीं फलें विषतुल्य आहेत:—

"विषवल्लीप्रमाणें दिसण्यास मात्र रमणीय अशीं स्वर्गादि फलें प्रतिपादन करणारी श्रुति (वेद) श्रवण करून मोठ्या आनंदानें असें मानितात कीं, याहून दुसरें मोठें सुख नाहीं. हे अर्जुना, वेदांमध्यें सत्व, रज, तम असा तीन गुणांचा विषय आहे, त्यांपासून तूं मुक्त हो." (भगवद्गीता अ. २.४२,४५)

(४) पुराणांशिवाय वेदज्ञान उपयोगाचें नाहीं:—

"जो चार वेद व उपनिषदें जाणतो, परंतु पुराणें जाणत नाहीं तो खरोखर विद्वान् नाहीं. यास्तव इतिहास व पुराण शिकून वेदाध्ययन पुरें करावें." (वायु. पु. अ. १.)

(५) वैदिककर्मांनीं ईश्वरप्राप्ति होत नाहीं असें भागवतांत सांगितलें आहे. (११. ३.)

वेदमंत्र केवळ शब्दब्रह्म आहे.

(६) "द्रव्यमय यज्ञापेक्षां ज्ञानमय यज्ञ श्रेष्ठ." (गी. ४. ३३.)

चार्वाक नामक नास्तिकाचें मत तर सांगणेंच नको, तरी वेदाविषयीं त्याचें काय मत होतें हें दाखविलें पाहिजे:—

त्रयो वेदस्य कर्तारो भंडधूर्तनिशाचराः ।
जर्फरीतुर्फरीत्यादि पंडितानां वचः स्मृतम् ॥ ३०.

"वेद मुळीं भंड, धूर्त आणि निशाचर ह्मणजे थट्टा-

खोर, ठक आणि राक्षस यांनीं केलेले असल्यामुळें त्यांतील कर्मे तशींच आहेत."

---

## प्रकरण ८.

## वेदांतील वेंचे.

### (१) सृष्ट्युत्पत्तीचें वर्णन. ऋ. १०. ७२.

"आपण स्तोत्र गाऊन देवांच्या उत्पत्तीचें वर्णन करूं. ब्रह्मणस्पति ह्यानें लोहाराप्रमाणें त्यांस निर्माण केलें. देवांच्या पूर्व युगांत असतापासून सत् झालें; तदनंतर दिशा उत्पन्न झाल्या, नंतर उत्तानपद. उत्तानपदापासून पृथ्वी उत्पन्न झाली, पृथ्वीपासून दिशा, अदितीपासून दक्ष; आणि दक्षापासून अदिती झाली. तिच्या मागून देव, सुखी व अमर असे झाले. देवहो, जेव्हां तुह्मी पाण्यावर हालत होतां, तेव्हां नाचणारांच्या पायांपासून जशी धूळ उडते तशी उडाली. हे देवहो, जेव्हां तुह्मी भुवनें भरलींत तेव्हां समुद्रांत लपालेल्या सूर्यास बाहेर काढलेंत."

### (२) जुवेबाज ऋषीचें गाऱ्हाणें ऋ. १०. ३४.

"माझी सासू माझा अति द्वेष करिते, माझी बायको मला जवळ येऊं देत नाहीं. जर्जर झालेल्या गाडीच्या घोडयाचें सुख जसें मला समजत नाहीं तसेंच जुगाऱ्याचें सुख मला दिसत नाहीं. त्याचा बाप, आई, भाऊ हे ह्मणतात कीं, आह्मांला त्याविषयीं कांहीं ठाऊक नाहीं, त्याला बांधून घेऊन जा. त्यांनीं मला पीडूं नये ह्मणून फांसा हातीं धरूं नये असा जरी मीं निश्चय केला, तरी त्याला पाहतांच स्त्री

जशी आपल्या जारापाशीं ज्ञाते तसा मी जुवेबाजांच्या मंडळींत जातों. जुवेबाज मंडळींत येऊन "मी जिंकेन काय" असें विचारितों. फांसे पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटतें. फांसे गळाप्रमाणें टोंचतात, सुरीसारखे भोंसकतात, पीडा करण्यांत त्यांस संतोष वाटतो, आणि जें प्रतिदान ( बक्षीस ) त्यांजपासून मिळतें तें क्षणिक असून जिंकणाराचा पुनः नाश करितात. ते [ फांसे ] खालीं गडबडत जातात, ते वर उडतात. त्यांस हात नाहींत तरी ज्यांस हात आहेत त्यांस ते जिंकितात. हे स्वर्गींचे कोळसे स्वतां थंड आहेत तरी दुसऱ्याचें काळीज भाजतात. जुगाऱ्याला आपल्या बायकोकडे पाहून दुःख होतें, आणि दुसऱ्याच्या सुखी बायका व सुखी कुटुंब पाहून त्याचें तें दुःख वाढतें. मला द्रव्य नकोसें नाहीं, परंतु जें योग्य आहे त्याची मी इच्छा बाळगितों. कधीं जुगार खेळूं नको. शेतकी कर. आपल्या जिनगीचा उपभोग घेऊन तृप्त ऐस. हे जुवेबाजा, पाहा त्या तुझ्या गाई, पाहा ती तुझी बायको ! असें मला ती सन्मान्य सावित्री बोलली. अहो फांसेहो, आह्मांस अनुकूळ व्हा, आपल्या चेटकानें आह्मांस मोहित करूं नका, तुमचा राग व वैर यांचें शमन होवो. तुमच्या शृंखला दुसऱ्याच्या पायांत पडोत."

हें सूक्त फार अर्थबोधक आहे. यावरून वेदधर्मी आर्य लोकांतही मोठे जुवेबाज होते असें दिसतें. ह्या उताऱ्यांत कित्येक मंत्रांचें भाषांतर गाळलें आहे.

असें जें दरिद्रजनक व्यसन त्याविषयीं कृष्ण गीतेंत ह्मणतो कीं, " फसविणारांमध्यें द्यूत ह्मणजे जुवा तो मी आहें." ( गीता. १०. ३६ )

**(३) यज्ञाच्या उच्छिष्टाचें वर्णन. अथर्व. ११. ७. १.**

" उच्छिष्टांत नाम, रूप, लोक, इंद्र, अग्नि, विश्व, स्वर्ग, पृथ्वी, जें सर्व कांहीं आहे तें; जल, समुद्र, चंद्र, आणि वायु हीं राहतात. उच्छिष्टांत सत् आहे व असत् आहे, मृत्यु, अन्न ( किंवा बल ) प्रजापति, ब्रह्म, दहा विश्वकर्त्ते, देवता हीं सर्व जशीं चाकाच्या मांदळास आरी बसविलेल्या असतात तशीं उच्छिष्टास चिकटून राहतात. तसेंच ऋक्, साम्, यजु, स्तोत्रें, नाना यज्ञ, इत्यादिकांचा उच्छिष्टामध्यें समावेश होतो. नवभूमि, समुद्र, आकाशें उच्छिष्टांत आहेत. उच्छिष्टांत सूर्य प्रकाशतो, उच्छिष्ट हा विश्वाचा आधार आहे, तो जनिताचा पिता आहे, तो असूचा प्रपिता ( आजा ) आहे. ऋत, सत्य, राष्ट्र, प्रयत्न, धर्म, कर्म, भूत, भविष्य, वीर्य, लक्ष्मी, बल, समृद्धि, हीं उच्छिष्टाच्याठायीं वास करितात. ज्यांस प्राण म्हणून आहे ते सर्व, ज्यांला नेत्र आहेत ते सर्व, स्वर्गांतील सर्व देवता, ऋक्, साम, मंत्र, छंद, पुराणें, यजु, प्राण, अपान, नेत्र, कर्ण, नाशवंत व अविनाशी स्थिति, सुख, प्रमोद ( आनंद ), पितर, मनुष्यें, गंधर्व, अप्सरा हीं सर्व उच्छिष्टापासून झालीं."

ह्या उताऱ्यांतील शेवटच्या दोन तीन मंत्रांचें मूळः

ऋतं सत्यं तपोराष्ट्रं श्रमो धर्मश्च कर्म च।
भूतं भविष्यदुच्छिष्टं वीर्यं लक्ष्मीर्बलं बले ॥
उच्छिष्टाज्जज्ञिरे सर्वे दिवि देवा दिवि श्रितः।
ऋचैः सामानि छन्दांसि पुराणं यजुषा सह ॥
उच्छिष्टाज्जज्ञिरे० आनन्दामोदाः प्रमुदोऽभीमोद मुदश्च ये ॥
उच्छिष्टा० देवाः पितरो मनुष्या गन्धर्वाप्सरश्चये।
उच्छिष्टाज्जज्ञिरे सर्वे दिवि देवा दिवि श्रितः ॥

### (४) ब्रह्मचारी. अथर्व. ११. ५. १.

" ब्रह्मचारी जन्मला ह्मणजे देव त्यास पाहण्यास जमतात. ब्रह्मदेवाच्या पूर्वी ब्रह्मचारी जन्मला, त्याच्यापासून ब्राह्मण (ब्रह्मज्येष्ठं) झाले. ब्रह्मचाऱ्यानेंच प्रथम ही अफाट पृथ्वी आणि आकाश दानरूप उत्पन्न केलीं. ब्रह्मचारी हाच आचार्य होय. ब्रह्मचारी हा प्रजापति होय. ब्रह्मचर्या ( आत्मनिग्रहा ) कडून व तपाकडून राजा आपल्या राज्याचें रक्षण करितो. ब्रह्मचर्याकडून कन्या तरुणास वरते. ब्रह्मचर्यानें देवांनीं मृत्यूचा नाश केला. पार्थिव व दिव्य प्राणी, अरण्यपशु व ग्रामपशु, सपक्ष व पक्षहीन प्राणी, ब्रह्मचाऱ्यानें उत्पन्न केले. हे प्राणी ब्रह्मज्ञानाकडून रक्षिले जातात, व तें ज्ञान ब्रह्मचाऱ्यापासून झालें. ह्या वस्तु ब्रह्मचाऱ्यानें केल्या; तो समुद्रांत जलावर तप करीत उभा राहिला."

ह्या उताऱ्यांतील कित्येक मंत्रांचें मूळः—

ब्रह्मचर्येण तपसा राजा राष्ट्रं विरक्षति ।
ब्रह्मचर्येण तपसा देवा मृत्युमपाघ्नत ।
तानि कल्पद्ब्रह्मचारी सलिलस्य पृष्ठे ।
तपोऽतिष्ठत्तप्यमानः समुद्रे ॥ ३०.

### ( ५ ) मरणोन्मुख झालेल्यास बरें करण्याचे व शवउत्थापनाचे ( प्रेत उठविण्याचे ) मंत्र. अथर्व. ५. ३०.

" तुझ्या शेजारच्या प्रदेशापासून, तुझ्या शेजारच्या प्रदेशापासून; दुरून व तुझ्या शेजारच्या प्रदेशापासून मी तुला बोलावितों. एथें राहा; प्राचीन पितरांच्या मागें जाऊं नको, जाऊं नको, तुला जर कोणी चेटक केलें असलें तर मी आपल्या

वाचेनें तुला त्यापासून मुक्त करितों. तूं कोणाचें वाईट केलें असलेंस अथवा अविचारानें कोणाला शाप दिला असलास तर मी आपल्या वाचेनें० जर तूं आपल्या आईच्या किंवा बापाच्या पापामुळें तेथें पडला आहेस तर मी आपल्या वाचेनें० तुझा बाप, आई, बहीण, भाऊ, तुला जें औषध देतात तें घे, मी तुला दीर्घायु करितों. हे मनुजा, आपल्या सर्व जीवासुद्धां एथें रहा. त्या दोन यमदूतांच्या मागें जाऊं नको. जीवंतांच्या वस्तीस ये. भिऊं नको, तूं मरणार नाहींस. मी तुला दीर्घायु करितों. ज्या क्षयानें तूं क्षय पावला आहेस तो मी तुझ्या अंगांतून मंत्रानें काढिला आहे. ज्या जरेनें तुझें अंग जीर्ण झालें आहे ती माझ्या वचनाकडून घारीप्रमाणें दूर उडून गेली आहे, बोध आणि प्रतिबोध हे दोन ऋषि जे सावध व जागृत असतात, ते तुझ्या प्राणाचे रक्षक आहेत. ते रात्रंदिवस जागृत असतात. हा पूज्य अग्नि सूर्याप्रमाणें तुजवर उदय पावो. घोर मरणांतून ऊठ. कृष्णतमसां ( काळ्या अंधकारां ) तून ऊठ. यमाला नमस्कार असो, मृत्यूला नमस्कार असो, पितरांस नमस्कार असो, आह्मांस मार्ग दाखविणारांस नमस्कार असो. ह्याचा ( रोगी मनुष्याचा ) प्राण, आत्मा, दृष्टि आणि शक्ति हीं ( परत ? ) येवोत, त्याच्या शरीरास चेतना येवो, आणि तें उठून उभें राहो. हे अग्नि, त्याला प्राण दे, त्याला दृष्टि दे, त्याला सजीव कर, त्याला देह आणि बल दे; तुजपाशीं अमरपणाचें ज्ञान आहे; त्याला जाऊं देऊं नको, अथवा मातीच्या घरांत (भूमिगृहो) राहणारा करूं नको. तुझा प्राण

१ ह्या वचनावरून असें दिसतें कीं, आर्यलोकांत प्रेत पुरण्याची चाल होती.

व अपान ( श्वास व निश्वास ) हे बंद न होवोत. अधिपति जो सूर्य तो तुला आपल्या किरणांनीं उठवो. ही जिव्हा आंत बोलती, ह्या जिव्हेनें मंत्रोच्चार करून मी क्षयरोग व ज्वराच्या शंभर पीडा दिगंतरीं पाठविल्या आहेत. इहलोक अत्यंत प्रिय आहे. देवांनीं तो जिंकिलेला नाहीं. हे मनुजा, तुझ्या जन्मकालीं तुला कोणतेंही मरण नेमलेलें असो, तरी तूं वयानें जर्जर ( वयोवृद्ध ) झाल्यावांचून मरूं नको.

ह्या सूक्ताच्या आरंभींचे व शेवटचे कांहीं मंत्रांचें मूळः—

आवतस्त आवतः परावतस्त आवतः ।
इहैव भव मा नुगा मा पूर्वां नतु गाः पितृनसुं बध्नामि ते दृढम् ॥
यत्त्वाभिचेरुः पुरुषः स्वो यदरणो जनः ।
उन्मोचनप्रमोचने उभे वाचा वदामि ते ॥
यद्द्रुद्रोहिथ शेपिषे स्त्रियै पुंसे अचित्या । उन्मो० ॥
नमो यमाय नमो अस्तु मृत्यवे नमः पितृभ्य उतये नयन्ति ।
उत्पारणस्य यो वेद तमग्निं पुरो दधेऽस्मा अरिष्टतातये ॥
ऐतु प्राण ऐतु मन ऐतु चक्षुरथो बलम् ।
शरीरमस्य संविदां तत्पद्भ्यां प्रति तिष्ठतु ॥
अयं लोकः प्रियतमो देवानामपराजितः ।
यस्मै त्वमिह मृत्यवे दिष्टः पुरुष जज्ञिषे ।
स च त्वानु ह्वयामसि मा पुरा जरसो मृथाः ।

---

## प्रकरण ९.

## ब्राह्मणें.

वेदांचा दुसरा भाग ब्राह्मण होय. यांत वेदमंत्रांचे विधि व अर्थ सांगितले आहेत. ब्राह्मणें वेदांच्या मागून लिहिलेलीं असून जेव्हां आर्य लोक हिंदुस्थानांत वायव्य प्रांतांत

स्थाईक झाले तेव्हांचीं तीं आहेत असें विद्वान् लोकांचें मत आहे. प्रत्येक वेदसंहितेचीं ब्राह्मणें आहेत. ऋग्वेदाचें **ऐतरीय** व **कौषीतकी** अशीं फार प्राचीन ब्राह्मणें आहेत. यजुर्वेदाचीं **तैत्तिरीय** व **शतपथ** ब्राह्मणें आहेत. सामवेदाचीं आठ ब्राह्मणें आहेत, त्यांत **पंचविंश** किंवा **प्रौढ, षड्विंश, तांड्यमहाब्राह्मण** हीं प्रसिद्ध आहेत. अथर्ववेदाचें **गोपथ** ब्राह्मण आहे.

## ब्राह्मणांतील वेंचे.

### (१) अग्नीचें श्रेष्ठत्व.

"अग्नि हा सर्व देवांमध्यें पहिला आहे व विष्णु शेवटला आहे. त्या उभयतांच्या मध्यें दुसरे देव आहेत."

"अग्निर्वै देवानामवमो विष्णुः परमस्तदंतरेण सर्वा अन्या देवताः (ऐतरीय ब्रा.)

### (२) स्वर्गप्राप्तीचा उपाय.

"ज्याला स्वर्ग पाहिजे त्यानें दोन अनुष्टुभ करावे ते हे, त्व अग्ने वसून्."

"ज्याला सौंदर्य व ज्ञान पाहिजे त्यानें स्विष्टकृत दोन गायत्री मंत्र जपावे."

### (३) शुनःशेपाची कथा.

ब्राह्मणांच्या काळांत आर्य लोकांमध्यें नरमेध करण्याची चाल होती. त्याविषयीं ऐतरीय ब्राह्मणांतील शुनःशेपाची गोष्ट साक्षीभूत आहे. ती संक्षेपानें येणेंप्रमाणें आहेः—

हरिश्चंद्र राजाला पुत्रसंतान नव्हतें तेव्हां त्यानें वरुणाला असा नवस केला कीं, मला पुत्र दे ह्मणजे तो मी तुला

अर्पण करीन; त्याप्रमाणें त्याला पुत्र झाला. त्याचें नांव त्यानें रोहित ठेविलें. पुढें राजा आपला नवस फेडण्याविषयीं टाळाटाळ करूं लागला, तेव्हां वरुणानें त्याला जलोदराच्या रोगानें पीडिलें. मग राजपुत्राला जेव्हां समजलें कीं, बाप माझा यज्ञ करणार आहे, तेव्हां तो अरण्यांत पळत सुटला. तेथें सहा वर्षें भ्रमण करीत असतां त्याला अजीगर्त नामक ऋषि भेटला, त्यानें त्याचें वृत्त ऐकिल्यावर आपल्या सहा पुत्रांपैकीं शुनःशेप नांवाच्या पुत्राला शंभर गाई घेऊन त्याच्याबद्दल वरुणास देण्याचें कबूल केलें. नंतर रोहितानें त्याला आपल्या बापापाशीं आणिलें. त्या समयीं यज्ञ करायास विश्वामित्र होता होता, जमदग्नि अध्वर्यु होता, वसिष्ठ ब्रह्मा होता, अयास्य हा उद्‌गाता होता. परंतु जेव्हां शुनःशेपाला सिद्ध करून आणिलें, तेव्हां त्याला यज्ञस्तंभाला बांधावयास कोणी मिळेना. मग त्याच्या बापानेंच आणखी शंभर गाई घेऊन तें काम करावयाचें पत्करिलें. परंतु शुनःशेपाला अग्निप्रदक्षिणा करावयास लाविल्यावर त्याचा वध करावयास कोणी मिळेना. तेव्हां तेंही कर्म करायास अजीगर्त आणखी शंभर गाईंवर मान्य झाला. याप्रमाणें मरण जवळ आलें असें पाहून शुनःशेपानें देवांचा धांवा मांडिला. प्रथम त्यानें प्रजापतीचा धांवा केला. प्रजापति ह्मणाला, अग्नि हा जवळचा देव आहे. त्याची प्रार्थना कर. अग्नि ह्मणाला, सावित्री सर्वांवर राज्य करिती. ती ह्मणाली, तुला वरुणासाठीं बांधलें आहे, त्यापाशीं जा. वरुण ह्मणाला, अग्नि देवांचें मुख आहे. अग्नि ह्मणाला, विश्वेदेवांची आराधना कर. ते ह्मणाले, इंद्र सर्व देवांत श्रेष्ठ आहे, त्याची स्तुति कर. इंद्र त्याच्या स्तुतीस

संतुष्ट होऊन मनांत त्याला एक रथ बक्षीस देऊन ह्मणाला कीं, अश्विनींची स्तुति गा, ह्मणजे आह्मी तुला मुक्त करूं. तेव्हां त्यानें तीन मंत्रांनीं त्यांची स्तुति केली. नंतर त्याचे बंद सुटले.

शुनःशेपानें देवांच्या स्तुतीचे जे मंत्र ह्मटले ते ऋ. वेदाच्या पहिल्या मंडळाच्या सहाव्या अनुवाकांत आहेत. त्यांचा अर्थ वेदार्थ यत्न नामक सुप्रसिद्ध ग्रन्थांत पहावा.

हरिश्चंद्राची पौराणिक कथा.

हरिश्चंद्राची कथा पुराणांत निराळ्या प्रकारें सांगितली आहे. त्यांत त्याला विश्वामित्रानें शाप दिला असें सांगितलें आहे. वेदांत तर विश्वामित्र त्याचा पुरोहित होता व वसिष्ठ ब्रह्मा होता असें ह्मटलें आहे. रामायणांत शुनःशेपाचा यज्ञ अंबरीष राजाच्या वेळीं झाला असें सांगितलें आहे.

## ( ४ ) पुत्रमाहात्म्य.

“ बापानें पुत्रमुख पाहिलें ह्मणजे तो ऋणमुक्त होऊन अमरत्व पावतो.” “ पुत्रसुख पृथ्वी, अग्नि व जल यांच्या सुखापेक्षां उत्तम आहे.”

“ वडिलांनीं पुत्राच्या योगें सर्वदा अंधकारास जिंकिलें; कारण आत्म्यापासून त्याचा आत्मा जन्मतो. नवीन जन्मलेला आत्मा ( पुत्र ) त्याला अन्नानें भरलेल्या नौकेप्रमाणें पैलतीरीं नेणारा आहे.

“ देह काय आहे ? कातडी काय आहे ? केश काय आहेत ? उष्णता काय आहे ? अहो ब्राह्मणहो, पुत्रप्राप्ति करून घ्या. तो लोक ( भुवन-जग ) आहे.”

“ मनुष्याचें जीवन अन्न आहे; वस्त्र त्याचें अच्छादन

आहे; सुवर्ण त्याचें रूप आहे; बायको त्याची सखी आहे; कन्या दुःखास कारण ( किंवा नीच-दरिद्री आहे; परंतु पुत्र परमलोकांत त्याचा प्रकाश आहे."

"ज्याला पुत्र नाहीं त्याला जीवन नाहीं."

ह्यांतून शेवटल्या दोन वचनांचें मूळ येणेंप्रमाणें आहे.

अन्नं ह प्राणः शरणं ह वासो, रूपं हिरण्यं पशवो विवाहाः।
सखा ह जाया कृपणं ह दुहिता, ज्योतिर्ह पुत्रः परमे व्योमन्।

ऐ०ब्रा०

## (५) जलप्रलयाची कथा.

शतपथ ब्राह्मणः—

"एका प्रातःकाळीं मनूला हात धुवायास पाणी आणिलें. तो हात धूत असतां त्याच्या हातांत एक मासा आला. तो मनूला ह्मणाला, "तूं मला आपल्याजवळ ठेवून घे ह्मणजे मी तुझें रक्षण करीन." मनु ह्मणाला, "कशापासून तूं माझें रक्षण करिशील?" मासा ह्मणाला, "जलप्रलय ह्या सर्व प्राण्यांस वाहून नेणार आहे त्यापासून मी तुझें रक्षण करीन." मनु—"तुला कसें ठेवावें?" मासा—"आह्मी लहान आहों तोंपर्यंत आमचा फार नाश होतो, माशास मासे खातात; तूं मला घागरींत ठेव, जर मी तींत मावेनासा इतका वाढलों तर एक खळगा खणून त्यांत ठेव. त्यांत मावेनासा झालों तर मला समुद्रांत ठेव, ह्मणजे माझा नाश होणार नाहीं." मग तो मासा लवकरच मोठा झाला आणि मनूला ह्मणाला, "ज्या वर्षीं माझी वाढ पुरी होईल त्या वर्षीं जलप्रलय येईल. तर नौका बांध व मला भज. मग जेव्हां प्रलयाचें पाणी चढेल तेव्हां नौकेंत जा." मनूनें मत्स्य समुद्रांत सोडला,

आणि त्यानें सांगितलेल्या वर्षी नौका बांधिली. आणि मत्स्याचें पूजन केलें. मग जेव्हां प्रलयाचें जल चढलें तेव्हां तो गलबतांत गेला. मत्स्य त्याकडे पोहत आला; आणि मनूनें त्याच्या शृंगास नौका बांधिली. मत्स्यानें त्याची नौका उत्तर पर्वतावर नेली."

ह्या कथेंत मनूशिवाय जलप्रलयापासून कोणी वांचला नाहीं असें स्पष्ट सांगितलें आहे. पुढें त्याला संततीची इच्छा झाल्यावरून त्यानें कांहीं धर्मक्रिया केल्यामुळें पाण्यांतून इडा नामक एक स्त्री उत्पन्न झाली. त्या उभयतांपासून पुढें मनुष्यसंतति वाढली अशी कथा आहे. यांत चार जातींच्या उत्पत्तीविषयीं कांहीं उल्लेख नाहीं.

जलप्रलयाविषयीं पुराणांत ज्या कथा आहेत, त्या पाल्हाळिक असून त्यांत पुष्कळ नवीन गोष्टी घातल्या आहेत. ह्या कथेंत दोन गोष्टी लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत; त्या ह्या कीं, मनूच्या बरोबर नौकेंत कोणी ऋषि नव्हते व मनूच्या पासूनच जलप्रलयानंतर सर्व प्रजेची उत्पत्ति झाली.

### ( ६ ) कृष्णमृगाचे मंत्र.

वेदांत दर्शपूर्णमास इष्टी नामक अमावास्येस व पौर्णिमेला करायाचा यज्ञ सांगितला आहे, तो करण्याची रीत शतपथ ब्राम्हणांत वर्णिली आहे, त्यांतून कृष्णमृगाचे ( काळविटाचे) कातड्याविषयीं जे मंत्र आहेत ते येणेंप्रमाणें:—

१. आतां तो ( यज्ञ करणारा ) यज्ञाच्या सांगतेसाठीं कृष्णमृगचर्म घेतो. कारण एकदां यज्ञ देवांपासून पळून गेला आणि कृष्णमृग होऊन चहूंकडे भ्रमण करूं लागला.

नंतर देवांस तो मिळाल्यावर त्यांनीं त्याचें कातडें काढून तें आपल्याबरोबर आणिलें.

२. त्याचे काळे व पांढरे केश ऋक् व साम ह्या वेदांचे मंत्र आहेत; उदी व पिंवळ्या रंगाचे केश यजुष् मंत्र होत.

३. याप्रमाणें तो कृष्णमृगचर्म घेऊन त्यावर तांदूळ कांडतो. तेव्हां असा मंत्र म्हणतो कीं, "हे शर्मन्!" कारण चर्म ( कातडें ) हें मनुष्यें जें वापरतात त्या हरणाच्या कातडीचें नांव आहे; परंतु शर्मन् ( सुख ) हा शब्द देवांमध्यें वापरतात. यास्तव तो त्याला " तूं सुखदायक आहेस!" असें म्हणतो. तो तें झटकतांना हा मंत्र म्हणतो:—"राक्षस झटकून टाकले आहेत. शत्रु झटकून टाकले आहेत." ह्या मंत्रानें तो राक्षसांस आपणांपासून दूर घालवितो.

४. तो तें ( कातडें ) केश वर करून मानेचा भाग पश्चिमेकडे फिरवून भूमीवर पसरतो, आणि हा मंत्र म्हणतो:- " तूं अदितीचें कातडें आहेस; अदिति तुझा स्वीकार करो. कारण अदिति पृथ्वी आहे, आणि जें कांहीं तिजवर आहे तें तिचें कातडें आहे."

५. तो राक्षस चढून येतील अशा भयानें आपल्या उजव्या हातांत लागलेंच मुसळ घेतो. कारण ब्राम्हण ( उपाध्या ) हाच राक्षसांस मागें हटविणारा आहे. ( श० ब्रा० १ कांड. १ अध्या. ४ ब्रा० )

### (७) अग्निहोत्र.

१. आरंभीं प्रजापति एकलाच होता. मी प्रजा कशी होईन असा त्यानें विचार केला. त्यानें श्रमानें तप केलें. त्याच्या मुखापासून अग्नि जन्मला. अग्नि जन्मला म्हणून अग्नि

अन्नभक्षक आहे. याप्रमाणें अग्नि अन्नभक्षक आहे असें जो जाणतो तो स्वतां अन्नभक्षक होतो.

२. त्यानें त्याला देवांच्या पूर्वी (अग्रे) उत्पन्न केलें म्हणून त्याला अग्नि म्हणतात. लोक म्हणतात कीं, अग्नि व अग्री एकच आहे, कारण जो प्रथम जातो तो पुढें जातो असें म्हणतात. याप्रमाणें अग्नीची उत्पत्ति व स्वभाव आहे.

३. प्रजापतीनें मग विचार केला कीं, अग्नीला मीं आपणाकरितां अन्नभक्षक उत्पन्न केला, परंतु माझ्याशिवाय एथें दुसरें अन्न नाहीं. मला तर तो खचित खाणार नाहीं. त्या काळीं पृथ्वी अगदीं दग्ध झालेली होती, तिजवर वनस्पति किंवा वृक्ष नव्हते. ह्याची त्याच्या मनाला चिंता लागली.

४. नंतर अग्नि आपलें मुख उघडून प्रजापतीकडे फिरला. आणि प्रजापति भयभीत होत्साता त्याची महिमा ( मोठेपण ) त्याजपासून निघून गेली. त्याची वाचा हीच त्याची महिमा आहे. त्यानें आपणांमध्यें आहुति इच्छिली, आणि आपले हात चोळले; आणि त्यानें हात चोळले म्हणून हातांचे तळवे केशरहित आहेत. मग त्यानें घृताहुति किंवा पेयाहुति ( दूधाची आहुति ) मिळविली; परंतु दोन्ही दूधच आहेत.

५. ह्या आहुतीनें त्याची तृप्ति झाली नाहीं, कारण ती केशमिश्रित होती. त्यानें ती ‘ जळत असतां पी ’ (ओषंधय) असें म्हणून अग्नींत ओतली; त्यापासून वनस्पति उगवली म्हणून तिला औषधि ( औषधयः ) म्हणतात. त्यानें

आपले हात दुसऱ्यानें चोळले आणि दुसरी आहुति मिळविली, ती घृताहुति किंवा पेयाहुति होती, तरी तीं दोन्हीं दूधच आहेत.

६. ह्या आहुतीनें त्याची तृप्ति झाली. तो आशंकित होऊन मी आहुति टाकूं किंवा नको टाकूं? असा विचार करूं लागला. त्याची महिमा त्याला ह्मणाली, आहुति दे. आपली ( स्व ) महिमाच त्याला बोलली ( आह ) हें प्रजापतीला ठाऊक होतें, यासाठींच आहुति टाकतांना "स्वाहा" म्हणतात. त्यावर तो तपणारा ( सूर्य ) उगवला, आणि मग तो वाहणारा ( वायु ). मग अग्नि पराङ्मुख झाला. ( ह्मणजे त्यानें तोंड फिरविलें. )

७. प्रजापतीनें आहुति दिल्यावर आपणास पुनः उत्पन्न केलें, आणि अग्नीपासून रक्षिलें. अग्नि हा मृत्यु होता. तो त्याला भक्षणार होता. जो कोणी हें जाणतो व अग्निहोत्र करितो तो जसा प्रजापति आपण पुनः उत्पन्न झाला तसा संतानाच्या द्वारें पुनः उत्पन्न होतो, आणि अग्नि जो मृत्यु तो त्याला भक्षण करूं लागला असतां त्यापासून आपलें रक्षण करितो.

८. आणि तो मेल्यावर जेव्हां लोक त्याला अग्नीवर ठेवितात तेव्हां अग्नींतून पुनः जन्मतो. अग्नि त्याच्या शरीराचें मात्र दहन करितो. तो जसा आपल्या मातापितरांपासून झालेला असतो तसा तो अग्नीपासून जन्मतो. परंतु जो अग्निहोत्र करीत नाहीं तो पुनः जन्मास येत नाहीं. यास्तव अग्निहोत्र केलेंच पाहिजे.

ह्या उताऱ्यांत कित्येक गोष्टी विचारणीय आहेत, त्या

सांगण्यापूर्वीं ज्यांचें आपल्या धर्मग्रंथांचें संस्कृत मूळ पाहिल्याशिवाय समाधान होत नाहीं, त्यांच्याकरितां वरच्या स्थळांतील कांहीं मंत्रांचें मूळ देतों:—

प्रजापतिर्ह वाऽइदमग्रऽएक एवास । स ऐक्षत कथं नु प्रजायेयेति सो ऽश्रमात्स तपोऽतप्यत सोऽग्निमेव मुखाज्जनयांचक्रे तद्यदेनं मुखादजनयत तस्मादन्नादोऽग्निः स यो हैवमेतमग्निमिन्नादं वेदान्नादो हैव भवति ॥ १ ॥ तद्वाऽएनमेतदग्रे देवानामजनयत । तस्मादग्निरग्निर्ह वै नामैतद्यग्निरिति स जातः पूर्वः प्रेयाय यो वै पूर्व एत्यग्रएतीति वै तमाहुः साऽएवास्याग्निता ॥२॥ अथैनमाग्निर्व्यात्तेनोप पर्यावबर्त । तस्य भीतस्य स्वो महिमापचक्राम वाग्वा अस्य स्वो महिमा वागस्यापचक्राम स आत्मन्नेवाहुतिमीषे स उदमृष्ट तद्यदुदमृष्ट तस्मादिदं चालोमकमिदं च तत्र विवेद घृताहुतिं वैव पय आहुतिं वोभयं ह त्वेव तत्पय एव ॥ ४ ॥

आतां ज्या महत्त्वाच्या गोष्टींची सूचना ह्या उताऱ्यांत आहे त्या अशा:—अग्निहोत्र कसें उत्पन्न झालें याविषयींची यांत कथा आहे. प्रजापतीनें प्रथम अग्नि केला असें सांगितलें आहे, परंतु ऋग्वेदांत व इतर ब्राह्मणांत प्रजापतीनें अग्नीच्या पूर्वीं अनेक वस्तु म्हणजे अरुण, केतु, सूर्य इ० केले, तें असो. दुसरी गोष्ट. प्रजापति आपण केलेल्या पदार्थास पाहून भ्याला. तिसरी. प्रजापतीनें आपले हातांचे तळवे एकमेकांशीं चोळले तेणेंकरून त्यांचे केश गळून पडले, त्यापूर्वीं तळव्यांस केश होते ! चवथी. अग्नीपासून औषधि झाली. सहाव्या मंत्रांत आहुति टाकतेवेळीं जो "स्वाहा" ह्मणतात त्याचें कारण सांगितलें आहे. सातव्या व आठव्या मंत्रांत अग्निहोत्र करणारा पुत्राच्या द्वारें पुनः जन्मास येतो असें सांगितलें आहे, ह्मणून अग्निहोत्र अवश्य करावें.

जन्ममरणापासून सुटणें हीच मुक्ति आहे असें जें वेदांती ह्मणतात त्या मताला हें अग्निहोत्राचें फळ अगदीं विरुद्ध आहे.

### (८) गुरांच्या देवाविषयीं.

१. यज्ञाच्या योगानें देव स्वर्गास गेले. परंतु गुरांवर अधिकार करणारा देव एथें मागें राहिला. यास्तव ते लोक त्याला ( वास्तव्य ) ह्मणतात. कारण तो यज्ञाचें जें " वस्तु " नामक स्थळ तेथें मागें राहिला होता.

२. देव ज्या यज्ञानें स्वर्गास चढले त्यानेंच उपासना व कष्ट करीत चालले. परंतु जो देव गुरांवर सत्ता चालवितो, व जो मागें राहिला होता,

३. त्यानें काय झालें तें पाहून ह्मटलें, मी मागें राहिलों आहें. ते मला यज्ञांतून बाहेर ठेवीत आहेत. तो त्यांच्या मागून गेला. त्यानें आपलें शस्त्र उचललें व उत्तरेवर चढला.

४. देव ह्मणाले, " फेंकूं नको." तो ह्मणाला, " मला यज्ञापासून वर्जूं नको ! मजकरितां अर्पण वेगळें काढून ठेव !" त्यानें आपलें शस्त्र मागें घेतलें, आणि तें फेंकलें नाहीं, अथवा कोणास त्यानें दुखविलें नाहीं. ( १ कां. ७ अ. ३ ब्रा. )

### ( ९ ) वसिष्ठाचें श्रेष्ठत्व.

"इंद्रानें विश्वामित्रास उक्थ ( स्तोत्र ) कळविलें. आणि वसिष्ठास ब्राह्मण सांगितलें. उक्थ वाचा आहे; तें त्यानें विश्वामित्रास कळविलें. ब्राह्मण आत्मा आहे तो त्यानें विश्वामित्रास कळविला. यास्तव हें ब्राह्मण वसिष्ठाचें आहे. यास्तव अशा प्रकारचा मनुष्य, अथवा वसिष्ठाच्या कुळांतील मनुष्य ब्राह्मण उपाध्या नेमावा." ( षड्विंश ब्रा. १.२९. )

वसिष्ठ व विश्वामित्र यांचा ब्राम्हणत्वाविषयीं जो मोठा दीर्घ द्वेष पडून कलह लागला होता त्यासंबंधीं हें वाक्य आहे.

**( १० ) सूर्यास्ताविषयीं.**

ऐतरेय ब्राम्हणांत असें सांगितलें आहे कीं, सूर्य कधीं अस्तास जात नाहीं. आणि जे कोणी हें जाणतात ते सायुज्यता, सरूपता व सलोकता पावून सूर्यलोकीं राहतात. इंग्लिश ज्योतिषाचा अभ्यास करणारांस ही मोठी सुवार्त्ता होय.

**( ११ ) सृष्ट्युत्पत्ति.**

प्रारंभीं ही सृष्टि जलमय होती. जलाशिवाय कांहीं नव्हतें. जलें म्हणालीं, आम्ही कशीं पुनः निर्माण होऊं ? असें म्हणून त्यांनीं श्रम केले. त्यांनीं तप केलें. तीं तप करीत असतां एक सुवर्णअंड उत्पन्न झालें. उत्पन्न झाल्यावर एक वर्ष झालें. यास्तव हें सुवर्णअंड एक वर्षपर्यंत तरंगत होतें. त्यापासून एका वर्षांत एक पुरुष झाला. तो प्रजापति होता. याच कारणामुळें स्त्री अथवा गाई अथवा घोंडी एका वर्षांत प्रसवते. कारण एका वर्षांत प्रजापति जन्मला. त्यानें तें सुवर्णअंड विभागलें. मग त्याला आश्रयाचें स्थान नव्हतें. म्हणून तो वर्षभर ह्या अंडयांत तरंगत राहिला. एका वर्षांत तो बोलायास इच्छूं लागला. त्यानें 'भूर्' म्हटलें, ती ही पृथ्वी झाली. त्यानें 'भुवः' म्हटलें, तें हें अंतरिक्ष झालें. त्यानें 'स्वर्' म्हटलें, त्याचें हें द्यौ ( स्वर्ग ) झालें. यास्तव लेंकरूं एका वर्षांत बोलूं इच्छितें, कारण प्रजापति एका वर्षांत बोलूं लागला. तो सहस्र वर्षांचे आयुष्यासहित जन्मला. त्यानें आपल्या आयुष्याचा शेवट पूर्वींच पाहिला,

जसा कोणी नदीचें पैलतीर पाहतो तसें. संततीची इच्छा धरून तो अर्चा व श्रम करीत राहिला. त्यानें आपणांतच गर्भधारण केलें. आपल्या मुखापासून त्यानें देव उत्पन्न केले. हे देव दिवास ( स्वर्गास ) पोंचल्यावर उत्पन्न केले. हें देवांचें देवत्व आहे. तो उत्पत्तिकर्म करीत असतां त्याला जणूं काय दिवस ( दिवा ) झाला. देवांचें देवत्व हेंच आहे. त्याच्या निःश्वासापासून असुर झाले. ते ह्या पृथ्वीवर येऊन पोंचत असतां उत्पन्न केले. त्यांस करिते वेळीं त्याला अंधकार दिसला. मीं पाप केलें हें त्याला ठाऊक होतें, कारण "मी उत्पन्न करितांना अंधार दिसला," हें त्याला ठाऊक होतें. प्रजापतीनें हे देव उत्पन्न केले—अग्नि, इंद्र, सोम आणि परमेष्ठी":—

आपो ह वाऽइदमग्रे सलिलमेवास । ता अकामयन्त कथं नु प्रजायेमहीति ता अश्राम्यस्तास्तपोऽतप्यन्त तासु तपस्तप्यमानासु हिरण्मयमाण्डं सम्बभूवाजातो ह तर्हि संवत्सर आस तदिदं हिरण्मयमाण्डं यावत्संवत्सरस्य वेला तावत्पर्यप्लवत ॥ १ ॥ ततः संवत्सरे पुरुषः समभवत् । स प्रजापतिस्तस्मादु संवत्सरऽएव स्त्री वा गौर्वा वडवा वा विजायते संवत्सरे हि प्रजापतिरजायत स इदं हिरण्मयमाण्डं व्यरुजन्नाह तर्हि काचन प्रतिष्ठास तदेनमिदमेव हिरण्मयमाण्डं यावत्संवत्सरस्य वेलासीत्तावद्बिभ्रत्पर्यप्लवत ॥ २ ॥ स संवत्सरे व्याजिहीर्षत् । स भूरिति व्याहरत्सेयं पृथिव्यभवद्भुव इति तदिदमन्तरिक्षमभवत्स्वरिति सासौ द्यौरभवत्तस्मादु संवत्सर ऽएव कुमारो व्याजिहीर्षति संवत्सरे हि प्रजापतिर्व्याहरत् ॥ ३ ॥ स सहस्रायुर्जज्ञे । स यथा नद्यै पारं परापश्येदेवं स्वस्यायुषः पारं पराचख्यौ ॥ ६ ॥ सोऽर्चं श्राम्यंश्चचार प्रजाकामः । सः आत्मन्येव प्रजापातिमधत्त स आस्येनैव देवानसृजत ते देवा दिवमभिपद्यासृज्यन्त तद्देवानां देवत्वं यद्दिवमभिपद्यासृज्यन्त तस्मै ससृजानाय दिवे वास

तद्देव देवानां देवत्वं यदस्मै ससृजानाय दिवे वास ॥ ७ ॥ अथ योऽयमवाङ्प्राणः। तेनासुरानसृजत तऽइमामेव पृथिवीमभिपद्यासृज्यन्त तस्मै ससृजानाय तम इवास ॥ ८ ॥ सोऽवेत्। पाप्मानं वाऽअसृक्षि यस्मै मे ससृजानाय तम इवाभूदिति तांस्तत एव पाप्मना विध्यत्ते तत एव पराभवम् ॥ ९ ॥ ता वाऽएताः। प्रजापतेरधिदेवता असृज्यन्ताग्निरिन्द्रः सोमः परमेष्ठी प्राजापत्यः ॥ १४ ॥

(श० ब्रा० ११.१.६.१–१४)

### (१२) देव, मनुष्य व मृत्यु यांची उत्पत्ति.

प्रजापतीनें प्रजा उत्पन्न केली. त्यानें आपल्या ऊर्ध्व-श्वासापासून देव उत्पन्न केले. त्यानें आपल्या प्राणापासून खालच्या श्वासापासून मर्त्य प्रजा उत्पन्न केल्या. प्रजांच्या मागून मृत्यु उत्पन्न केला. ह्या प्रजापतीचें अर्ध अमर होतें व अर्ध मर्त्य होतें. त्याच्या मर्त्य भागानें तो मृत्यूला भ्याला, भिऊन तो माती व पाणी होऊन ह्या पृथ्वींत शिरला. मृत्यु देवांस ह्मणाला, ज्यानें आह्मांस उत्पन्न केलें तो काय झाला? ते ह्मणाले, तुला भिऊन तो पृथ्वींत शिरला. मृत्यु ह्मणाला, त्याचा आपण शोध लावूं आणि त्याला गोळा करूं. मी त्याला मारणार नाहीं. देवांनीं त्याला ह्या पृथ्वीवर गोळा केलें. जो त्याचा अंश पाण्यांत होता तें पाणी त्यांनीं जमा केलें. ज्या मातीच्या भागांत त्याचा अंश होता ती माती त्यांनीं गोळा केली. हीं दोन, माती व पाणी गोळा केल्यावर त्यांनीं एक ईट केली. यामुळें माती आणि पाणी यांची ईट होते. त्याचे पांच अंश मर्त्य आहेत, म्हणजे केश, चर्म, मांस, अस्थि, आणि मज्जा ( मेंदु ); आणि पांच–अमर्त्य आहेत; ह्मणजे मन, वाणी, प्राण (श्वास), नेत्र, कर्ण. देव ह्मणाले, आपण

त्याला अमर्त्य करूं. असें ह्मणून मर्त्यभागाला अमर्त्य अंशांनीं वेष्टून त्यांनीं तें अमर्त्य केलें. तेव्हांपासून प्रजापति अमर झाला." ( श० ब्रा० १०. १. ३. १.)

[ ग्रंथविस्तारभयास्तव ह्या स्थळाचें मूळ दिलें नाहीं. ]

---

## प्रकरण १०.
## उपनिषदें व आरण्यकें.

वेदाचा तिसरा भाग उपनिषदें हीं होत. यांत वेदाचें रहस्य आहे असें हिंदु लोक समजतात; आणि वेद, मंत्र व ब्राह्मण हीं जशीं त्यांस प्रमाण आहेत तशींच हीं मानितात, इतकेंच नाहीं, तर तीं वेदापेक्षांही श्रेष्ठ आहेत असें समजतात. महाभारतांत ( आदिप. २. ५८ ) आरण्यकेंही वेदाच्या इतर भागापेक्षां श्रेष्ठ असून अमृत व सर्वोत्तम औषधि आहेत असें म्हटलें आहे. वेदमंत्रांपेक्षां यांचा अभ्यास ज्ञानी लोक विशेष करितात; याचें कारण असें आहे कीं, वेदांतील साध्या व संसारविषयक प्रार्थना व ब्राह्मणांतील कंटाळवाणे कर्मविधि व लांबलचक दंतकथा यांकडून प्राचीन आर्य लोकांचें जसें समाधान होत असे तसें त्यांच्या पश्चात् झालेल्या पंडितांचें होईना, व श्रुतीपेक्षां कांहीं गूढ आत्मविचार असावेत अशी तृष्णा त्यांस उत्पन्न होऊन पुढें जे वेदांतादि ब्रम्हविचाराचे वृक्ष वाढले त्यांचें बीजारोपण ह्या उपनिषदांत झालें.

'संसद्, परिषद्' वगैरे कांहीं 'सद्'=बसणें या धातूपासून निघालेले स्त्रीलिंगी शब्द संस्कृतांत प्रचारांत आहेत. 'जींत एकत्र ( सम ) किंवा सभोंतीं (परि) बसतात' ती 'संसद्'

किंवा परिषद्. पूर्वीचा शब्द साधारण सभेस लावण्याची व 'परिषद्' विद्वद्वृंदास किंवा धर्मशास्त्रांच्या समूहास लावण्याची वहिवाट आहे. 'उपनिषद्' शब्दही या दोन शब्दांप्रमाणें झालेला दिसतो. 'उप=जवळ' 'निषद्=खालीं' अर्थात् जमिनीवर बसतात जींत ती 'उपनिषद्'; अर्थात् या जगाचा सृष्टि, स्थिति व लय करणाऱ्या ब्रह्माचा विचार जमिनीवर एकमेकांजवळ बसून करणारी मंडळी. हळू हळू असल्या मंडळीच्या विचारासही उपनिषद् शब्द लावण्यांत येऊं लागला. 'सद्' धातूचा तोडणें असाही अर्थ आहे, तेव्हां जन्ममरणादिकांचा पाश जी अत्यंत तोडून टाकते, अर्थात् मोक्षलाभ करून देते ती 'उपनिषद्', अशी शंकराचार्यांनीं उ० शब्दाची व्युत्पत्ति केली आहे. जितक्या वेदाच्या शाखा तितक्या प्रत्येक वेदाच्या मंडळ्या व तितके त्यांचे ब्रम्हविचार झाले." ( हिंदुधर्म विवेचक. )

**आरण्यकें** हीं उपनिषदांचेच कांहीं भाग आहेत, ते अरण्यांत रचिले होते अथवा अरण्यांत वाचण्यासाठीं रचले होते, त्यावरून त्यांस हें नांव पडलें. षट्दर्शनांचे कर्त्ते स्वमतस्थापनार्थ उपनिषदांचें प्रमाण वारंवार घेतात. कठ उपनिषदांत असें वाक्य आहे कीं, "परमात्मा प्रवचनांनीं ( ब्राम्हणांनीं ), वेदश्रुतीनें अथवा बुद्धीनें समजत नाहीं. तर ज्यास तो निवडतो तोच त्याला जाणतो. तो आत्मा त्याचें शरीर आपलेंच शरीर असें निवडून घेतो।"

नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।
यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा वृणुते तनूं स्वाम् ॥

( कठ. उ. २. २३. )

आणखी एका उपनिषदांत असें ह्मटलें आहे कीं, "ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छन्द, ज्योतिष हीं सर्व अपरा विद्या होत, आणि परा विद्या तीच आहे कीं जिच्या द्वारें अक्षय ब्रह्मज्ञान होतें."

अपरा आणि परा विद्या.

( मुंडकोपनिषद्. १. ५. )

ह्या उपनिषदाचा एक टीकाकार असें ह्मणतो कीं, "वेदामध्यें रूपक आणि अपरा श्रुति बहुत आहेत, त्यांकडून मनुष्य भ्रांतींत पडण्याचा संभव आहे; यास्तव ब्रह्मजिज्ञासूस केवळ परा श्रुति अवलंबन केल्या पाहिजेत." याप्रमाणें ईश्वरप्रणीत मानलेला जो वेद त्याचाही अधिकार उपनिषदांत गौण धरिला आहे.

वेदश्रुति भ्रांतिकारक.

उपनिषदांत ईश्वर, सृष्ट्युत्पत्ति, मनुष्य, धर्म इ० अनेक विषयांचा विचार केला आहे, आणि जे सिद्धांत त्यांत स्थापिले आहेत ते परस्परविरुद्ध, बुद्धिविरुद्ध व श्रुतीविरुद्ध जरी आहेत तरी ते प्रमाण मानिले आहेत; त्यांतच परमश्रेष्ठ ब्रह्मविद्या आहे असें सांगितलें आहे. उपनिषदांच्या एका मताप्रमाणें ईश्वर मनुष्याच्या अंतरीं वसतो; त्याचें ज्ञानसंपादनार्थ ईश्वरीशास्त्र किंवा प्रगटविणें पाहिजे असें नाहीं. "अणूपेक्षां सूक्ष्म, सर्व स्थित वस्तूंपेक्षां मोठें असें जें ब्रह्म तें प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणाच्या खळींत वास करितें. त्याचें दर्शन जो मनुष्य कामना ( इच्छा ) व दुःखरहित झाला आहे त्याला होतें." ध्यानाच्या योगें ईश्वरप्राप्ति होते हा उपनिषदांचा सारांश आहे.

उपनिषदांतील विषय.

परंतु त्याच्या दुसऱ्या मतांत मनुष्यच ईश्वर आहे असें स्पष्ट सांगितलें आहे:—

**सत्य काय आहे ?:—**

"जशा मधुसंग्रह करणाऱ्या मक्षिका नाना वृक्षांचें सत्व जमा करून त्याचा एक रस करितात आणि त्यास त्याला आपण निरनिराळ्या वृक्षांचे होतों त्याची कल्पना राहात नाहीं, तसे, उत्पन्न केलेले प्राण्यांस मरणानंतर आपण सत्याप्रत पावलों आहों असा विचार राहत नाहीं. ह्या आत्म्याचा जो अंश ह्या सर्वांचा आत्मा आहे तो "सत्" होय. जगदात्मा तो तोच होय. हे श्वेतकेतू, तो तूं आहेस." ( छांदोग्य उ० ६: ९ )

उपनिषदांची संख्या अडीचशांहून अधिक आहे, परंतु त्यांत विशेष महत्त्वाचीं अशीं फारच थोडीं आहेत. कित्येक फार प्राचीन ह्मणजे ख्रि० स० पू० ६०० वर्षें लिहिलेलीं आहेत. कित्येक तर फार आलीकडलीं आहेत. शैव व वैष्णव पंथांचींही उपनिषदें आहेत; जसें नारायणोपनिषद् हें वैष्णवांचें व शतरुद्रिय हें शिवाचें उ० होय. ऋग्वेदाचीं ऐतरेय व कौषीतकी उपनिषदें आहेत. यजुर्वेदाचें तैत्तिरीय उ० आहे. केन व छांदोग्य हीं सामवेदाचीं उ०, प्रश्न, मुंडक, मांडूक्य आणि कठ हीं अथर्ववेदाचीं उ० होत.

अकबर बादशहाच्या वेळीं अल्लोपनिषद् या नांवाचें एक उ० कोणी रचलें होतें.

## उपनिषदांतील वेंचे.

### ( १ ) आत्मतत्त्वविचार.

श्वेताश्वतरोपनिषद्:—

किं कारणं ब्रह्म कुतः स्म जाता जीवाम केन क्व च संप्रतिष्ठिताः।
अधिष्ठिताः केन सुखेतरेषु वर्त्तामहे ब्रह्मविदो व्यवस्थाम् ॥ इ०

"ब्रह्म कारण आहे काय? आह्मी कोठून जन्मलों? आह्मी कशानें जगतों? कोठें जातों? कोणाच्या आज्ञेनें आह्मी सुखदुःखांत धर्मशास्त्राप्रमाणें वर्त्ततों? काल, स्वभाव, नियम, अदृश्य, पंचभूतें यांतून कोणतें आदिकारण आहे? मनुष्य सर्वांचें मूळ आहे असें समजावें काय? अथवा त्याचा संयोग अथवा कोणी स्वतंत्र आत्मा असला पाहिजे काय? त्या स्वतंत्र आत्म्यालाही सुखदुःखाच्या हेतूवर अधिकार नाहीं ह्मणून कीं काय?"

ब्रह्म कारण.

**(२) सृष्ट्युत्पत्ति.**

प्रारंभीं आत्म्यावांचून कांहीं नव्हतें.

"प्रारंभीं ही पृथ्वी आत्ममय होती, आत्म्यावांचून कांहीं नव्हतें. त्याला भुवनें उत्पन्न करावीं असें वाटलें, आणि त्यानें हे लोक उत्पन्न केले." ( बह्वृच उपनि०. )

ह्या वचनावरून परमेश्वरानें शून्यापासून सृष्टि उत्पन्न केली असा अर्थ निघतो, तरी त्याजवर माधव नामक टीकाकार वेदांतमत स्थापनार्थ दुसऱ्या एका उपनिषदांतून प्रमाणवाक्य घेतो. त्यांत माया ही मुख्य धरिली आहे व परमेश्वर (महेश्वर) हा मायावश आहे असें ह्मटलें आहे:—

**(३) माया.**

मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ।

याजवर पूर्वोक्त टीकाकार असें ह्मणतो कीं, "उष्णता ही जशी अग्नीची शक्ति आहे तशी माया ही परमात्म्याची शक्ति आहे."

परंतु हा त्याचा खरा अर्थ आहे असें नाहीं. तैत्तिरीय उपनिषदांत परमात्मा सत्य, सर्वज्ञ, अनंत असा वर्णिला आहे व त्याजपासून आकाश, वायु, अग्नि इ० सर्व उत्पन्न झाले असें सांगितलें आहे. ( सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म. २. १. )

### (४) ब्रह्म.

छांदोग्य उपनिषदांत मनुष्यामध्यें जो आत्मा आहे तोच ब्रह्म असें शांडिल्याचें मत सांगितलें आहे व ह्या मताला 'शांडिल्याचें ज्ञान' म्हटलें आहे. दुसऱ्या उपनिषदांत तर ईश्वराला सत् ( खरी वस्तु ) म्हटलें आहे. "त्याला बहुत होण्याची इच्छा झाली आणि त्यानें प्रकाश केला. प्रकाश पाण्यांत वाहत गेला, पाण्यापासून अन्न झालें." इ०. अथर्ववेदाच्या उपनिषदांत परमात्म्याला 'अक्षर' म्हटलें आहे; याचे दोन अर्थ होतात, म्हणजे अविनाशी, किंवा आकाशादि महाभूतांसंबंधी.

आत्मा तोच ब्रह्म.

ईश्वराला 'अव्याकृत' असें एक नांव उपनिषदांत दिलें आहे. वेदांतमतांतही ह्याच नांवानें ब्रह्मन् वर्णिलें आहे. अव्याकृत म्हणजे अप्रगट; परंतु पुढें एकानें ही कल्पना त्याच्याही पलीकडे पोंचवून "असत्" म्हणजे जें नाहीं त्यापासून "सत्" ( सर्व कांहीं आहे तें ) झालें असें ठरविलें ! तद्धैक आहुरसदेवेदमग्र आसीदेकमेवाद्वितीयं तस्मादसतः सज्जायेत । ( छांदो० उ० ६. १. )

असतापासून सत् झालें.

### (५) मनुष्याची मरणोत्तर गति.

मेल्यावर मनुष्य कोठें जातो याविषयीं ( कौषीतकी ब्राह्मणोपनिषद्. अ. १. ):—

"जे सर्व हें जग सोडून जातात ते चंद्राप्रत जातात. शुक्लपक्षांत चंद्र त्यांचे प्राण पाहून आनंदित होतो, परंतु कृष्णपक्षांत तो त्यांस नवे जन्म घेण्यास पाठवितो. चंद्र हा स्वर्गाचें द्वार आहे, जो त्याचा अव्हेर करितो त्यास तो प-

आत्मा चंद्रलोकाप्रत जातो.

लीकडे पाठवितो. जो त्याला अव्हेरीत नाहीं त्याचा तो पृथ्वीवर वर्षाव करितो. एथें तो आपलें कर्म व विद्या यांप्रमाणें कीटक, पतंग, मत्स्य किंवा पक्षी, सिंह, सर्प, व्याघ्र, मनुष्य किंवा अन्य प्राणी होऊन जन्मतो. तो आल्यावर गुरु त्याला पुसतो, " तूं कोण आहेस ? " त्याला असें उत्तर देऊंदे. ऋतुस्थापक चंद्रापासून रेत जमा केलें. तें रेत, ( ह्मणजे मी ) देवांनीं मनुष्यांमध्यें ठेविलें. त्या मनुष्यांच्या योगें त्यांनीं तें स्त्रीमध्यें ठेविलें. तिच्यापासून मी जन्मलों—बारा व तेरा महिन्यांच्या पित्याशीं माझा संयोग झाला. जें ज्ञान सत्य आहे व जें ज्ञान सत्याच्या विरुद्ध आहे तें प्राप्त करून घेण्याकरितां. तर हे देवहो, मी अमरत्व पावावें म्हणून माझ्या जिवास आश्रय द्या. मी काळ आहें, मी कालाधीन आहें. " तूं कोण आहेस ? " मी तूंच आहे ( कोऽसि त्वमस्मीति ). मग तो त्याला पलीकडे जाऊं देतो. "

भावार्थ. मनुष्याला ब्रह्मज्ञान प्राप्त झालें म्हणजे तो मेल्यावर कोठें जातो हें यांत दर्शविलें आहे. तो परमात्म्यांत मिळतो असें मत यांत नाहीं, पण तो चंद्रलोकाच्या पुढें ब्रह्म्याकडे जातो असें ह्मटलें आहे.

तो अग्निलोकाप्रत जातो.

" तो देवमार्गाप्रत पोंचल्यावर अग्निलोकास जातो, तेथून वायुलोकीं जातो. मग वरुणलोकीं, मग इंद्रलोकास, मग प्रजापतीच्या लोकास, मग ब्रह्मलोकीं. तेथें त्याला विघ्न आणणारीं अशीं सरोवरें, नद्या, द्वारपाळ इ० लागतात, तीं तो ब्रह्मविद्वान वाटवून गेल्यावर ब्रह्मा त्याला पाहून आपल्या सेवकांस म्हणतो, ' धांवा, आणि माझ्या यशानें त्याला भेटा.

त्यानें अक्षय नदी मिळविली आहे. त्याला आतां जरा प्राप्त होणार नाहीं.' ( तो म्हातारा होणार नाहीं. ) "

त्याला अप्सरा भेटतात.

" त्याला पांचशें अप्सरा भेटायास जातात. शंभर अप्सरा हातांत फळें घेऊन जातात, शंभरांच्या हातांत सुगंध द्रव्य आहे, शंभरांच्या हातांत फुलांच्या माळा आहेत, शंभरांच्या हातांत सुवासिक चूर्ण ( उटणें ) आहे. त्या त्याला ब्रह्मालंकारानें अलंकृत करितात."

त्याचा व ब्रह्म्याचा संवाद.

नंतर ब्रह्म्याचा व त्याचा संवाद होतो. ब्रह्मा म्हणतो, " मी कोण आहें ? " " तूं सत्य आहेस." " सत्य काय आहे ? " "देवता आणि प्राण यांशिवाय जें आहे तें ' सत् '; देव आणि प्राण हे जें कांहीं आहे तें ' त्य ' ह्या सर्वांस ' सत्य ' म्हणतात. हें सर्व ( विश्व ) असें आहे. हें सर्व तूं आहेस."

**( ६ ) वैदिक यज्ञाची निंदा** ( मुंडकोपनिषद ):—

" ह्या देदीप्यमान ज्वाला ज्या त्यांचे ठाईं जो यज्ञ करणारा पुरुष यथाकालीं आहुति देतो आणि सेवा करितो त्या पुरुषातें ह्या सात देवता स्वर्गलोकास नेतात. अग्नीमध्यें दिलेल्या आहुति त्याच देवतारूपेंकरून तुम्हाला पुण्यकारक असा ब्रह्मलोक निरंतर प्राप्त होईल असें बोलतात. केवळ हा आशीर्वाद मात्र आहे; परंतु जे कामाला बळकट नव्हेत असे हे यज्ञरूप नौकापदार्थ आहेत. ज्यांमध्यें अठरा प्रकारचीं हिंसारूप नीच कर्मे सांगितलीं आहेत, असें असतां हींच कर्मे आम्हांस कल्याणकारक आहेत असें समजून जे पुरुष आनंद पावतात ते मूर्ख होत, आणि ते वारंवार जरा आणि मृत्यु पावतात, कां कीं अविद्येमध्यें राहत अ-

सतां आपण आपल्याला धीर पंडित आहों असें मानितात. ते तर निंदेविषयीं योग्य होतात, आणि सर्वकाल मूर्खही होतात. जसे एका डोळ्याचे अंधळ्यानें नेलेले अंध पुरुष त्याच्याच पाठीमागें जातात, परंतु त्यांस अन्य मार्ग दिसतच नाहीं तसें."

ह्या वरील उताऱ्यांतील कित्येक वचनांचें मूळ येणेंप्रमाणें आहे:—

प्रिया वाचमभिवदंत्योच्चयंति । एष वः पुण्यः सन्नतो ब्रह्मलोकः ।
प्लवा ह्येते अद्दढा यज्ञरूपाः । अष्टादशोक्तमवरं येषु कर्म ।
एतत् श्रेयो येऽभिनंदंति मूढाः । जरा मृत्युं ते पुनरेवापि यंति ।
अविद्यायामंतरे वर्तमानाः । स्वयं धीराः पंडितं मन्यमानाः ।
जंघन्यमानाः परियंत्यमूढाः । अंधेनैव नीयमाना यथांधाः ॥ १०

---

## प्रकरण ११.

## वैदिक स्वर्ग व नरक.

वैदिक स्वर्ग-वर्णन.

वेदांत स्वर्ग व नरक यांविषयीं कित्येक ठिकाणीं फार स्पष्ट रीतीनें सांगितलें आहे, तथापि पुराणांत ह्या स्थळांचें जसें अकटोविकट वर्णन केलें आहे तसें यांत नाहीं. ऋग्वेदाच्या ९ व्या व १० व्या मंडळांत व अ. वे. त स्वर्गाविषयीं ज्या सूचना आहेत त्या दाक्तर म्यूर नामक एका महाविद्वानानें एकत्र करून येणेंप्रमाणें दर्शविल्या आहेत:—"स्वर्गीय स्थितीला 'अमृतत्व' ह्मटलें आहे. पुण्यवान प्राणी 'देवांप्रत जातो' असें सांगितलें आहे. वेदांतीलोक शरीराचा जसा कंटाळा करितात व तें सर्व पापांचें स्थान व आत्म्याचें बंधन आहे असें समजतात तसें आर्यऋषि समजत नव्हते; तर

यज्ञ केल्यानें शुद्ध शरीर प्राप्त होतें, जितके अधिक यज्ञ मनुष्य करील तितकें त्याला अधिक सूक्ष्म किंवा आकाशीय शरीर प्राप्त होईल असा त्यांचा समज होता. स्वर्गांत 'उत्तम धन' आहे, तेथें 'पुण्यप्राणी इंद्रासहित अमृत प्राशन करितात.' तेथें 'ते सोमरस पितात.' 'ते प्रकाशांत जातात व देवांस ओळखतात.' कथोपनिषद अ. १:—"स्वर्गभुवनांत भय नाहीं; हे मृत्यू, तूं तेथें नाहींस. क्षुधा व तृषा यांस मागें टाकून व दुःखाच्या अटोक्याबाहेर निघून सर्व जण स्वर्गभुवनांत आनंद करितात." सूर्य तेथें प्रकाशत नाहीं; चंद्र व नक्षत्रें हींही प्रकाशत नाहींत." (अ. २) शुद्ध ब्रह्मभुवन त्यांचें आहे, त्यांत कांहीं वांकडें नाहीं, कांहीं असत्य नाहीं, आणि कपट नाहीं."

स्वर्गसुख देणारे देव. हें स्वर्गसुख अग्नि, इंद्र, सोम इ० देव देत.

स्वर्गप्राप्तीचे उपाय.

वेदांत पुराणाप्रमाणें स्वर्गप्राप्तीचे अनेक उपाय सांगितले नाहींत, यज्ञाकडूनच मात्र स्वर्ग प्राप्त होतो असें सांगितलें आहे. ज्ञान आणि कर्म यांकडून स्वर्ग मिळतो असेंही म्हटलें आहे; परंतु हीं दोन्हीं नांवें अग्नीलाच दिलीं आहेत, म्हणजे अग्नि हाच ज्ञान व अग्नि हाच कर्म.

यम.

वेदांमध्यें मेलेल्यांचा न्याय करणारा यम राजा सांगितला नाहीं; परंतु यम हा मानवजातींपैकीं प्रथम मरण पावलेला मनुष्य होता, त्यानें स्वर्गांत जाण्याचा मार्ग शोधून काढला व आतां तो इतरांस वाट दाखवून तेथें नेतो आणि तेथें त्यांस एका घरांत ए-

कत्र करितो, तेथें ते चिरकाळ राहतात असें अथर्ववेदांत त्याचें वर्णन आहे.

स्वर्गांतील सहकुटुंब रहिवास.

स्वर्गांत मनुष्यें आपापल्या कुटुंबासहित एकत्र राहतात अशी कल्पना वैदिक ऋषींच्या मनांत होती:—

स्वर्गलोकमभि नो नयासि संजायया सह पुत्रैः स्याम । इ०.

"आम्हांला स्वर्गास ने, आम्हांला आमच्या बायका व मुलें यांच्या संगतीं राहूं दे." (अ. वे. १२. ३. १७.)

यत्रा सुहार्दः सुकृतो मदन्ति विहाय रोगं तन्व स्वायाः ।
अश्लोणा अङ्गैरहुताः स्वर्गे तत्र पश्येम पितरौ च पुत्रान् ॥

"जेथें आमचे पुण्यवान इष्टमित्र शरीराचे रोग मागें ठेवून सुख भोगतात, जेथें त्यांचे अवयव लंगडे किंवा वांकडे असत नाहींत असा जो स्वर्ग तेथें आमचे वडील व लेंकरें आमच्या दृष्टीस पडोत. (अ. वे. ६, १२० ३.)

अनेक स्वर्ग नाहींत.

पुराणांत वैकुंठ, कैलास, सत्यलोक इ० अनेक स्वर्ग सांगितले आहेत तसे वेदांत नाहींत. स्वर्गाला तिसरें आकाश, तिसरा स्वर्ग, "त्रिनाक," "त्रिदिव" म्हटलें आहे:—

"हे सोमा, जो अमृत व अक्षयलोक आहे, जेथें सर्वकाल प्रकाश गौरव आहे तेथें मला ठेव. जेथें वैवस्वत राजा ( यम ) राहतो तेथें मला अमर कर. जेथें महाजलें वाहतात तेथें मला तिसऱ्या आकाशांत व तिसऱ्या स्वर्गांत जेथें क्रिया अबद्ध ( मोकळी ) आहे, आणि जेथें प्रकाशित दिशा आहेत तेथें मला अमृत कर." ( ऋ० वे० ९. ११३. )

स्वर्गसुखांतील विषयोपभोगांत लोणी, मध, दूध, दहीं हे पदार्थ ऋषींनीं कल्पिले होते. हें स्वर्गसुख त्यांच्या आराध्य दैवतांच्या गुणस्वभावांला अनुसरूनच होतें, कारण देवांस बायका आहेत व ते विषयसुख भोगतात अशी ज्यांची कल्पना त्यांस त्यांच्या सहवासांत राहणाऱ्या मनुष्याच्या सुखाची आणखी कोणती कल्पना करवेल? तथापि पुराणांतील अप्सरा व रंभा यांचा स्वर्गांत फार प्राचीन वैदिककालीं प्रवेश झाला नव्हता.

स्वर्गसुखाचे विषय.

वरील वर्णनांत स्वर्गांत काम (क्रिया) मोकळा आहे असें म्हटलें आहे. वेदांतमताप्रमाणें परमसुख तें निष्क्रिय होणें (कर्मापासून सुटणें) असें आहे. पण ही कल्पना वैदिक ऋषींच्या मनांत शिरली नव्हती. ह्या वचनावर तैत्तिरीय ब्राह्मणांत "स्वर्गांत तो आपल्या इच्छेप्रमाणें वर्त्ततो," अशी टीका केली आहे. (कामचारोस्य स्वर्गे लोके भवति.)

नरक.

नरकास वेदांत "अनारंभ तमस" (ज्याचा थांग लागत नाहीं असा अंधकार) म्हटलें आहे:—

"हे इंद्रसोमहो, त्या दुष्ट राक्षसांस अतल अंधकारांत टाका." (ऋ. ७.१०४.३.) अथर्ववेदांत त्याला "नारकलोक" (अ. वे. १२.४.३६) असें म्हटलें आहे. परंतु पौराणिक मताप्रमाणें ज्या अनेक प्रकारच्या यातना दुष्ट लोक नरकांत भोगतात त्यांविषयीं वेदांत कांहीं सूचना नाहीं. सोम पुण्यवंतांस जसा स्वर्गसुख देतो तसा तो दुष्टांस नरकांत टाकितो.

"सोम सर्व भुवनें पाहतो, तो द्वेषलेले व अधर्मी यांस नरकांत झुगारून देतो." ( ऋ. ९.७३.८.)

मार्गांत अडविणारे दोन कुत्रे.

यमाच्या स्थानीं जाण्यापूर्वी मार्गांत विदेही आत्म्याला आडवायाला व भेडवायाला अधाशी कुत्रे आहेत. प्रत्येक कुत्र्यास चार चार डोळे व रुंद नाकपुड्या आहेत. ते यमलोकाच्या मार्गाची रखवाली करितात. (ऋ. १०. १४. १०–१२.) पारशीलोकांच्या मताप्रमाणें कुत्रा मेलेल्यांच्या आत्म्यांस चिनवद पुलावरून वाट दाखवून व भूतांशीं लढून स्वर्गास नेतो. हा कुत्रा पिंवळ्या रंगाचा असून त्याला चार डोळे असतात असें पारशी लोक मानितात. पारशी लोकांत लेंकरूं मेलें म्हणजे त्याचें परलोकीं पोषण व्हावें म्हणून काळ्या कुत्र्यास अन्न घालितात. लेंकरूं लहान असल्यास कुत्र्याला शर्करायुक्त दूध पाजतात; मोठें असलें तर कोंबडी वगैरेचें मांस व भात शिजवून घालतात. हें अन्न प्रथम धुपाच्या धुरावर धरितात, असें केल्यानें त्याचा रस मुलास पोंचतो अशी समजूत आहे. ही क्रिया धनवानाच्या घरीं वर्ष सवावर्ष चालते व गरीब लोकांत दोन पासून चार महिने चालते.

आत्म्याचें मार्गक्रमण.

मरणकाळीं देह ठेवून गेलेल्या आत्म्याचें स्वर्गीय मार्गक्रमण वेदांत येणेंप्रमाणें वर्णिलें आहे:—

आत्म्याला पृथ्वीवरून स्वर्गांत जातांना मोठ्या अंधारमय प्रदेशांतून जावें लागतें. जें कांहीं वाईट व अपूर्ण आहे तें सर्व मागें सोडून ज्या मार्गानें पितर गेले त्या मार्गानें तो जातो. (ऋ. वे. १०. १४. ७.) त्याला देवां-

सारिखें तेज प्राप्त होतें. (अ. वे. ११. १. ३७.) तो रथांत बसून अथवा पंखांनीं उडत अनंत प्रकाशाच्या स्थानीं चढून जातो. त्यासाठीं मार्गांत अग्नि राक्षसांशीं युद्ध करितो. त्याला मारुत मंद वारा घालतात. त्यावर पर्जन्य पडून त्याचा दाह हरण करितो. त्याला आपलें प्राचीन शरीर समग्र व सतेज असें प्राप्त होतें. तो आपले पितर जे यमासंगतीं आनंदांत असतात त्यांस भेटतो. यम त्याला आपलासा ओळखून आनंदभुवनांत स्थळ देतो. नंतर तो विशेष पूर्ण असें जिणें भोगायास लागतो. तेथें त्याच्या सर्व इच्छा तृप्त होतात. तो देवांच्या सन्निध जातो, व त्यांच्या इच्छेप्रमाणें काम करीत राहतो. याशीं पौराणिक काळांतील प्रेतकर्मांतील विधि ताडून पाहा. ( भाग २. )

स्वर्गांत कर द्यावा लागत नाहीं.

अथर्ववेदांत ( ३. २९. ३. ) असें सांगितलें आहे कीं, जो कोणी काळ्या पायांच्या मेंढ्यांचा यज्ञ करितो तो स्वर्गास जेथें दुर्बलांस बलवानाला कर द्यावा लागत नाहीं, अशा स्थानाप्रत जातो:—

> यो ददाति शितिपादमविं लोके न संमितम् ।
> स नाकमभ्यारोहति यत्र शुल्को न क्रियते अबलेन बलीयसे ॥

पृथ्वीपासून स्वर्गाचें अंतर.

स्वर्गलोक पृथ्वीपासून एक हजार दिवसांच्या घोडेवाटेवर आहे, असें ऐतरीयब्राह्मणांत सांगितलें आहे. (२. १७.) आणि शतपथ ब्राह्मणांत असें सांगितलें आहे कीं, स्वर्गाचें द्वार ईशान ( उत्तरपूर्व ) दिशेस, आणि पितरांच्या स्वर्गाचें द्वार आग्नेयी (दक्षिणपूर्व) दिशेस आहे. (श. ब्रा. ६.६.२.४.)

मनुष्य मेल्यावर कोठें जातो याविषयीं उपनिषदांतील एक मत **उपनिषद्** ह्या प्रकरणांत दिलें आहे तें पाहावें.

---

## प्रकरण १२.

### ब्रह्म.

हिंदुशास्त्राचें असें मत आहे कीं, ही चराचर सृष्टि व ब्रह्मा, विष्णु, शिव, इ० सर्व देव उत्पन्न होण्यापूर्वीं अनादिकालापासून ब्रह्म होतें. त्याला ब्रह्मन्, (न. लिं.) परब्रह्म, ब्रह्मात्मा, परमात्मा, पुरुष, प्रधानपुरुष, परमपुरुष, अशीं अनेक नांवें आहेत. वेदमंत्रांमध्यें ह्या ब्रह्माचें क्वचित् वर्णन केलें आहे; परंतु उपनिषदें, ब्रह्मसूत्रें, दर्शनें, धर्मशास्त्रें, रामायण आदिकरून ग्रंथांत त्याविषयीं पुष्कळ लिहिलें आहे. तथापि ब्रह्म कोण हें उपनिषदांत निश्चयानें सांगितलें नाहीं. त्यांत अनेक प्रकारच्या ब्रह्मांचें प्रतिपादन केलें आहे. पुराणादि ग्रंथांत जो जो देव मुख्य मानिला आहे तो प्रत्येक ब्रह्म होय; ह्मणजे शैवमताप्रमाणें शिव ब्रह्म, वैष्णवमताप्रमाणें विष्णु ब्रह्म, गाणपत्यमताप्रमाणें गणपति हाच ब्रह्म; देवीपुराणांत देवीला ब्रह्मस्वरूपिणी, ब्रह्मब्रह्मणी ह्मटलें आहे. हे भेद लक्षांत ठेवण्याजोगे आहेत.

उपोद्घात.

ब्रह्म शब्द वेदाच्या अत्यंत प्राचीन व अत्यंत अर्वाचीन या दोनही भागांत आढळतो. याचा सामान्यतः " तत्त्वविद्या " ह्मणजे पवित्र ज्ञान असा अर्थ केलेला आहे. वेदाच्या बहुत मंत्रांमध्यें या शब्दाचा हा अर्थ आहे खरा; परंतु तो

ब्रह्म शब्दाचें अर्थ व मूळ.

त्याचा मूलार्थ नव्हे. वेदाच्या अत्यंत प्राचीन मंत्रांत याचा अर्थ " पवित्र गाणें, प्रार्थना " असा होतो. परंतु हा अर्थ प्रार्थना, भक्ति इत्यादिपर जीं सूक्तें त्यांत मात्र असतो. वेदांत " ब्रह्म करणें " व " ब्रह्मकर्त्ता " अशा रीतीचे प्रयोग हमेष आढळतात. यांत ब्रह्म याचा अर्थ एक "पवित्र द्रव्य" असा आहे आणि ब्रह्म करणें ह्मणजे ब्रह्म नामक द्रव्य उत्पन्न करणें व तें यज्ञांत ठेवणें असा अर्थ होतो.

" ज्या धातूपासून ब्रह्म शब्द झाला आहे त्याचा अर्थ पाहतां वृद्धि असा आहे आणि त्यापासून सृष्टीचा आत्मा, उत्पादक शक्ति असा बोध होतो. ब्रह्म अथवा उत्पादक शक्ति इचें बाह्य दर्शक चिन्ह नेहमीं यज्ञामध्यें लागत असतें. कुशनामक दर्भाची मुष्टि बांधून ती दुमडून तें केलेलें असतें. त्यास " वेद " ह्मणतात. आणि वेद व ब्रह्म हे दोन्ही अपरपर्यायच आहेत. यज्ञ समाप्त होईपर्यंत हा वेद एका ऋत्विजाच्या हातून दुसऱ्या ऋत्विजाच्या हातीं आणि यजमान व त्याची पत्नी यांच्याही हातीं जात असतो. पारशी लोकांचे उपाध्याय कांहीं विधि करीत असतात, त्यांत हें चिन्ह आढळतें. ते दर्भाबद्दल एका झाडाचे डाहळे घेतात. ते या चिन्हास " बर्सम" ( जेंद " बरेस्म " ) ह्मणतात. हा शब्द व ब्रह्मशब्द हे मूळचे एकच आहेत.

" निघंट ह्मणून वैदिक शब्द व त्यांचे अर्थ यांचा एक प्रसिद्ध कोश आहे, त्यांत ब्रह्म शब्द द्विवार आढळतो. त्यांत दोहोंपैकीं एकही अर्थ मिळत नाहीं. सायनाचार्यासही अडचण पडून त्यानें निरनिराळ्या प्रकारचे अर्थ केले. बहुतकरून स्तोत्र हा अर्थ फार ठिकाणीं केला. वेदांतलें ब्रह्मशब्दघटित एक वाक्य एथें लिहितों. ( ऋ. ७. २२. ९. )

येच पूर्वेच ऋषयो येच नूत्ना इंद्रब्रह्माणि जनयंत विप्राः ॥ अर्थ, "हे इंद्रा, प्राचीन व अर्वाचीन अशा ज्ञानी ऋषींनीं ब्रह्में उत्पन्न केलीं आहेत." सायनाचार्य या ठिकाणीं ब्रह्में म्हणजे स्तोत्रें म्हणतो.

"ब्रह्मशब्दार्थ केवळ स्तोत्र नव्हे; त्यापेक्षां फार व्यापक आहे. तैत्तिरीय ब्राह्मणाच्या आरंभींच एक मंत्ररूप वाक्य आहे. अध्वर्यु व त्याचा हस्तक प्रतिप्रस्थाता, हे दोघे आपल्या हातांत शुक्र व मंथी हे दोन चमस (सोमरस पिण्याचीं पात्रें) धरतात आणि त्या दोहोंचा संयोग करितात, तेव्हां अध्वर्यु तें वाक्य ह्मणतो, ह्मणजे त्या चमसाची प्रार्थना करितो;

ब्रह्मसंधत्तं तन्मे जिन्वतम् ॥
क्षत्रं संधत्तं तन्मे जिन्वतम् ॥ इत्यादि.

"तुम्हांस एकत्र धरल्याच्या योगानें तुह्मी ब्रह्म, क्षत्र, इष (अन्न), ऊर्जस् (बल), रै (द्रव्य), पुष्टि, प्रजा (मुलें) आणि पशु उत्पन्न करा." तुह्मी दोघे (चमस) ब्रह्म इ० एकत्र स्थापा, तें मजसाठी चेतवा," याचा अर्थ तुह्मा दोघांस एकत्र धरल्याच्या योगानें तुह्मी दोघे ब्रह्म इ० निर्माण करा आणि दोन काष्ठें घांसल्यापासून अग्नि पडून तो जसा चेततो तसें तुह्मी तें ब्रह्म चेतवा. यावरून स्पष्ट दिसतें कीं, ब्रह्म हें विजेप्रमाणें एक अनुद्भूत शक्ति आहे असें मानलेलें होतें.

"क्षत्र हें ऐहिक आधिपत्याचें गुप्त तत्त्व. हें ब्रह्मापासून सर्वदा पृथक् दाखवलेलें असतें. हीं दोन्ही प्रजापतीनें यज्ञ केला त्यापासून उत्पन्न झालीं. (ऐतरेय ब्रा० ७,१९.) तीं झाल्यानंतर कांहीं यज्ञसंबंधी अन्न भक्षणारे आणि

कांहीं तें न भक्षणारे असे दोन प्रकारचे प्राणी उत्पन्न केले. त्यांपैकीं भक्षणारे ब्रह्माचे अनुयायी झाले आणि न भक्षणारे क्षत्राचे झाले. त्यांतले भक्षणारे हे ब्राह्मण आहेत, न भक्षणारे क्षत्रिय वैश्य व शूद्र आहेत. "ब्रह्म व क्षत्र हीं दोन्ही आह्मी यज्ञ घेऊं, आह्मी यज्ञ घेऊं असें ह्मणूं लागलीं होतीं. तेव्हां यज्ञ त्यांजपासून पळाला. मग ब्रह्मानें मात्र त्यास मागून जाऊन गांठलें, क्षत्रानें गांठलें नाहीं. त्यामुळें यज्ञ करण्याचा मूळचा अधिकार ब्राह्मणांसच आहे. क्षत्रिय व वैश्य यांनींही यज्ञ करावा, परंतु तो करण्याच्या आधीं त्यांच्यामध्यें ब्रह्मरूप शक्तीची स्थापना झाली पाहिजे, नाहींतर तिजवांचून त्यांचा यज्ञ अगदीं विफळ होतो. पुढें यज्ञ संपतांच ब्रह्मरूप शक्ति त्यांजपासून काढून घेऊन पुनः मंत्रानें क्षत्रादि शक्तीचें स्थापन करावें असें होतें.

"ब्रह्म शब्दाची अधिक माहिती आणखी एका गोष्टीवरून लागते. यज्ञांत चार ऋत्विज लागतात, त्यांत मुख्य ब्रह्मा असतो, बाकीचे तीन होता, अध्वर्यु व उद्गाता हे होत. होता ऋग्वेदाचे मंत्र ह्मणणारा, अध्वर्यु देवांचे हवि तयार करणारा, अग्नींत अवदानें घालणारा, आणि यजुर्वेदाचे मंत्र मुख्यत्वें पाकक्रियेसंबंधी आहेत ते ह्मणणारा; व उद्गाता हा सामवेदाचे मंत्र गाणारा; हे तीन असामी आपल्या हस्तकांसहवर्त्तमान सर्व कर्म करतात व त्या त्या कर्मांत सांगितलेले मंत्र ह्मणतात. ब्रह्मा ह्मणून जो ऋत्विज असतो त्यास यज्ञांत हातानें विशेष कृति करावी लागत नाहीं, फक्त देखरेख ठेवावी लागते, आणि बाकीच्या ऋत्विजांच्या अनुष्ठानांत अथवा मंत्र ह्मणण्यांत जितक्या चुक्या पडतात तितकीं प्रायश्चित्तें त्यांस द्यावीं लागतात, ह्मणजे

इतर ऋत्विज आपलीं कामें हातानें व वाणीनें करतात, आणि ब्रह्मा आपलें काम मनानें करितो. सर्व यज्ञांमध्यें व्यापक जें ब्रह्म त्याचा हा ऋत्विज प्रतिनिधीच होय."

वरील उतारा " ब्राह्मणवर्णाचें मूळ " नामक पुस्तकांतून घेतला आहे, तो पुणें विद्यालयांतील संस्कृत विद्येचे माजी प्रोफेसर दाक्तर मार्टिन हौग यांच्या एका व्याख्यानांतील आहे. ह्या व्याख्यानाचें मराठी भाषांतर कोणी एका 'स्वदेशहितेच्छूनें' करून इंदुप्रकाश छापखान्यांत छापविलें होतें. ( १८६४. )

अथर्ववेदांत ब्रह्म शब्द परमेश्वराला लाविला आहे. ( १०.७.२४. )

संस्कृत कोशांत " ब्रह्मन् " शब्दाचे आणखी अनेक अर्थ सांगितले आहेत. ब्र० ह्मणजे ओम् ( एकाक्षरं परं ब्रह्म. ) २ वेद. ३ भारणीचा मंत्र. ४ तप. ५ ब्रह्मचर्य. ६ मोक्ष. ७ ब्राह्मणजाति. ८ संपत्ति. ९ शुद्धि. १० ब्रह्मज्ञान. ११ उपनिषद. १२ देवाची प्रार्थना.

( १ ) ब्राह्मणांतील ब्रह्मः—

शतपथब्राह्मणांत जें ब्रह्म सांगितलें आहे तें वेदांतींच्या ब्रह्माप्रमाणें निर्गुण व निष्क्रिय नसून, ब्रह्मशब्द पुल्लिंगी योजिला आहेः—

" ब्रह्म हाच आरंभीं होता, त्यानें देव उत्पन्न केले. देव उत्पन्न केल्यावर त्यानें त्यांस भुवनांत ठेविलें. ह्या लोकीं अग्नि, अंतरिक्षांत वायु, व दिव्य लोकीं सूर्य. " ( श. ब्रा. ११. २. ३. १. )

ब्रह्म वा ऽइदमग्र ऽआसीत्। तद्देवानसृजत तद्देवानसृष्ट्वैषु लोकेषु व्यारोहयदस्मिन्नेव लोकेऽग्निं वायुमन्तारिक्षे दिव्येव सूर्यम् ॥

अथर्ववेदांत जें ब्रह्म वर्णिलें आहे त्यानें पृथ्वी उत्पन्न केली. ह्या ब्रह्माला नगर ( पुर ) होतें. त्याला पुत्रही होते.

( २ ) उपनिषदांतील ब्रह्मवर्णनः—

( अथर्ववेदाचें मुंडकोपनिषद. )

इत्यथ परायया तदक्षरमधिगम्यते ।
यत्तदद्दश्यमग्राह्यमगोत्रं ।
अवर्णंचक्षुःश्रोत्रं पाणिपादं ।
नित्यं विभुं सर्वमतं सुसूक्ष्मं तदव्ययं ।

अर्थ. "परा नामक विद्या बोलते कीं, ज्या विद्येच्या योगें करून तें नाशरहित ब्रह्म प्राप्त होतें तें हें कीं, जें तें डोळ्यांनीं दिसत नाहीं, आणि बुद्धीकरून घेववत नाहीं, आणि ज्याला कुळ नाहीं, आणखी ज्याला गोरा किंवा काळा असा वर्ण नाहीं, ज्याला डोळे नाहींत, आणखी कान नाहींत, ज्याला हात नाहींत आणि पाय नाहींत, असें असतां नित्य राहणारें आणि निग्रहानुग्रहसमर्थ, आणखी सर्वांस मान्य, अत्यंत लहान या प्रकारचें असूनही तें ब्रह्मस्वरूप नाशरहित आहे."

यद्भूतयोनिं परिपश्यंति धीराः ।
यथोर्णनाभिः सृजते गृह्णते च ।
यथा पृथिव्यामोषधयः संभवंति ।
यथा सतः पुरुषात् केशलोमानि ।
तथाक्षरात् संभवतीह विश्वं ।
तपसा चीयते ब्रह्म ततोन्नभिजायते ।

अर्थ. "आणखी जें संपूर्ण प्राणिमात्राचें उत्पत्तिकारण तेंच तें आहे. धीर पुरुष जे आहेत ते ज्ञानेंकरून सर्वकाल त्या स्वरूपातें असें पाहतात. जसें ऊर्णनाभि ह्मणून कोणी एक किडा आहे, ज्याला कोळी ह्मणतात तो आपल्या पोटां-तून बहुत सूत काढितो आणि पुनः घेऊन आपल्या पोटांत पहिल्याप्रमाणें सांठवितो.

" आणखी जसे पृथ्वीचे ठायीं वृक्षादिक उत्पन्न होतात आणि जसे पुरुषापासून मस्तकाचे मोठमोठे केंस व शरीरावरचीं लहान लहान लोमें उत्पन्न होतात तसें नाशरहित परमात्मा जो त्यापासून ह्या पृथ्वीचे ठायीं संपूर्ण विश्व उत्पन्न होतें. हे आणि ईश्वराच्या प्राप्तीविषयीं तपश्चर्या करणारे पुरुष जे ज्यांस तपेंकरूनच ब्रह्मस्वरूप प्राप्त होतें, त्याच परमेश्वरापासून अन्न उत्पन्न होतें."

ह्या उताऱ्यांत ब्रह्माविषयीं दोन गोष्टी लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत, ह्मणजे तें निराकार आत्मरूप आहे, आणि त्याच्यापासून म्हणजे त्याच्यांतून सर्व सृष्टि उत्पन्न होते व तेंच पुनः तिला आपल्यांत सांठवितें.

कठउपनिषदः—

अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं ।
तथा रसं नित्यमगन्धवच्च यत् ।
अनाद्यनंतं महतः परं ध्रुवं ।
निचाय्य तं मृत्युमुखात् प्रमुच्यते । ( कठ ३.१६. )

अर्थ. " त्यांत शब्द नाहीं, स्पर्श नाहीं, रूप नाहीं, गंध नाहीं, तें नित्य व अव्यय व अनंत आहे. जीवात्म्याहून श्रेष्ठ आणि अचल आहे त्याची आराधना करून मनुष्य मृत्यूपासून मुक्त होतो. "

श्वेताश्वतर उपनिषदः—

निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरंजनम् ।

अर्थ. " ब्रह्माला शरीर नाहीं, तें कांहीं क्रिया करीत नाहीं, तें शांत आहे, त्याला कांहीं दोष नाहीं, आणि त्याला मनोविकार नाहींत. "

वेदांतींचें महावाक्य.

ब्रह्माविषयीं वेदांती लोकांचें एक साधारण वाक्य असें आहे:—

ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ।

"ब्रह्म सत्य, जग खोटें, जीव ( आत्मा ) ब्रह्मच आहे, दुसरा कोणी नाहीं."

ब्रह्माच्या ठायीं 'मी,' 'तूं,' 'तें,' असा भाव नाहीं, ह्मणजे मी आहें असा जो अहंकार किंवा आपणाविषयींचा बोध किंवा समज तो त्याला नाहीं. वर जो मुंडकोपनिषदांतील उतारा घेतला आहे त्यांत ब्रह्म आपल्यांतून कोळ्याप्रमाणें सृष्टि काढतें असें सांगितलें आहे, परंतु वेदांतमताचे महाकैवारी जे शंकराचार्य ते ह्मणतात कीं, सृष्टीचें उपादान कारणही ब्रह्म नाहीं, माया आहे.

शांकरमताचें ब्रह्म.

तथा च प्रपञ्चस्य परिणाम्युपादानं माया न ब्रह्मेति सिद्धान्तः ।

तर ब्रह्माचे गुण काय आहेत? एथें गुण असा शब्दही योजतां नये, कारण ब्रह्म निर्गुण आहे; तर ब्रह्म काय आहे असें वेदांती लोकांस विचारिलें असतां त्याचें उत्तर येणेंप्रमाणें देतात:—

ब्रह्माचे गुण.

अस्ति भाति प्रियं रूपं नामचेत्यंशपंचकम् ।
आद्यत्रयं ब्रह्मरूपं मायारूपं ततो द्वयम् ।

ह्मणजे, "पांचांपैकीं आहेपणा, चैतन्य, आनंद हीं तीन ब्रह्माला आहेत, व बाकीचीं दोन ह्मणजे नाम व रूप हीं मायेचीं आहेत.

ब्रह्म आणि जग.

ब्रह्म आणि जग एक आहे याविषयीं वेदांती लोकांचीं अनेक मतें व अनेक वाद आहेत, त्यांचें एथें विवेचन करणें कठीण आहे. त्याविषयीं कांहींसें "**षट्दर्शनें**" ह्या प्रकरणाखालीं पाहा. एथें केवळ मुख्य दोन मतांचा सारांश दिला आहे, तो हाच कीं, सकल सृष्टि कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें ब्रह्मरूपानें पसरली आहे. ह्याला प्राकृतांत "ब्रह्मपसारा" ह्मणतात. दुसरें हें कीं, ह्या सृष्टीचें उपादानकारण माया आहे, ह्मणजे एका मताप्रमाणें सृष्टि मिथ्या आहे व दुसऱ्या मताप्रमाणें ती सत्यही आहे; कारण ती ब्रह्म आहे व ब्रह्म सत्य आहे.

ब्रह्मसाक्षात्कार किंवा ब्रह्मप्राप्ति.

ब्रह्माची उपासना, प्रार्थना, भक्ति, पूजा हीं होऊं शकत नाहींत. ब्रह्म कोणाशीं बोलत नाहीं, कोणाला प्रकट होत नाहीं, ब्रह्माचें केवळ ध्यान मात्र करावें आणि आपणच ब्रह्म आहों अशी कल्पना बाळगावी ह्मणजे ब्रह्मप्राप्ति झाली! ब्रह्मप्राप्तीविषयीं **षट्दर्शनें** ह्या प्रकरणांत पहावें. एथें ब्रह्मसाक्षात्काराविषयीं विष्णुपुराण व भगवद्गीता यांतून थोडक्यांत सांगतों. हा साक्षात्कार ध्यानाच्या द्वारें होतो. ह्या ध्यानाचे सहा प्रकार आहेत:—

देहबन्धाच्चित्तधारणातत्तत्प्रत्ययैकतानता ध्यानम् ।
तदैकार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः ॥

ह्मणजे देहाचें बंधन, चित्ताची धारणा, व एकाच वस्तूचें चिंतन ह्याला ध्यान ह्मणतात. आणि अशा ध्यानाचा जो विषय (ध्येय) तो व आपण (ध्याता) एक, व स्वरूपशून्यता (ह्मणजे मी नाहीं) अशी जी कल्पना तिचें

नांव 'समाधि.' ह्या पायरीवर योगी येऊन पोंचल्यावर त्याला 'विज्ञान' प्राप्त होतें, आणि त्याकडून 'ब्रह्मप्राप्ति' होते. ती झाली ह्मणजे विज्ञानही नाश पावतें. मग आत्मा आणि ब्रह्मात्मा यांजमध्यें भेद रहात नाहीं.

गीतेंतही हाच प्रकार कांहींसा वेगळ्या रीतीनें सांगितला आहे:—

योगधारणा.

" गोमयादिकानें शुद्ध केलेला स्थिर, फार उंच नव्हे व फार सखल नव्हे असा ओटा करून त्यावर कुशांचें आसन स्थापावें. त्यावर बसून मनाचे विशुद्धीसाठीं वृत्तिप्रवाहाचा जो रोध तद्रूप योग करावा. योगाभ्यास करणारानें निश्चल होत्साता दृढ प्रयत्नानें शरीराचा मध्य आणि मस्तक आणि ग्रीवा ( मान ) यांप्रत अचल आणि समान धरून मूळाधारापासून मस्तकपर्यंत शरीरभाग सरळ राही असें बसून आपल्या नासिकाग्रावर ( नाकाच्या बोंडीवर ) दृष्टि ठेवून, ह्मणजे अगदीं नेत्र मिटले तर निद्रा येऊन मनाचा लय होईल, चांगले उघडे ठेविले तर बाहेरून रूपादिक विषयांकडे जातील, हीं दोन्हीं न व्हावीं यासाठीं अर्धे उघडे, अर्धे मिटलेले, असे नेत्र ठेवून रहावें. योग्यानें मनाचा निग्रह करून कृष्णाचे ठायीं मनाचें स्थापन करावें, व कृष्णाशिवाय दुसरें कांहींच नाहीं असें मानावें. ह्या अवस्थेस 'ब्रह्मसाक्षात्कार' ह्मणतात." ( रघुनाथशास्त्रीकृत भाषाविवृत्तिसहित गीता.)

---

# खंड २. षट्दर्शनें किंवा सहा शास्त्रें.

उपनिषदांच्या मागून षट्दर्शनें झालीं. यांतील मतांचें मूळ उपनिषदांत आहे. यांचीं नांवें येणेंप्रमाणें आहेत:—

**१ न्याय, २ वैशेषिक, ३ सांख्य, ४ योग, ५ मीमांसा, ६ वेदांत.** ह्यांची रचना सूत्रप्राय आहे; स्वल्प वाक्यांत महत् सिद्धांत दर्शविले आहेत.

सहा शास्त्रांचे कर्ते निरनिराळे होते. **गौतमानें** न्यायशास्त्र रचिलें. **कनाद** हा वैशेषिकाचा कर्त्ता होता. **कपील** हा सांख्यशास्त्राचा स्थापक होता. **पांतजलीनें** योगशास्त्र केलें. मीमांसा **जैमिनीची.** आणि **बादरायण** किंवा **व्यास** हा वेदांताचा प्रवर्त्तक होता.

## सर्वसामान्य मतें.

ह्या सहा शास्त्रांत अनेक तत्त्वज्ञानसंबंधी गोष्टींचा विचार केला आहे, व यांतील मतेंही परस्पर विरुद्ध आहेत; तरी कित्येक मतें सर्वसामान्य ह्मणजे सर्वांत सारखीं आहेत. हीं सर्व शास्त्रें वेदाला प्रमाण मानितात ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे, कारण त्यांचीं सर्व मतें वेदविरुद्ध आहेत. तसेंच "हीं चार ( सा. यो. न्या. वै. ) दर्शनें वेदांस मानीत असतां वेदांतील वचनांचा यांत कांहीं विशेष विचार केलेला नसतो." ( हिं. ध. विवेचक ) सर्वसामान्य मतें तीं हीं आहेत:—

१ आत्मा अनादि आहे, ह्मणजे त्याला आरंभ नव्हता व त्याचा शेवट होणार नाहीं. आत्म्याचे दोन प्रकार आहेत; **परमात्मा** व **जीवात्मा.** परमात्मा तो ब्रह्म आहे, जीवात्मा तो प्राणी आहे. तथापि परमात्मा व जीवात्मा

हे उभयतां सारखेच अनादि आहेत. परमात्म्याला कोणी उत्पन्न केलें नाहीं; जीवात्म्यालाही कोणी उत्पन्नकर्ता नव्हता, तो आपोआप सदा बनलेलाच आहे, व सदा तसाच राहील. २ **प्रकृति** अनादि आहे, आणि जशी सुवर्णादि धातु अलंकाराचें उपादानकारण आहे तशी सृष्टीचें उपादानकारण प्रकृति आहे. प्रलयादिकेंकरून सृष्टीचा लय झाला तरी स्थूल जगत् सूक्ष्म उपादानकारणांत लीन राहतें. याप्रमाणें सदा प्रलय व उत्पत्ति होतच आहे व सृष्टि अनादिकालापासून अनादिकालपर्यंत आहेच आहे. ३ आत्मा शरीराहून भिन्न आहे इतकेंच नाहीं, तर मन, बुद्धि, चित्त, अहंकार यांपासूनही तो वेगळा आहे. हीं केवळ शरीराच्या इंद्रियांप्रमाणें आत्म्याचीं इंद्रियें आहेत. ४ आत्मा निर्गुण आहे. आत्मा व देह यांच्या संयोगापासून बंधन उत्पन्न होतें; आणि मनुष्याच्या आत्म्यास हें बंधन दुःखाचें मूल आहे. सर्व कर्में बंधनाचें कारण आहे. पापकर्म व पुण्यकर्म बंधनमूल आहे. पुण्यकर्मांचें फल सुख व पापकर्मांचें फल दुःख आहे. हें कर्मफल स्वर्गांत किंवा नरकांत भोगावें लागतें; परंतु तेथून पुनः भूमीवर येणें पडतें. याप्रमाणें जन्ममरणाच्या फेऱ्या होतात. सर्व प्रकारच्या कर्मांपासून मुक्त झाल्यानें हीं जन्मांतरें चुकतात व आत्मा मुक्ति पावतो. ( ह्या स्थितीला मोक्ष, कैवल्य, निर्वाण अशीं अनेक नांवें आहेत. ह्यांतून एकही ख्रिस्ती अर्थाच्या तारणाला देऊं नये. ) हीं प्राप्त होण्यापूर्वी आत्म्याला **सालोक्य**, ( देवासंगतीं एकाच लोकीं राहणें ) **सामीप्य** ( देवाजवळ राहणें ) व **सारूप्य** ( देवाच्या रूपानें होणें ) अशा तीन मुक्ति प्राप्त होतात. शेवटली ती **सायुज्यमुक्ति** ह्मणजे

जीवात्मा परमात्म्याशीं संयोग पावून एक होणें. ५ आत्मा बंधनांत राहण्याचें कारण अज्ञान व मुक्त होण्याचें साधन ज्ञान आहे.

ज्ञान.

**ज्ञान** ह्मणजे आत्म्यानें स्वतांला ओळखणें, याला **आत्मज्ञान** ह्मणतात. आपणाला ओळखणें ह्मणजे मी मन, इंद्रियें व शरीर यांजपासून भिन्न आहें असें जाणणें. हेंच मुख्य ज्ञान होय. याशिवाय परलोकींचें सुख तुच्छ मानणें, हेंही एक प्रकारचें ज्ञान होय. हें ज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां शास्त्रपठण व तदुत्पन्न चित्तशुद्धि हीं अवश्य होत, व त्याकरितां तीर्थयात्रा, जप, तप, आदिकरून पुण्यकर्मे केलीं पाहिजेत. ज्ञानप्राप्तीला जी मनःशुद्धि पाहिजे ती ह्यांकडून होते. शास्त्रपठणाशिवाय गुरुउपदेशाही पाहिजे, आणि आत्मसाक्षात्कार होण्यासाठीं ह्या गोष्टीचें श्रवण, मनन, निदिध्यास केला पाहिजे; तेणेंकरून राग, द्वेष इ० दूर होतात. ज्ञानी पुरुष जोंपर्यंत शरीरांत आहे तोंपर्यंत कांहीं कांहीं कर्में करीत राहतो; तथापि त्या कर्मांकडून त्यास पापपुण्याचा लेप लागत नाहीं, त्याला त्याचें फळ भोगण्यास स्वर्गास किंवा नरकास जावें लागत नाहीं, व पुनः पुनः जन्म घ्यावे लागत नाहींत. ह्या ज्ञानानें प्रारब्धकर्म शिवाय करून त्याच्या पूर्वजन्मांतील कर्मांचें फल नष्ट होतें.

तीन प्रकारचीं कर्में.

कर्में तीन प्रकारचीं आहेत; एक **संचित**, दुसरें **क्रियमाण**, तिसरें **प्रारब्ध.** संचितकर्म ह्मणजे पूर्वजन्मांतील कर्म, परंतु त्याचें इहजन्मीं फळ प्राप्त झालें नाहीं; हें कर्मज्ञान होतांच दग्ध होतें. क्रियमाणकर्म ह्मणजे ह्या जन्मीं केलेलें कर्म, पण

तें ज्ञानी जो आहे त्याला लिप्त करीत नाहीं; आणि प्रारब्ध ह्मणजे ज्या पूर्वजन्मींच्या कर्मापासून इहजन्मीं शरीरप्राप्ति होते तें. हें प्रारब्धकर्म भोगण्याकरितां ज्ञानीला शरीरांत राहावें लागतें; तें त्याच्या ज्ञानानें नष्ट होत नाहीं, पण शरीरापासून तो सुटला ह्मणजे नष्ट होतें. मग त्याला पुनः जन्म घ्यावा लागत नाहीं; कारण त्यापाशीं कांहीं कर्म राहत नाहीं. मग तो अशरीर होतो इतकेंच नाहीं, तर त्याला मन किंवा ज्ञान व कोणत्याही गोष्टींचें भान राहत नाहीं. तो पाषाण बनतो. हाच काय तो ह्या दर्शनवाल्यांचा **परमार्थ** होय.

भिन्नभिन्न मतें.

सहा शास्त्रांचे जे भिन्नभिन्न सिद्धांत आहेत ते येणेंप्रमाणें:—

प्रकृति व पुरुष.

सांख्य व योग यांचा एक सिद्धांत हा आहे कीं, **प्रकृति** व **पुरुष** असे दोन आहेत. जीव हा पुरुष आहे, प्रकृति जड पदार्थ आहे. प्रकृतीपासून महत्तत्त्व ह्मणजे बुद्धि उत्पन्न होते, बुद्धीपासून अहंकार, अहंकारापासून इन्द्रियें व पंचतन्मात्रा हीं होतात. पंचतन्मात्रा पृथिव्यादि स्थूलभूतांचें सूक्ष्मरूप आहे. बुद्धि, अहंकार व मन ह्या तिन्हींच्या मेलनापासून अंतःकरण झालें आहे. पुरुष केवळ ज्ञानस्वरूप आहे. इच्छा, प्रयत्न, सुख, दुःख हे अंतःकरणाचे धर्म आहेत.

ज्ञान.

पण पुरुषाचें ज्ञान ह्मणजे काय? सांख्यमताप्रमाणें ज्ञान आत्म्याचें रूप नाहीं, व तें त्याचा गुणही नाहीं; तर तें अन्तःकरणाचा एक परिणाम आहे. सांख्यकार म्हणतात कीं, जेव्हां आपण घटपटादि जाणतों,

तेव्हां आमचें अन्तःकरण घटपटादि पदार्थांच्या आकाराप्रमाणें होतें; ह्मणजे हा घट आहे, हा पट आहे, असें जाणण्याची अंतःकरणाची वृत्ति होते.

पुरुषाचें ज्ञान.

अनादिकालापासून अंतःकरण व पुरुष यांची समीपता असल्याकारणानें पुरुष अंतःकरणांत व अंतःकरण पुरुषांत प्रतिबिंबित होऊन राहिलीं आहेत. याप्रमाणें जाणण्याच्या वृत्तीचें पुरुषामध्यें जें प्रतिबिंबित तेंच पुरुषाचें ज्ञान होय. याचप्रमाणें इच्छा, कर्तृत्व, ह्या अंतःकरणाच्या वृत्ति होत, व त्याही पुरुषांत प्रतिबिंबित झाल्याकारणानें पुरुष आपणास अज्ञानानें इच्छिणारा व कर्त्ता समजतो; यास्तव त्याला शुभाशुभ कर्मांचें फल व नरक भोगणें पडतें. ह्या दुर्दशेपासून सुटण्यासाठीं जो कोणी सांख्यशास्त्राचा अभ्यास करितो त्याला ज्ञान प्राप्त होतें. तें हें कीं, कर्तृत्व, भोक्तृत्व हे केवळ प्रकृतीचे धर्म आहेत; पुरुष तर प्रकृतीपासून भिन्न आहे, तो कर्त्ता नाहीं व भोक्ता नाहीं, पण ‘ शुद्धरूप ’ आहे.

ईश्वर व वेद.

सांख्य व योग ह्यांचे मुख्य सिद्धांत हेच आहेत; परंतु त्या दोहींमध्यें एक मोठा भेद आहे तो हा कीं, योग ईश्वराला मानितो, पण सांख्य ईश्वर आहे असें ह्मणत नाहीं. सांख्यकार वेदांला अनादि मानीत नाहींत, तरी त्यांचा कोणी कर्त्ता नाहीं, ते प्रत्येक सृष्टीच्या समयीं ब्रह्माच्या मुखांतून आपोआप निघतात, ब्रह्मा त्यांस स्वबुद्धीनें करीत नाहीं, ह्मणून तोही त्यांचा कर्त्ता नाहीं; असें त्यांचें मत आहे.

मीमांसाशास्त्रामध्यें इतर शास्त्रांप्रमाणें आत्मानात्मविचार नाहीं, परंतु केवळ वेदांचे विधि व कर्मकांड यांचा विचार आहे. हें शास्त्रही ईश्वराला मानीत नाहीं. वेद अनादि आहेत असें त्याचें मत आहे; त्यांत जीं कर्मफलें सांगितलीं आहेत तीं तें सत्य मानितें, परंतु त्यांतील देवतांचें वर्णन खोटें मानितें व ह्मणतें कीं, तें केवळ कर्मांची स्तुति करण्यासाठीं केलें आहे.

मीमांसा.

यज्ञाचा अर्थ वेदाप्रमाणें पाहिला असतां असा, होतो कीं अग्नींत मांसादिक द्रव्यें टाकून देवतांचीं कर्मे व गुण हीं स्तोत्रद्वारें गावीं; परंतु मीमांसाकारांच्या मतें इंद्रादि देव कांहीं नाहींत, आणि त्यांची चरित्रें स्वप्नवत् आहेत. तथापि वेदाच्या आज्ञेप्रमाणें त्यांच्या नांवांनीं अग्निकुडांत आहुति घातली पाहिजे, आणि त्यांच्या स्तोत्रांचीं अक्षरें मुखांतून निघालीं असतां त्यांचा असा कांहीं प्रभाव आहे कीं, तेणेंकरून स्वर्गप्राप्ति होते.

यज्ञ व देवता.

नैयायिक व वैशेषिक यांचे मुख्य सिद्धांत हे आहेत कीं, एक अनादि अनंत, निर्विकार, निराकार, निरवयव, सर्वव्यापक, सर्वशक्तिमान, सर्वज्ञ, जगत्कर्त्ता, सर्वांच्या कर्मांचा फलदाता असा ईश्वर आहे; तो अनादि जीवांस त्यांच्या सत् अथवा असत् कर्मांचें बरें किंवा वाईट फल देण्यासाठीं उपादानकारणरूप ( घटाला कारण मृत्तिका—मृ० ही घटाचें उ० ) पदार्थांस घेऊन ह्या प्रपंचाची रचना, प्रतिपालन व नियमन व नाश करीत आहे. पदार्थ कित्येक अनादि व कित्येक सादि आहेत. पृथ्वी, जल, अग्नि, वायु यांचे परमाणु

नैयायिक व वैशेषिक यांचीं मतें.

व आकाश, काल, दिशा, मन आणि आत्मा, हीं अनादि आहेत. हे परमाणु आपणच अनादिकालापासून बनून राहिले आहेत. ह्यांच्या एकत्र होण्यानें दृश्य व स्पर्श्य, पृथ्वी जल आदिकरून पदार्थ बनतात. यामुळें ते पदार्थ सादि व नाशिवंत होतात.

**जीवात्मे.**

नैयायिक व वैशेषिक जीवात्म्याला ज्ञान, इच्छा, कृति, धर्म, अधर्म, सुख, दुःख, इ० गुण आहेत असें समजतात. व ते अनादि, अनंत, अगणित असून शरीर, इंद्रियें आणि मन यांपासून भिन्न आहेत. जीव सर्वव्यापक आहेत असेंही ते समजतात; आणि जरी ते शरीरांत राहून पाहतात व सर्व प्रकारचें ज्ञान व इच्छादिक यांचा अनुभव घेऊं शकतात, तरी ते शरीराबाहेर राहूं शकतात व सर्वत्र व्यापूनही राहतात.

**आत्म्याचें अज्ञान.**

इतर दर्शनकारांप्रमाणें आत्मा अज्ञानानें आपणाला शरीरादिकांसह एक समजतो असेंही नैयायिकांचें मत आहे, आणि ही दुर्दशा केवळ ज्ञानानें दूर होते.

नैयायिक व वैशेषिक वेदांचा कर्त्ता ईश्वर आहे असें मानितात.

विचारसागर नामक गुजराती ग्रंथांत ह्या षट्शास्त्रांच्या परस्पर विरुद्धमतांचा थोडक्यांत फार चांगला गोषवारा दिला आहे, तो येणेंप्रमाणें:—सांख्यशास्त्रांत ईश्वराचा अंगीकार नाहीं. योगांत निरक्षेप प्रकृतिपुरुषाच्या विवेकज्ञानानें मोक्ष मानिला आहे. पतंजलांत ईश्वराचा अंगीकार व समाधीपासून मोक्ष सांगितला आहे. न्यायांत चार प्रमाणें व वैशे-

षिकांत दोन प्रमाणें धरिलीं आहेत. न्याय व वैशेषिक यांच्यामध्येंही परस्पर विरोध आहे. पूर्वमीमांसेंत ईश्वराचा अंगीकार नाहीं, मोक्षरूप नित्यसुख मानिलें नाहीं, परंतु कर्मजन्य विषयसुखच पुरुषार्थ मानिला आहे. उत्तरमीमांसेंत ईश्वर व मोक्ष मानिले असून विषयसुख पुरुषार्थ मानिला नाहीं. याप्रमाणें सर्व शास्त्रांचा परस्पर विरोध आहे. ( विचारसागर. पृ० ४४६. )

हिंदुधर्मविवेचक नामक मासिक पुस्तकांत ह्या सहा दर्शनांचा सारांश थोडक्यांत येणेंप्रमाणें सांगितला आहेः— "सांख्यदर्शन कपिलमुनीनें केलेलें. ह्या दर्शनाचे लोक निरीश्वरवादी आहेत. योग हा पतंजलानें केला. योगी परमेश्वरास मानितात. परमेश्वराचें सर्व कर्तृत्व मात्र योग्यांस कबूल नाहीं. परमेश्वर परमकारुणिक व सर्वज्ञ असून परार्थ आहे, अर्थात् संसारांतील जीवांचा उद्धार करण्यांत गुंतलेला असतो व मुक्ति पाहिजे असेल तर त्याचा ध्यानमार्गानें आश्रय करून त्यालाच शरण जाणें हाच एक उपाय; हें योग्याचें ह्मणणें. न्याय व वैशेषिक दोघेही परमाणूंपासून जग झालें असें ह्मणतात, व जसा कुंभार कुंभाचें तसा परमेश्वर या जगाचें निमित्तकारण समजतात. मीमांसेंत केवळ यज्ञकांडाचा विचार आहे, इंद्र वगैरे देवता मीमांसक शब्दमय समजतात, ह्मणजे 'इंद्र' शब्द हीच 'इंद्र' देवता, आणखी निराळी 'इंद्र' देवता नाहीं. वेद अनादि व स्वयंभू असून सुख व दुःख हीं प्राप्त होतात 'कर्म' करावें त्याप्रमाणें. तेव्हां सहजच परमेश्वराची मीमांसकांस गरज उरली नाहीं. वेदांतांत उपासनाकांड व ज्ञानकांड अर्थात्

तत्प्रतिपादक उपनिषद्भागाचा व 'ब्रह्माचा' विचार केलेला आहे." ( पु० १. अं. ३. )

---

## प्रकरण २.
## वेदांतशास्त्र.

ह्या मताविषयीं कांहींसें विस्तारानें सांगितलें पाहिजे, कारण इतर सर्व दर्शनांपेक्षां याची प्रवृत्ति हिंदु लोकांत फार आहे, व उपनिषदादि वेदसंबंधी ग्रंथांत ह्याचीं बीजें जशीं अढळतात तशीं इतर दर्शनांचीं व्यक्त नाहींत.

तीन प्रकारची सत्ता.

वेदांती तीन प्रकारची सत्ता ( अस्तित्व—असणें ) मानितात; ह्मणजे **पारमार्थिक सत्ता, व्यावहारिक सत्ता** व **प्रातिभासिक सत्ता.** पारमार्थिक ह्मणजे उत्तम असा अर्थ नव्हे, तर सत्य असा अर्थ समजावा. असा पारमार्थिक पदार्थ वेदांतमतानें एक ब्रह्मच होय, दुसरा ह्मणजे त्यावांचून अन्य सत्य वस्तु नाहीं. व्यावहारिक पदार्थ सत्य नाहींत, पण अज्ञान लोक ते सत्य आहेत असें समजतात. हें जग व्यावहारिक आहे, पण सत्य नाहीं. प्रातिभासिक ह्मणजे जो भ्रमानें आहे असा भासतो तो पदार्थ. व्यावहारिकांत व यांत भेद इतकाच कीं, याला सर्व लोक सत्य मानीत नाहींत, कोणी कोणी त्याला सत्य मानितात. उदाहरणार्थ स्वप्नांतील पदार्थ शिंपल्यांतील रुपें, इ०.

पारमार्थिकदशेंत एक ब्रह्म खेरीजकरून सर्व संसार मिथ्या आहे, परंतु व्यावहारिकदशेंत ईश्वर, जीव व सर्व

जग हीं व्यावहारिक सत्य आहेत. व्यावहारिकदर्शेत वेदांती स्वर्ग, नरक, सुख, दुःख, शुभाशुभ कर्म मानितात.

पारमार्थिकदर्शेचा व सर्व वेदांतमताचा सारांश ह्या पुढील श्लोकार्धांत आहे:—

ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ।

एक ब्रह्म ह्मणजे सत्, चित्, आनंदरूप आत्मा, ज्यामध्यें कांहीं गुण नाहींत व क्रिया नाहीं, ज्यांत मी, तूं, व तो यांचें भान नाहीं, जें कोणाला जाणत नाहीं व ज्याला कोणी जाणूं शकत नाहीं, जें अल्पज्ञ नाहीं व सर्वज्ञ नाहीं, जें अल्प शक्तिमान् नाहीं व सर्वशक्तिमान् नाहीं, ज्याला आदिअंत नाहीं, जें निर्विकार आहे, तेंच एक सत्य पदार्थ आहे. त्याखेरीज सर्व मिथ्या आहे ह्मणजे कांहींच नाहीं, कांहींच नव्हतें व कांहींच होणार नाहीं. ह्या मताला "अद्वैतमत" ह्मणतात.

शंका व समाधान.

आतां यावर कोणी अशी शंका काढतील कीं, जर हें जग मिथ्या आहे तर तें दृष्टीस कसें पडतें व जीव ब्रह्म असून तो आपल्याला ब्रह्म कां समजत नाहीं, व दुःख कां भोगितो ? ह्यास वेदांतीचें उत्तर—आह्मांला अज्ञानानें हें जग खरें भासतें, हें सर्व ब्रह्मच आहे पण अज्ञानानें जग आहे असें भासतें, जसें कोणी दोरीला भ्रमानें सर्प समजतात त्याप्रमाणें हें आहे. ब्रह्म हें रज्जु समजा व जग हें सर्प समजा. जेव्हां आह्मी जगत् ब्रह्म समजतों तेव्हां खरोखर ब्रह्म जगत् झालें असें समजत नाहीं, तर ब्रह्म हें जगतासारिखें दिसतें इतकेंच समजावें. याचा अर्थ असा आहे कीं, जगताची जी सत्ता

आहे ती त्याची स्वताची नाहीं, तर ब्रह्मसत्ता आहे. यावरून वेदांती ब्रह्माला जगाचें विवर्तोपादान मानतात, ह्मणजे तें उपादान नाहीं; ह्मणजे जशी मृत्तिका मडक्याचें उपादान (ह्म० त्यापासून किंवा त्याचें होणें) आहे तसें नाहीं; तर दोर जसा सर्पाचें अधिष्ठान आहे तसा व त्याच्या सत्तेनें याची सत्ता होते, परंतु जसा दोराचा सर्प होत नाहीं, त्याप्रमाणें विवर्तोपादान आहे; परंतु माया (ह्म० अज्ञान) ही जगाचें उपादान आहे. याप्रमाणें वेदांतमतांत सत्, चित्, आनंद आणि नाम व रूप ह्या पांच पदार्थांतून पहिल्या तिन्हींस ब्रह्म ह्मणतात, व शेवटल्या दोहोंस माया ह्मणतात.

माया.

वेदांती ह्मणतात कीं, माया ही भ्रम नाहीं, परंतु भ्रमाचें कारण आहे, आणखी मायेला ते अज्ञानही ह्मणतात, व तिला ज्ञानाभावरूप आहे असेंही मानीत नाहींत. आणखी माया ईश्वराची शक्ति आहे असेंही ह्मणतात; कारण ईश्वर आपणाला जगत्कर्ता ह्मणवितो. परंतु वेदांतीच्या मताप्रमाणें शुद्धब्रह्मामध्यें कर्तृत्वादिक गुण नाहींत, केवळ अज्ञानानें ब्रह्मावर कर्तृत्वाचा आरोप केला जातो. कारण जगतच कांहीं नाहीं तर त्याची कृति (उत्पत्ति) कोठून होईल? आणखी ईश्वराचा व मायेचा संबंध भ्रमकल्पित आहे; ह्मणजे माया ईश्वराची शक्ति आहे व ती भ्रमाचें कारणही आहे. अशी कांहीं ह्या विषयांत गडबड आहे.

जीव.

वेदांती ह्मणतात कीं, जीव ब्रह्मरूप आहे तरी तो मायेला ह्मणजे अज्ञानाला वश होऊन आपले स्वरूपाला विसरला आहे. आणि अंतः-

करण व शरीर यांस सत्य समजून व त्यांचा अहंकार बाळगून आपणाला मनुष्य इत्यादि समजतो. तसेंच संसाराचे सर्व पदार्थ मिथ्या असून अज्ञानानें त्यांस तो सत्य मानितो, आणि कित्येकांस आप, कित्येकांस पर ह्मणतो, व कांहींकांपासून सुख व कांहींकांपासून दुःख मानितो. यामुळें त्याच्या मध्यें राग, द्वेष उत्पन्न होतात, व त्यामुळें त्यास बरीं वाईट कर्में करावीं लागतात. आणि त्या कर्मांचें फळ भोगण्याकरितां स्वर्गांत व नरकांत जाणें व वारंवार जन्म घेणें पडतें. ह्या सर्व वस्तु मिथ्या आहेत तरी त्याला त्या सत्य भासून त्यामुळें त्याची ही दुर्दशा होते.

अज्ञान अनादी आहे.

वेदांती व इतर दर्शनकार जीव अनादिकालापासून संसारांत बद्ध झाला आहे असें समजतात. माया किंवा अज्ञान हें अकस्मात किंवा मध्येंच झालें असें त्यांचें मत नाहीं. हें मायेचें अनादित्व त्यांच्याच अद्वितीय ब्रह्माच्या मताला विरुद्ध आहे, कारण दोन पदार्थ सत् नाहींत, एकच सत् ब्रह्म आहे असा त्यांचा सिद्धांत आहे. ह्या शंकेला ते असें उत्तर देतात कीं, माया हा पदार्थ सत्‌ही नाहीं व असत्‌ही नाहीं; ह्मणजे तो आहे असा नाहीं व नाहीं असाही नाहीं. तो आहे अशासाठीं ह्मणवत नाहीं कीं, तो परमार्थदशेंत नाहीं, व त्याला नाहीं असें अशासाठीं ह्मणवत नाहीं कीं, तो प्रातिभासिकदशेमध्यें ह्मणजे तो खोटा आहे. "माया सदसद्‌द्वयामनिर्वचनीया" ह्या त्यांच्या वचनाचें हेंच तात्पर्य आहे. आणखी ते असेंही ह्मणतात कीं, माया जशी प्रातिभासिक आहे, तसेंच जीवाची बद्धदशाही प्रातिभासिक आहे. खरोखर जीव कधींच बद्ध नव्हता आणि त्याला मुक्त होणेंही

नाहीं. ब्रह्म निर्गुण असतां सगुण झालें असें प्राचीन ब्राह्मण समजतात; परंतु अलीकडील सर्व वेदांती असें ह्मणतात कीं, ब्रह्म कधींच सगुण झालें नाहीं. ब्रह्मांतून कांहीं अंश निघून मायेंत सांपडून फसले असेंही त्यांचें ह्मणणें नाहीं. त्यांच्या मताप्रमाणें ब्रह्मामध्यें कांहीं अंशांशिभाव नाहीं व त्याचे अंश त्यापासून कधीं भिन्न होऊन मायेमध्यें फसत नाहींत, तर जीव अनादिकालापासून मायेंत फसला आहे, कारण माया ह्मणजे अज्ञान अनादि आहे. या प्रकारच्या ज्ञानाची प्राप्ति झाली, ह्मणजे संसार खोटा व मी सच्चिदानंद ब्रह्म आहें असें समजूं लागलें ह्मणजे प्राणी मायेपासून मुक्त होतो, आणि ब्रह्म बनतो; परंतु ज्ञानप्राप्तीनंतरही प्रारब्धकर्माचा भोग भोगीत शरीरांत राहणें प्राप्त आहे; व तोंपर्यंत सुखदु:खही सुटत नाहीं. प्रारब्धभोगसमय समाप्त झाल्यावर जेव्हां कैवल्यप्राप्ति होईल तेव्हां पूर्ण मुक्ति होईल. हा सिद्धांत इतर दर्शनांतील सिद्धांतांशीं मिळतो.

चित्तशुद्धि; ईश्वरभक्ति.

आणखी वेदांती इतर दर्शनकारांप्रमाणें ज्ञानप्राप्तीसाठीं बुद्धीची शुद्धि झाली पाहिजे असेंही ह्मणतात. ही चित्तशुद्धि अनेक जन्मपर्यंत जप, तप, तीर्थयात्रादि पुण्यकर्मांनीं प्राप्त होते. ह्या ज्ञानाच्या प्राप्तीसाठीं ईश्वरभक्ति करणें ते योग्य समजतात. ही ईश्वरभक्ति पुराणांत विष्णु, शिव आदिकरून ज्या स्वरूपानें तो प्रगट झालेला वर्णिला आहे त्याची केली पाहिजे, व त्यानें केलेल्या लीला मानिल्या पाहिजेत. तसेंच वेदांतील यज्ञयागादिक कर्मे करणें योग्य आहे असें समजतात. आणखी असेंही ह्मणतात कीं, जेव्हां मनुष्य संसारा-

पासून विरक्त होऊन केवल ज्ञानाभ्यास करूं इच्छितो, व विधियुक्त संन्यास घेतो, तेव्हां त्याला यज्ञादि कर्मे करण्याचा अधिकार राहत नाहीं; तथापि कर्मकांड खोटें आहे असें नाहीं; आणि जरी संन्याशाला यज्ञादि कर्में करण्याचा अधिकार नसला तरी त्याला विष्णु, महादेव इ० ची मानसिकभक्ति करणें योग्य आहे; तर वेदांती लोक केवळ निर्गुण ब्रह्माला मानितात व विष्णु, शिव यांस मानीत नाहींत व मूर्तिपूजा करीत नाहींत असें जे समजतात ते मोठी चूक करितात, कारण व्यवहारदशेंत तेही सर्व सत्य आहेत असा त्यांचा समज आहे; आणि पारमार्थिकदशेंत सर्व पदार्थ, व ज्यांत वेदांतमताची उत्पत्ति व निर्णय आहे अशीं जीं उपनिषदें तीं देखील खोटीं आहेत असा त्यांचा समज आहे. याप्रमाणें वेदांतादि षट्दर्शनांचे मुख्य सिद्धांत आहेत.

हें सर्व प्रकरण एका विद्वान् काशीकर पंडिताच्या **षट्दर्शनदर्पण** नामक हिंदी पुस्तकावरून कांहींसें संक्षेपानें व विषयांचीं खंडें करून व बाजूस सदरें घालून तयार केलें आहे.

वेदांतमताचे अर्वाचीन काळांतील प्रतिपादकांमध्यें शंकराचार्य हे मोठे प्रसिद्ध असून वेदांतअर्थप्रकाश अशा बहुत ग्रंथांचे कर्त्तेही आहेत.

शंकराचार्यांचे सिद्धांत.

वेदांताविषयीं शंकराचार्यांचे जे सिद्धांत आहेत त्यांचा सारांश एका अर्वाचीन हिंदु ग्रंथांत येणेंप्रमाणें सांगितला आहे:—

सत्यंज्ञानमनंतं ब्रह्म—सदेव सोम्येदमग्र आसीत्—आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्—एकमेवाद्वितीयं ब्रह्म—नेहनानास्तिकिं-

चन—ज्ञानादेवतुकैवल्यं—ब्रह्मविदाप्नोतिपरं—यदाह्येवैष एतस्मिन्नुदरमंतरं कुरुते अथ तस्य भयं भवति—असन्नेव स भवति—असद्ब्रह्मेतिवेदचेत्—अस्ति ब्रह्मेतिचेद्वेद संतमेनं ततो विदुरिति—योवेदनिहितं गुहायां परमेव्योमन् सोऽश्नुते सर्वान् कामान् सः—तत्त्वमसि—अहं ब्रह्मास्मि.

अर्थ—"तिहीं कालीं अबाधित त्यास सत्य असें ह्मणावें. तेंच ज्ञानघन आणि अनंतशब्देंकरून देशकालवस्तुपरिच्छेदरहित ब्रह्म होय. तेंच सत् अशा उपलक्षणानें सृष्टीच्या पूर्वीं असतें झालें. अथवा आत्मा सृष्टीपूर्वीं असता झाला. सदादि लक्षणांनीं युक्त ब्रह्म आणि आत्मा हे दोन निरनिराळे नाहींत; कारण ब्रह्म सजातीय, विजातीय आणि स्वगत भेदरहित असें एकच अद्वितीय आहे. तेथें नाना ह्मणजे अनेक कांहींच नाहीं. असें असतां, नसून जें जें दिसतें तें तें भ्रम ह्मणजे अज्ञानास्तव दिसतें. यास्तव ज्ञानेंकरूनच मोक्ष होतो, ब्रह्मवेत्ताच परब्रह्मास पावतो ह्मणजे ब्रह्मच होतो. जो कोणी ब्रह्म आणि आत्मा यांच्यामध्यें अंतर करितो ह्मणजे भिन्न ह्मणतो तो भय पावतो. जो ब्रह्मास असत् ह्मणतो तो स्वतःच असत् होतो. ब्रह्म आहे तसेंच राहतें; ह्मणून आहे ह्मणतो तोच सद्रूप जाणावा. गुहेंत (पंचकोशामध्यें) निहित जें ब्रह्म तें जो जाणतो तोच सर्व कामावाप्तीस पावतो. ह्मणूनच 'तें तूं आहेस' असें गुरूनें, शरण येऊन पुसणाऱ्या शिष्यास सांगावें. त्यानेंही मी ब्रह्म आहें असें त्रिपुटीवांचून [ ध्येय, ध्याता, ध्यान ] अनुभवावें."

कित्येक मूळवचनें.- ह्या प्रकरणासंबंधी कित्येक वचनांचें मूळ:-

१. सांख्यशास्त्राचा हेतु—आत्म्याची मुक्ति.

सांख्यशास्त्रस्य तु पुरुषार्थतत्साधनप्रकृतिपुरुषविवेकावेव मुख्यो विषयः अथ शास्त्रस्य परमं प्रयोजनमपवर्गः ।

( अर्थ. संक्षिप्त ) आत्म्यास मुक्त करणें हाच शास्त्राचा परमहेतु होय.

२. दुःख, जन्म, संसार, अज्ञान हीं दूर झालीं ह्मणजे मुक्ति प्राप्त होते:—

दुःखजन्मप्रवृत्तिदोषमिथ्याज्ञानामुत्तरोत्तरापाये तदनंतरापायादपवर्गः । (न्यायसूत्र. )

३. अज्ञान ह्मणजे काय? केवळ ज्ञानाभाव नव्हे, तर अविद्या, गैरसमजूत, भ्रांति, भ्रमः—

अज्ञानमविद्याऽहम्मतिः। (अमरकोश. )

विपर्ययोऽज्ञानमविद्या सा बुद्धिधर्मः (तत्त्वकौमुदी).

४. बरीं व वाईट कर्में आत्म्याच्या बंधनांचीं कारणें होतः—

ततोऽपि च कारणोच्छेदाद्धर्माधर्मरूपाणि बन्धनानि बुद्धिपुरुषयोर्बंधकारणानि श्लथयत्यदृष्टोत्पादनाक्षमाणि करोति ॥

५. कर्मांनीं मिळविलेलें स्वर्गादि सुख अक्षय नाहीं:—

कर्मसाध्यस्य चाऽनित्यत्वे श्रुतिः तद्यथेह कर्मचितो लोकः क्षीयत एवमेवाऽमुत्र पुण्यचितो लोकः क्षीयते ॥ (सांख्यप्रवचन भाष्य. )

६. काम्य (फलाची इच्छा धरून केलेल्या) कर्मांत व अकाम्य (फलेच्छारहित) कर्मांत बंधन आहे:—

काम्येऽकाम्ये च कर्मणि, दुःखाद्दुःखं भवति (सां० प्र० भा०.)

७. यम नियम ह्मणजे काय?

अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः। नियमानाह। शौचसन्तोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधाना नियमाः ॥ (न्यायसूत्रवृत्ति.)

“अहिंसा, सत्य, चोरी न करणें, ब्रह्मचर्य, इंद्रियदमन, हे यम आहेत. शुद्धि, संतोष, तप, स्वाध्याय (मनांत मं-

त्रादिकांचा जप करणें किंवा आपणास योग्य ग्रंथांचें पठण ) आणि ईश्वराच्या ठायीं चित्ताची एकाग्रता, हे नियम."

८. जीवन्मुक्ताचें लक्षणः—

जीवन्मुक्तो नाम स्वस्वरूपपाखण्डशुद्धब्रह्मज्ञानेन तदज्ञानबाधनद्वारो स्वस्वरूपाखण्डब्रह्मणि साक्षात्कृते सत्यज्ञानतत्कार्यसंचितकर्मसंशयविपर्ययादीनामपि बाधितत्वादखिलबन्धरहितो ब्रह्मनिष्ठः (वेदांतसार)

अर्थ—जीवन्मुक्त ह्मणजे जो आपलें स्वस्वरूप जें अखंड शुद्धब्रह्म त्याच्या ज्ञानानें ब्रह्मसाक्षात्कार पावतो, आणि सर्व बंधनांपासून मुक्त होऊन ब्रह्माच्या ठायीं राहतो तो.

९. आत्मा अनादि आहेः—

धीरनादिरतोऽस्याश्च सिद्धा भोक्तुरनादिता. (सांख्यसार. )

बुद्धि अनादि आहे, तिचा भोक्ता जो आत्मा तोही तसाच आहे.

१०. ईश्वर आहे असें सिद्ध करून देतां येत नाहींः—

ईश्वरासिद्धेः । ( सांख्यप्रवचन. )

११. ईश्वर सृष्टीचा कर्त्ता नाहीं, प्रकृतीच आरंभ करिते.

आरम्भः सर्वप्रकृत्यैव कृतो नेश्वरेण । ( तत्वकौमुदी. )

१२. ईश्वर सर्वज्ञ नाहींः—

परमेश्वरस्य सर्वज्ञत्वादिव्यवहारस्तु लोकव्यवहारादिति ।

( पातंजलभाष्य वार्तिक. )

अर्थ. परमेश्वर सर्वज्ञ इ० आहे हें बोलणें केवळ लोकव्यवहारास अनुसरून आहे.

१३. तीन प्रकारची सत्ता किंवा अस्तित्वः—

त्रिविधं सत्त्वं पारमार्थिकं व्यावहारिकं प्रातिभासिकं चेति ।
तत्र पारमार्थिकं सत्वं ब्राह्मणः, व्यावहारिकं सत्वमाकाशादेः
प्रातिभासिकं सत्वं शुक्तिरजतादेः । (वेदांतपरिभाषा. )

ह्याचा अर्थ **वेदांत** प्रकरणांत दिला आहे.

१४. पांच प्रकारचें अस्तित्वः—

अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंशपंचकम् ।
आद्यत्रयं ब्रह्मरूपं मायारूपं ततो द्वयम् ।

ह्याचा अर्थ वरच्या प्रकरणांत आला आहे.

१५. वेदांतीचा अनुभवः—

शरीर, स्वर्ग, नरक, बंधन व मुक्ति ह्या केवळ कल्पना मात्र आहेत, मी जो शुद्ध चिदात्मा ( केवळ चित्त, बुद्धि ) त्या मला यांशीं काय करावयाचें आहे?—

शरीरं स्वर्गनरकौ बन्धमोक्षोभयं तथा ।
कल्पनामात्रमेवैतत्किं मे काय चिदात्मनः ॥

१६. ज्ञान आणि कर्में यांचाही संबंध आहेः—

तच्च ज्ञानं पापक्षयात्स च कर्मानिष्ठनादिति ।
परम्परया कर्मणां विनियोगः ॥ ( वेदांतपरिभाषा. )

अर्थ.—पापक्षयामागें ज्ञानप्राप्ति होते. पापक्षय कर्में केल्यानें होतो. असा हा परस्परांचा संबंध आहे.

प्रश्न.—तर कर्में बंधनाचें कारण आहे असें कां ह्मणतां?

१७. परमेश्वर एक असून गुणभेदामुळें तीन झाला आहे.

स च परमेश्वर एकोऽपि स्वोपाधिभूतमायानिष्ठसत्वरजस्तमोगुणभेदेन ब्रह्मविष्णुमहेश्वरादिशब्दवाच्यतां भजते ॥ ( वे० प० भा० )

१८. जगाला खरोखर अस्तित्व नाहीं. जसा दोरीच्या ठायीं कल्पिलेल्या सर्पास अस्तित्व नाहीं तसें हें विश्व मायेच्या शक्तीनें आहे असें मानिलें जातेंः—

रज्जौ भुजंगो भयदो यथैव न जायते नास्ति न चैति नाशं। त्वन्मायया केवलमात्मरूपं तथैव विश्वं त्वयि नीलकंठ ॥ ( शिवगीता. )

१९. ईश्वरास सृष्टत्व कशानें आलें ?

मायी सृजति विश्वं सन्निरुद्धस्तत्र मायया । अन्य इत्यपरा ब्रूते श्रुतिस्तेनेश्वरः सृजेत् ॥ ( पंचदशी—चित्रदीप प्रकरण. ६. १९७ )

ईश्वरास सृष्टत्व आणि जीवास बद्धत्व मायायोगानें आहे अशी श्रुति आहे.

२०. ज्ञात्यास ( ह्मणजे ब्रह्मज्ञानी यास ) प्रपंचाचें मिथ्यात्व पूर्ण ठाऊक असतें, मग त्याच्या ठायीं त्याची इच्छा कशी उद्भवेल ? उत्तर.—ज्ञात्याची प्रपंचाचे ठायीं मिथ्यात्वबुद्धि असल्यामुळें त्याविषयीं त्यास इच्छाच नाहीं, अर्थात् त्याजकडून व्यवहारही घडायाचा नाहीं, असें जर ह्मणशील तर असें ह्मणूं नको. प्रारब्धकर्माप्रमाणें ध्यान करीत अथवा व्यवहार करीत तो अगदीं लौकिकजनाप्रमाणें राहतो:—

मिथ्यात्वबुध्या तत्रेच्छा नास्ति चेत्तर्हि मास्तुतत् ।
ध्यायन्वाथ व्यवहरन्यथारब्धं वसत्वयम् ॥

( पंचदशी.—ध्यानदीप. ९. १५. )

---

## प्रकरण ३.
## भगवद्गीतेंतील अध्यात्मज्ञान.

उपोद्घात.

उपनिषत्कारांनीं वेदांतील कर्मकांडांचा जसा त्याग केला व दर्शनकारांनीं ब्रह्मविद्येची जशी पद्धत लाविली त्याप्रमाणें गीताकारानें उपनिषदें व दर्शनें यांतून मनास वाटेल तें निवडून घेऊन व त्यावर स्वकीय कल्पना बसवून नवीनच तत्वज्ञानाची रचना केली आहे, परंतु ही रचना पद्धतवार किंवा ठाम झालेली नव्हती असें चिकित्सक विद्वानांचें मत आहे. ही

रचना कोणत्या काळांत झाली हें निश्चयानें सांगवत नाहीं. मुळीं महाभारताचा ग्रंथ वाढण्यास व पूर्ण होण्यास दीर्घकाळ लागला असावा, त्यांत जे अनेक विषय पाठीमागून घुसडून दिले त्यांपैकीं हें कवन असावें यांत संशय नाहीं. हें महाभारताच्या भीष्मपर्वांत आहे. ( अ. २५. श्लोक. ८३०—१,५३२. ) त्याचे १८ अध्याय असून तें कृष्णार्जुनसंवादरूपानें रचिलें आहे. त्याचीं मराठींत व इंग्रजींत अनेक भाषांतरें झालीं आहेत. गीताकर्त्याच्या काळांत ब्राह्मणधर्मांत कर्ममार्गाचें प्राबल्य फार वाढलें असावें असें दिसतें. दर्शनांतील जो ज्ञानमार्ग त्याचीं मतें लोकांस नावडतीं होत चाललीं असून त्यांतील परस्परविरुद्ध विचार त्यांच्या ध्यानांत येऊन चुकले होते. अशा अव्यवस्थेंत कांहीं सुधारणूक करावी व ती जशी सांप्रतकाळचे सुधारलेले हिंदुलोक धर्मसुधारणा करूं इच्छितात तशा प्रकारची करण्याचा त्यानें यत्न केला.

गीतेंतील विषय.

गीतेंत कृष्णाला मुख्य देव मानिला आहे. त्या काळीं जरी राम, शिव इ० देवतांची भक्ति होती तरी कृष्णभक्ति लोकांस विशेष आवडत होती, ह्या कारणें कृष्णालाच परब्रह्म मानून हा अध्यात्मविषय रचला असें दिसतें.

योग व सांख्य यांची एकवाक्यता करण्याचा प्रयत्न.

गीताकारानें योग व सांख्य ह्यांचें ऐक्य करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु गीतेंतील योग पतंजलीच्या योगाहून भिन्न आहे. पतंजलीच्या मताप्रमाणें मनुष्यानें आपल्या सर्व संकल्पांचा देखील त्याग करून ज्ञानमार्गें

योगसाधन केलें पाहिजे, परंतु कृष्ण ह्मणतो कीं, कर्ममार्गानें योगसिद्धि होते. अ. ६. १६, १७:—

"जो अतिरिक्त भोजन करणारा, सर्वथा भोजनाचा त्याग करणारा, अति निजणारा व सर्वथा निद्रा टाकणारा यास समाधियोग घडत नाहीं. तर ज्याचीं आहार, विहार हीं सर्व अगदीं नियमित आहेत त्यालाच हा दुःखनिवर्त्तक योग घडतो" ( सार्थगीता ).

तसेंच योगशास्त्रांतील शाबरीप्रयोगही गीतेंत वर्जिला आहे. सांख्यशास्त्रांतील पुरुष व प्रकृति यांसंबंधी मतें ग्रहण केलीं आहेत; तरी त्यांजवर ईश्वराचें आधिपत्य स्थापिलें आहे. हा एक मोठ्या महत्वाचाच फेरफार ह्मटला पाहिजे.

प्रकृति दोन आहेत असें सांगितलें आहे. हा आणखी एक मोठा फेरफार. "भूमि, उदक, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार अशी आठ प्रकारें विभागलेली माझी प्रकृति आहे. ही अपरा ह्मणजे निकृष्ट होय. इजहून वेगळी जी माझी परा ह्मणजे श्रेष्ठ प्रकृति, ती जीवरूप तिनें ह्या जगतास आधार दिला आहे." ( अ. ७. ४, ५. )

परमात्मा तोच विश्वात्मा.

परमात्म्याचें जरी बऱ्याच प्रकारें वर्णन केलें आहे तरी शेवटीं तोच विश्वात्मा आहे असें वेदांतमत ग्रहण केलें आहे. कृष्णानें आपलें विश्वरूप अर्जुनास दाखविलें तेव्हां तें पाहून अर्जुन त्यास ह्मणतो,

"तूं सकल देवांचा आदिभूत असून पुराणपुरुष आहेस. यामुळें सर्व भूतांचें लयस्थान असून यावद्वस्तुमात्रही तूं आहेस व तूंच अनंतरूप असल्यामुळें हें सर्व जगत् आपल्याच रूपानें व्याप्त केलें आहेस. ( ११. ३८ )

सृष्ट्युत्पत्ति.

परमेश्वरानें शून्यापासूनच सर्व सृष्टि उत्पन्न केली हें मत ज्याप्रमाणें इतर हिंदुधर्मग्रंथांत मिळत नाहीं, तसेंच तें गीतेंतही सांपडत नाहीं, तर सकल विश्व परमात्म्याचें रूप आहे; इतकेंच नव्हे, तर "सकल भूतांमध्यें सकल बीज मीच आहें" असें कृष्ण सांगतो. ( बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम्—७।१०) "ह्या दोन्ही प्रकृति मजपासून झालेल्या व माझेच अंश आहेत." (७. ६ ) तसेंच प्रकृति अनादि आहे, व आत्माही ( पुरुष ) अनादि आहे हें दर्शनांतील मत गीताकारानें मान्य केलें आहे. परंतु प्रकृति व पुरुष हीं परस्परांच्या आश्रयानें राहतात असें ह्मटलें तर त्यांस देव ह्मणावें लागेल ह्मणून त्या दोघांस परमात्म्याशीं जोडलें आहे; ह्मणजे परमात्मा हा त्यांचें बीज ( उत्पादक नव्हे ) आहे. हें मत उदाहरणानें स्पष्ट करून दाखविलें आहे:—

"आतां जगतांत माझी व्याप्ति कशी आहे ह्मणशील तर उदकांत रसरूपानें मी वास करितों. ह्मणून रस ही माझी विभूति आहे. पृथ्वींत सुगंधरूपानें, अग्नींत तेजोरूपानें इ० ( सार्थगी० अ० ७,८,९).

दोन पुरुष.

गीतेंत जशा दोन प्रकृति मानिल्या आहेत, तसेच दोन पुरुष सांगितले आहेत. "नाश पावणारीं सर्व भूतें क्षरपुरुष होय. आणि जो निर्विकार व मायोपाधिरहित तो अक्षर आहे." परंतु ह्या दोहोंपेक्षां श्रेष्ठ असा परमात्मा आहे. (अ. १५.१६,१७.) कृष्ण आपणास हा "परमात्मा" ह्मणतो.

गीतेंत भक्तिमार्गाचेंही महात्म्य वर्णिलें आहे. कृष्ण अर्जुनाला वारंवार असें ह्मणतो कीं, सर्व दैवतें व कर्में यांचा त्याग करून मलाच भज, माझी भक्ति सुलभ आहे.

एक देवाची भक्ति व मुक्ति पावण्याचा मार्ग.

" माझे भक्त माझ्याप्रत पावतात. पत्र, पुष्प, फल आणि उदक इत्यादिकही मला भक्तिपुरस्सर समर्पण करितात, तें मी ग्रहण करितों. यास्तव हे कौंतेया, जें कर्म करशील व जें भक्षण करशील, ज्या वस्तूचें हवन करशील व जी वस्तु दान करशील, जें तप करशील तें सर्व जसें मला अर्पण होईल तसें कर." ( ९. २६,२७. )

अनेक दैवतें जरी परमात्म्याचे अंश आहेत तरी त्यांची भक्ति केल्यानें मोक्षप्राप्ति होत नाहीं:—

अनेक दैवः तांची भक्ति.

" जे तीन वेद जाणणारे, सोमवल्लीचा रसपान करणारे, पापरहित, यज्ञ करणारे, ते माझी प्रार्थना करून स्वर्गास जातात खरे, परंतु तेथील स्वर्गसुख भोगून त्यांचें पुण्य क्षय होतें, आणि ते पुनः एथें येतात. असा त्यांचा क्रम सतत चालतो, ह्मणून त्यांची जन्मनिवृत्ति होत नाहीं. (९.२१.)

गीतेनें जातिभेदाचें बंड मोडलें नाहीं. स्वजातीचे आचार व कर्में सोडूं नयेत, तीं नीच असलीं तरी करावीं असें सांगितलें आहे:—

जातिभेद.

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ( ३.३५ )

वर्णसंकरानें निरंतर नरकवास प्राप्त होतो. (१.४२,४३)

गीतेंतील ज्ञानाचें सार व्यावहारिक दृष्ट्या पाहिलें असतां इतकेंच दिसतें कीं आपापल्या जातिधर्माप्रमाणें ह्मणजे ज्या जातीचा जो आचार व जो धंदा असेल त्याप्रमाणें चालावें. कर्में सोडूं नयेत, पण तीं कर्में स्वजातीच्या कर्माखेरीज अन्य असूं नयेत. कुणब्यानें जन्मवर नांगर हांकीतच राहावें, व हजामाच्या मुलानें हजामतीच कराव्या. भिल्लाच्या पोरानें माणसें मारीतच राहावें. इतकेंच कीं, हीं कर्में करीत असतां त्यांचा अभिमान सोडून तीं कृष्णार्पण करावीं; ह्मणजे तो कोणत्याही जातीचा असला तरी कृष्णाप्रत पावतो. ( ९. ३२. )

गीतेचें व्यावहारिक गोष्टींचें सार.

(१) गीतेंत सर्वत्र सारखें मत दर्शविलें नाहीं, ह्याविषयीं उदाहरणें:—' जे पुण्यवंत असतात ते मला भजतात; त्यांचे चार भेद आहेत, १ आर्त्त ह्मणजे रोगपीडित, २ जिज्ञासु ह्म० आत्मज्ञान मिळवूं इच्छिणारा, ३ अर्थार्थी ह्म० भोग साधण्याची इच्छा करणारा, ४ ज्ञानी. त्यांमध्यें **ज्ञानी श्रेष्ठ.** त्याचें चित्त सर्वकाल मजकडे लागलेलें असतें. माझी मात्र भक्ति तो करितो. ज्ञान्यांला मी अत्यंत प्रिय व मला तो अत्यंत प्रिय. ज्ञानी तर माझा आत्माच असें मी मानितों; इ०. (अ० ७: १६-१८ ).

मतविपर्यास.

'तपस्व्यांपेक्षां योगी श्रेष्ठ, **ज्ञान्यांपेक्षांही योगी श्रेष्ठ**....ह्यास्तव हे अर्जुना तूं योगी हो.' ( अ० ६: ४६).

(२) 'परमेश्वर जरी सर्वव्यापी आहे, तरी तो जगताच्या **सर्व पापाचा व पुण्याचा धनी होत नाहीं.**

( अ० ५: १५ ) तरी '**मी यज्ञाचा व तपश्चर्येचा भोक्ता** आहें' ( ५:२९; ९:२४ ) असें कृष्ण ह्मणतो.

( ३ ) '**मी सर्व भूतांशीं समबुद्धीनें वागतों, मला द्वेष्य कोणी नाहीं** व **प्रियही कोणी नाहीं**' (९:२९.) तरी 'ज्याला निंदा व स्तुति समान, जो बडबड करीत नाहीं, जें कांहीं असेल, त्यांत जो संतुष्ट, इ० तो मनुष्य मला प्रिय आहे. **पण** जे माझ्या ठायीं श्रद्धा ठेवून, व मी हेंच सर्वस्व मानून, अमृतासारखा हितकारक असा हा धर्म मीं सांगितल्याप्रमाणें भक्तीनें आचरतात, ते मला **अत्यंत प्रिय होत.**' ( १२:१९, २० ). 'मीपणा, बळ, गर्व, काम, क्रोध, ह्यांचा आश्रय करून ते द्वेष्टे लोक आपल्या आणि दुसऱ्यांच्या शरिरांमध्यें असणारा जो मी, त्याची निंदा चालवितात.... **त्यांना मी सर्वदां जन्ममरणाच्या फेऱ्यांमध्यें टाकून अशुभ आसुरी योनीमध्यें जन्माला घालतों**....ते मूढजन, मला प्राप्त करून घेतल्यावांचूनच राहून, मग **अधोगतीला पोंचतात.** ' ( १६: १८–२० ).

( ४ ) 'जो अंतकाळीं माझेंच स्मरण करीत देह सोडून जातो, तो माझ्या स्वरूपीं मिळून जातो, **यांत संशय नाहीं**'. ( ८: ५. ) तरी 'अग्नि, ज्योति, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायणाचे सहा महिने, यांमध्यें प्रयाण करणारे **ब्रह्मवेत्ते जन** ब्रह्माला जाऊन मिळतात.' पण 'धूर, रात्र, तसाच कृष्णपक्ष, दक्षिणायनाचे सहा महिने, **यांत** प्रयाण करणारा योगी चंद्राच्या ज्योतीला जाऊन पोंचतो, आणि पुनः परत येतो' ( २३–२५ ). एकूण मनुष्यास मोक्ष प्राप्त होणें, जें त्याच्या स्वाधीन नाहीं अशा शुक्लकृष्णादि पक्षांत मरणें किंवा न

मरणें यावर आहे. कोणता विचारी पुरुष हें मत मान्य करील ?

अशा प्रकारचें अठरा अध्यायांतील गीताज्ञान अर्जुनाला जेव्हां प्राप्त झालें, तेव्हां युद्धाच्या ठायीं आप्तजनांस वधण्याविषयीं त्याच्या मनांत जी मोठी कांक्षा उत्पन्न झाली होती तिची निवृत्ति होऊन तो स्वकुलघात करायास स्वधर्मास ( ह्मणजे क्षात्रधर्मास ) अनुसरून प्रवृत्त झाला.

अर्जुन कृष्णास ह्मणतो--

"आपल्या प्रसादानें आत्मविषयक माझें अज्ञान नष्ट झालें; व स्वस्वरूपाच्या अनुसंधानाची स्मृति प्राप्त झाली. आतां मी युद्ध करण्याविषयीं सिद्ध आहें. मी तुमची आज्ञा पालन करितों. ( १८: ७३. )

---

## प्रकरण ४.

## अनुगीता.

महाभारतांत ( अश्वमेध पर्व अ० १६–५१ ) भगवद्गीतेप्रमाणें अध्यात्मज्ञानविषयक **अनुगीता** नामक एक कवन आहे. तें रचण्याचें कारण असें सांगितलें आहे कीं, पांडव व कौरव ह्यांचें युद्ध समाप्त झाल्यावर इंद्रप्रस्थ नगरीं कृष्णार्जुन एका राजगृहांत राहत असतां कृष्ण लवकरच द्वारकेस जाणार आहे असें जाणून अर्जुनानें त्याला विनंती केली कीं, 'हे देवकीपुत्रा, युद्धारंभीं जें ज्ञान तूं मला कथिलेंस तें सर्व माझ्या भ्रष्ट मनांतून नष्ट झालें. ते विषय जाणण्याची मला पुनः जिज्ञासा उत्पन्न झाली आहे, आणि तूं तर लवकरच द्वारकेस जाणार आहेस.'

त्याला कृष्णानें असें उत्तर दिलें कीं, "हे अर्जुना, तूं मजपासून गुह्य ऐकिलेंस आणि सनातन धर्माचे सत्य स्वरूपाविषयीं व शाश्वत लोकांविषयीं शिकलास तें तूं अबुद्धीमुळें ग्रहण केलें नाहींस हें मला अतिशय अप्रिय आहे ( अगदीं पसंत नाहीं ). त्याचें आतां पुनः स्मरण करणें मला असाध्य आहे. हे पंडुपुत्रा, तूं खरोखर श्रद्धाहीन व दुर्बुद्धि आहेस. आणि हे धनंजया ! ( मीं जें पूर्वीं सांगितलें ) तें पुनः संपूर्ण सांगणें मला शक्य नाहीं. कारण तो धर्म ( धर्मज्ञान ) ब्रह्मपद समजण्याकरितां पर्याप्त ( पुरेसा ) होता. त्याप्रमाणें तो पुनः कथन करणें मला शक्य नाहीं. कारण तेव्हां मी योगशक्तियुक्त असतां मीं तुला परब्रह्म कथन केलें. त्याविषयीं मी तुला एक पुरातन कथा सांगतों, ह्मणजे, ह्या ज्ञानास चिकटून राहून तुला परमगति प्राप्त होईल. मी..........जें सांगतों तें सर्व श्रवण कर. एकदां स्वर्गलोकाहून व ब्रह्मलोकाहून एक ब्राह्मण आला तो दुर्द्धर्ष ( न हलण्याजोगा—कठिण ) होता. त्याचें आह्मी यथायोग्य पूजन केलें. आतां हे अर्जुना, दिव्यविधींप्रमाणें आह्मीं त्याला विचारल्यावर त्यानें जें सांगितलें तें ऐक.

ब्राह्मणाच्या भाषणाचा आरंभ.

"ब्राह्मण ह्मणाला, हे मधुसूदना, मोक्षप्राप्तीकरितां जे विधि आचरायाचे त्यांविषयीं सर्व भूतमात्रांवरील दयेमुळें तूं जें मला विचारलेंस, तें मी तुला बिनचूक सांगतों. तें मोह ( माया ) छेदक आहे. मी जें सांगतों तें सावधान होऊन ऐक.

असा ह्या संवादाचा उपक्रम आहे. ह्या गीतेंत पंचोपाख्या-

नांतील कथा व आडकथा, मुख्य भाषणकार व उपभाषणकार नाटकांतील पात्रांप्रमाणें अनेक असून अनेक विषयांचा भरणा केला आहे. ही गीता छत्तीस अध्यायी ह्मणजे भगवद्गीते-पेक्षां अध्यायांनीं व पृष्ठांनीं दुप्पट आहे. अर्जुनास ती सर्व सांगायास 'कृष्ण परब्रह्माला' आठवण राहिली आणि स्वकीय गीतेचें त्यास स्मरण राहिलें नाहीं हें आश्चर्य नव्हे काय ?

वर जो उतारा घेतला आहे त्यांतील कित्येक गोष्टी विचारणीय आहेत, त्या येणेंप्रमाणें:—(१)भगवद्गीतेच्या समाप्तीस कृष्ण अर्जुनास ह्मणतो कीं, 'माझ्या ठायीं मन ठेव, माझी भक्ति कर, माझें पूजन कर, माझें वंदन कर, मी तुला सत्य प्रतिज्ञा करून सांगतों कीं, तूं मलाच मिळशील, तूं मला प्रिय आहेस. कोणत्याही धर्मकर्माच्या बळानेंच मी तरून जाईन, हा आग्रह सर्वथा सोडून, मला एकट्याला शरण ये. मी तुला सर्व पातकांपासून मुक्त करीन, शोक करूं नको.' आणि कृष्णाला अर्जुन ह्मणाला, 'अच्युत, तुझ्या प्रसादेंकरून माझा मोह निघून गेला, मी तोच पूर्वीचा अर्जुन, अशी मला स्मृति उत्पन्न झाली, माझा संदेह गेला, हा मी उभा राहिलों, तुझ्या आज्ञेप्रमाणें आतां वागतों.'(भ० गी० अ० १८. ६५, ६६, ७३). (२) कृष्णानें अर्जुनाला 'तूं मलाच येऊन मिळशील' असें जें पूर्वीं प्रतिज्ञापूर्वक वचन दिलें होतें तें विसरून आतां 'तूं श्रद्धाहीन व दुर्बुद्धि आहेस' असें तो त्याला दूषणें देतो. (३) हें पूर्वीचें ज्ञान पुनः कथन करण्यास आपण असमर्थ आहें असें कृष्ण तीन वेळां ह्मणतो. (४) जो नवीन ज्ञानोपदेश कृष्णानें अर्जुनास सांगितला, तो कोणत्या 'प्राचीन इतिहा-

सांत' आहे हें स्पष्ट केलें नाहीं. (५) स्वर्गीहून जो ब्राह्मण आला होता, त्यालाच पुनः बोलावून अर्जुनास उपदेश करायास लावला असेंही नाहीं. त्यानें जो उपदेश केला होता तोच कृष्ण अर्जुनास करितो. (६) कृष्णानें त्या ब्राह्मणाची पूजा केली. (७) ब्राह्मण कृष्णाला शिष्याप्रमाणें लेखून माझा उपदेश 'सावध होऊन ऐक' असें ह्मणतो. (८) ब्राह्मणाच्या उपदेशाचें सार हेंच आहे कीं, धर्मविधींचें आचरण केल्यानें मनुष्य मोक्ष पावतो. आणि गीतेंत कृष्णानें ह्मटलें आहे कीं, 'कोणत्याही धर्मकर्माच्या बळानें मी तरून जाईन हा आग्रह सर्वथा सोडून मला एकट्याला शरण ये.' परंतु असें कसें होईल? धर्मकर्में सोडलीं तर ब्राह्मणांची दक्षिणा सुटेल, व दक्षिणा सुटेल तर त्यांचें पोट कसें भरेल? सारांश, सर्व धर्म ब्राह्मणाच्या मुखांत व ब्राह्मणाच्या पोटांत बसला आहे!

## कृष्णाच्या उत्तराचें मूळः—

॥ श्रावितस्त्वं मया गुह्यं ज्ञापितश्च सनातनं। धर्मं स्वरूपिणं पार्थ सर्वलोकांश्च शाश्वतान्॥ अबुद्ध्या नाग्रहीर्यस्त्वं तन्मे सुमहदप्रियं। न च साद्य पुनर्भूयः स्मृतिर्मे संभविष्यति॥ नूनमश्रद्दधानोसि दुर्मेधा ह्यसि पांडव। न च शक्यं पुनर्वक्तुमशेषेण धनंजय॥ स हि धर्मः सुपर्याप्तो ब्रह्मणः पदवेदने। न शक्यं तन्मया भूयस्तथा वक्तुमशेषतः॥ परं हि ब्रह्म कथितं योगयुक्तेन तन्मया। इतिहासं तु वक्ष्यामि तस्मिन्नर्थे पुरातनं॥ यथा तां बुद्धिमास्थाय गतिमग्र्यां गमिष्यसि। श्रृणु धर्मभृतां श्रेष्ठ गदितं सर्वमेव मे॥ आगच्छद्ब्राह्मणः कश्चित्स्वर्गलोकादरिंदम। ब्रह्मलोकाच्च दुर्धर्षः सोस्माभिः पूजितोभवत्॥ अस्माभिः परिपृष्टश्च यदाह भरतर्षभ। दिव्येन विधिना पार्थ तच्छृणुष्वाविचारयन्॥ ( अनुगीता, अश्वमेधपर्व अ० १६, श्लो० १०–१६ ).

# खंड ३.—धर्मशास्त्रें.

## प्रकरण १.

### उपोद्घात.

वैदिक ग्रंथांच्या व दर्शनांच्या मागून हिंदुधर्मास धर्मशास्त्रांचा काल प्राप्त झाला. हीं धर्मशास्त्रें एका मनुष्यानें रचलीं किंवा तीं एकाच काळीं सर्व देशांत प्रचारांत आलीं असें समजूं नये; तथापि ज्या काळीं त्यांच्या रचनेस आरंभ झाला त्या काळांत आर्यलोकांची राज्य व धर्मसंबंधी व्यवस्था विशेष स्थिर झाली होती. जसें षट्दर्शनांचें मूळ उपनिषदांत सांपडतें तसें धर्मशास्त्राचें मूळ गृह्यसूत्रांत मिळतें. "कल्पसूत्रें व गृह्यसूत्रें या मूळच्या स्मृति. पण गृह्यसूत्रांत आचारादिकांचा विचार विशेष झालेला असतो. हळू हळू श्लोकमय स्मृति बाहेर पडल्या." याविषयीं एका विद्वानानें येणेंप्रमाणें वर्णन केलें आहे:—

"मनुधर्मशास्त्राच्या काळांत पुरोहिताची जी वृत्ति पूर्वीं महायज्ञ चालविण्यापुरती मात्र होती, ती वंशपरंपरा होऊन राहिली. ज्या ब्राह्मणांनीं वेदमंत्राचें गायन केलें होतें त्यांचा वंश आतां उपाध्यांचा वर्ग होऊन बसला. वेदाच्या प्राचीन काळांत जे शूद्र ठाऊक नव्हते ते आतां चार वर्णांपैकीं कनिष्ठ वर्गाचे असे प्रसिद्धीस आले. वैश्य शब्दाचा पूर्वीं भूमीसंबंधी अथवा मानवी असा जो अर्थ होता तो आतां केवळ शेतकऱ्यास लावूं लागले. राजाला यज्ञ करण्यास अधिकार राहिला नाहीं; परंतु त्यानें ब्राह्मणांस दक्षिणा द्यावी असें ठरलें. गुरु व अध्यापक यांचें पूज्यत्व

अतिशय वाढलें; तसेंच स्नानसंध्या व यज्ञोपवीत यांचें महत्त्व वाढलें. यज्ञाचें अन्न खाण्याची जरी मोकळीक होती तरी भक्ष्याभक्ष्याचे निर्णय झाले. पितर ह्मणून जे पूर्वींचे देवयोनींतील कोणी होते त्यांस यज्ञ करण्याबद्दल मेलेल्या वडिलांच्या पितरांस श्राद्ध करण्याची नवीन चाल व नवीन नियम चालू झाला. युद्ध करण्याची विद्या लोक शिकले. हत्ति, रथ, स्वार, तिरंदाज व तरवारी वागविणारे यांचें वर्णन धर्मशास्त्रांत केलें आहे. तसेंच नगरांचें व त्यांस वेढा घालण्याच्या रीतीचें वर्णन आहे. व्यापाराच्या जिनसांचा बाजार निरख बसविला गेला; देणेंघेणें, खतेंपत्रें वगैरेचा निर्णय झाला.

" धर्मशास्त्रांतील व्यवहाराचे नियम जरी कित्येक चांगले आहेत तरी ते मनुष्याच्या कर्मांच्या योग्यतेप्रमाणें नाहींत. अपराध्यास त्याच्या अपराधाच्या मानाप्रमाणें शिक्षा ठरविल्या नाहींत, तर जातीच्या उंचनीचपणाप्रमाणें आहेत. उंच जातीला अतिशय पवित्र मानिलें आहे, आणि तें पवित्रत्व कमी करण्याचा यत्न करणारास मोठ्या कडक शिक्षा सांगितल्या आहेत. सारांश, लोकसमूहाची उन्नति न होतां त्यानें सांच्यांत ओतलेल्या धातुरसाप्रमाणें थिजून स्थिर राहावें असा ह्या धर्मशास्त्रांत यत्न केला आहे. हें स्थिरत्व विशेषेंकरून उपाध्येपण व जात यांसंबंधी आहे. अशा प्रकारचे कायदे कागदावर लिहून ठेवायास चांगलें दिसलें असेल, परंतु त्यापासून व्यवहारांत लोकांची मोठी हानि झाली."

"अशा स्थितीस हिंदुलोक एकाच कालीं ह्मणजे जेव्हां

स्मृतीची रचना झाली तेव्हां येऊन पोंचले असें समजूं नये. सूत्रें ह्मणून जीं वेदांगें आहेत त्यांत ह्या उलटापालटीची छाया मारते. सूत्रांच्या काळापासून अशा स्थित्यंतरास आरंभ झाला होता. मनूच्या ग्रंथांत तर असें लिहिलें आहे कीं, सृष्टीच्या पूर्वींच "ब्रह्मदेवानें हें शास्त्र करून मनूला शिकविलें." [ मनु हा ब्रह्मदेवाचा पुत्र होता, व त्याच्या वंशामध्यें दुसरे सहा मनु झाले. ] ह्मणजे सृष्टीच्या आरंभापासून मनुसंहितेंत वर्णिल्याप्रमाणें या जगाची, निदान हिंदुस्थानांतील लोकांची स्थिति होती; परंतु हें ह्मणणें वैदिक ग्रंथांतील इतिहासाविरुद्ध आहे; इतकेंच नाहीं, तर जगांतील इतर राष्ट्रांस ज्या कारणांनीं कायदे करण्याची आवश्यकता दिसून येते व ज्या क्रमानें ते रचले जातात त्यांसही तें विरुद्ध आहे.

"मनुधर्मशास्त्रांत सांगितलेल्या देवता धड वैदिक ना धड पौराणिक अशा आहेत. अग्नि, वायु, इंद्र इ० पंचभूतात्मक देवांचें महत्त्व मनूनें वर्णिलें नाहीं, अथवा पुराणांतील जे तेहतीस कोटि देव त्यांचीही पूजा करायास सांगितली नाहीं. तर नारायण किंवा ब्रह्मा यांचीं नांवें त्यांत दृष्टीस पडतात. विष्णूचें नांव वेदांतील हलक्या पदवीच्या नात्यानें अथवा पुराणांतील उंच पदाच्या संबंधानें ह्या स्मृतींत आढळत नाहीं. तसेंच शिव व त्याच्या अलीकडील पुराणिकांचे आवडते राम, कृष्ण यांचीं नांवें त्यांत मिळत नाहींत. याप्रमाणें ब्राह्मणधर्माचें रूप मनूच्या काळांत होतें."

## प्रकरण २.

### मनुस्मृति.

[ ह्या प्रकरणांतील विषय रा० जनार्दन महादेव गुर्जर यांच्या मनुस्मृतीच्या महाराष्ट्र भाषांतरावरून व हौटन्‌कृत इंग्लिश भाषांतरावरून घेतला आहे. प्रो० बुलरकृत भा० ही ह्या आवृत्तीसाठीं पाहिलें आहे. विस्तारभयास्तव मूळ घेतलें नाहीं. ]

स्मृति ह्मणजे काय.

आचार व धर्म यांसंबंधानें जे ग्रंथ आहेत त्यांस धर्मशास्त्रें ह्मणतात. त्यांस दुसरें नांव **स्मृति** असें आहे. हें नांव पडण्याचें कारण प्रयोगपारिजातसंस्कारकांड नामक ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, ज्या कित्येक वेदांच्या शाखा नष्ट झाल्या व तत्संबंधी जे वेद नष्ट झाले त्यांचें स्मरण करून ज्या ग्रंथरचना केल्या त्या स्मृति होत.

उत्सन्नशाखा याः काश्चित्तासां वेदांतराणि च । अंतर्द्धानगतानीह स्मृत्वा ताः स्मृतयः कृताः ॥

परंतु हीं धर्मशास्त्रें रचण्याचीं दुसरीं कारणें मुलखी व लष्करी आर्यसमूहाची वृद्धि, व्यवस्था व बंदोबस्त हीं होत. जसजसा देश वाढत जातो, तसतसे त्याच्या रक्षणाचे आणि बंदोबस्ताचे व व्यवहाराचे कायदे करावे लागतात; ते सर्व एकच वेळीं होत नसतात.

स्मृतींची संख्या.

स्मृति अनेक आहेत, सुमारें ५० स्मृतींचीं नांवें संस्कृत ग्रंथांत आढळतात, परंतु त्यांपैकीं सुमारें २० उपलब्ध आहेत, त्या येणेंप्रमाणें:—मनु, अत्रि, विष्णु, हारीत, याज्ञवल्क्य, उशना, अंगिरा, यम, आपस्तंब, संवर्त, कात्यायन, बृहस्पति, पराशर, व्यास,

शंख. लिखित, लक्ष, गौतम, शातातप आणि वसिष्ठ. ह्यां-शिवाय उपस्मृति आहेत.

याविषयीं कांहीं पत्ता लागत नाहीं. अ. १२. १२३ यांत त्याला ब्रह्म ( परमेश्वर ) ह्मटलें आहे. अ. २: ७ यांत तो सर्वज्ञ होता असें सांगितलें आहे. त्याला वेदांत प्रजापति ह्मटलें आहे. त्याच्या बापाचें नांव आदित्य वैवस्वत व आईचें नांव सरन्यु होतें. तो राजा होता असेंही सांगितलें आहे. त्याला विनयेंकरून राज्य प्राप्त झालें ( ७. ४२ ). त्या-विषयीं शतपथ ब्राह्मणांत जलप्रलयाच्या कथेंत विस्तारानें सांगितलें आहे ( वैदिक धर्म, प्र. ९. पाहा ). ह्याप्रमाणें मनूच्या अस्तित्वाविषयीं निश्चयानें सांगवत नाहीं, तर त्याच्या काळाविषयीं सांगणें असाध्य आहे.

मनु कोण व केव्हां होता ?

मनुस्मृति.

सर्व स्मृतिकारांमध्यें मनु हा प्रथम असून प्रमुख आहे. प्रयोगपारिजातक ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं,

यत्पूर्वं मनुना प्रोक्तं धर्मशास्त्रमनुत्तमं । न हि तत्समतिक्रम्य वचनं हितमात्मनः ॥ वेदार्थोपनिबद्धत्वात्प्राधान्यं तु मनुस्मृतेः । मन्वर्थ-विपरीता तु या स्मृतिः सा विनश्यति ॥

अर्थ.--मनूनें जें पूर्वीं अत्युत्तम धर्मशास्त्र सांगितलें आहे त्याचें उल्लंघन करणारें जें वचन तें आपणास हितकारक नाहीं. वेदार्थापासून ती रचली आहे यास्तव सर्व स्मृतींमध्यें मनुस्मृति प्रधान आहे. मनुस्मृतीस विरुद्ध जी स्मृति ती नाश पावते.

मनुसंहितेच्या पूर्वीं धर्मविधि जाणण्याचीं अनेक साधनें

होतीं असें मनुस्मृतीवरूनच समजतें. त्यांपैकीं वेद हें एक, त्याला श्रुति ह्मटलें आहे ( अ. २: १० ); दुसरें धर्मसूत्रें, हीं लहान लहान गद्यात्मक वचनें होतीं; तिसरें धर्मविद्या नामक ग्रंथ होते. असें असूनही मनु ह्मणतो कीं, 'त्याचें शास्त्र ( मनुस्मृति ) ब्रह्मदेवानें सृष्टीच्या पूर्वी प्रथमतः यथाविधि मलाच शिकविलें.'

सांप्रत जी मनुस्मृति उपलब्ध आहे तिच्यांत पूर्वीपासून पुष्कळ फेरफार होत आला आहे. जुनीं वचनें गाळून नवीन घातलीं आहेत. प्राचीन मनुस्मृतींत १ लक्ष श्लोक होते असें ह्मणतात. त्यांच्या मागून ४ हजार राहिले, व हल्लींच्या ग्रंथांत केवळ २,६८४ आहेत. याशिवाय वृद्धमनु व बृहन्मनु असेही दोन भेद आहेत.

### मनुसंहितेंतील मुख्य विषय.

**१ आचार.**—यांत वेद आणि स्मृति यांनीं सांगितलेले वर्तनाचे नियम आहेत, त्यांत जातीचे नियम हे मुख्य आहेत.

**२ व्यवहार.**—यांत राज्यव्यवस्था, सैन्याची व्यवस्था, परराज्याशीं संबंध ठेवणें, दिवाणी व फौजदारी खटले चालविणें, इ० व्यावहारिक विषय आहेत.

**३ प्रायश्चित्त.**—यांत सर्व प्रकारच्या पातकांचीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत.

**४ कर्मफल.**—इहजन्मीं केलेल्या शुभाशुभकर्मांचें फल जन्मांतरीं किंवा अनेक जन्मीं कसें भोगावें लागतें याचें ह्यांत विवरण आहे.

---

## प्रकरण ३.

## मनुसंहितेंतील उतारे.

### सृष्ट्युत्पत्ति.

"पूर्वीं हें जगत् प्रकृतीचे ठायीं लीन झालेलें अत अप्रज्ञात ( इंद्रियाला अविषय ), अलक्षण ( अनुमान क ण्यास अशक्य ), अप्रतर्क्य ( तर्क करण्यास अशक्य अविज्ञेय ( शब्देंकरूनहि जाणण्यास अविषय ) अ सर्वकाळ निद्रेंत निमग्न झाल्यासारखें ( स्वकार्याविषयीं अ मर्थ ) असें होतें.

"प्रलयानंतर स्वयंभू भगवान् परमात्मा आपण अव्य ( बाह्येंद्रियांस अविषय ) होत्साता आकाशादि ( आका पृथ्वी, जल, तेज, वायु ) महाभूतें आणि महदादि पंचत हीं प्रकाशमान करून सृष्टि उत्पन्न करण्याविषयीं अकुंठि सामर्थ्यवान् व सृष्टीविषयीं प्रकृतीस प्रेरणा करीत होत्सा आपण प्रकट झाला.

"सकल वेदादिकांत प्रतिपादन केलेला, अतींद्रियग्रा ( मनानें ग्रहण करण्यास योग्य ), सूक्ष्म ( बाह्येंद्रियांस अवि षय ), अवयवरहित, सनातन ( नित्य ), सर्वभूतात्मा अत एव अचिंत्य ( परिच्छेदरहित ) असा जो परमात्मा तो आपण महदादिकार्यरूपेंकरून प्रकट झाला.

"नंतर त्या परमात्म्याला अशी इच्छा उत्पन्न झाली कीं आपल्या शरीरापासून अनेक प्रकारची प्रजा उत्पन्न करावी यावरून 'प्रथम उदक उत्पन्न होऊं' असा मनांत संकल्प करतांच प्रथम उदक उत्पन्न केलें, आणि त्या उदकाचे ठायीं परमात्मा शक्तिरूप बीजाचें रोपण करिता झाला.

" नंतर तें बीज परमेश्वराच्या इच्छेनें सुवर्णासारखें शुद्ध आणि सहस्त्र किरण धारण करणाऱ्या सूर्यासारखी ज्याची कांति असें अंड झालें, त्या अंडाचे ठायीं सर्व लोकांचा पितामह ( जनक ) ब्रह्मा स्वतां उत्पन्न झाला.

" **आप** ह्मणजे उदकें **नर** ह्मणजे परमात्मा यापासून उत्पन्न झालीं; अतएव त्यांस **नारा** अशी संज्ञा आहे, व त्या **नारा** ( उदकें ), नराचे पूर्वीं **अयन** ( स्थान ) असल्या-कारणानें परमात्म्याला **नारायण** असें ह्मटलें आहे.

" अव्यक्त ( बाह्येंद्रियांस अविषय ), नित्य ( उत्पत्ति-विनाशरहित ), आणि सदसत्स्वरूप असें जें जगताचें कारण त्या कारणानें उत्पन्न केलेला जो पुरुष त्याला लोकांत **ब्रह्मा** असें ह्मणतात.

" भगवान् ब्रह्मा, ब्रह्ममानानें त्या पूर्वोक्त अंडाचे ठायीं एक वर्षपर्यंत राहिला, नंतर 'आपोआप अंड द्विधा होऊं' असें आपण ध्यान केलें, तेणेंकरून त्या अंडाचीं दोन शकलें करिता झाला.

" नंतर ब्रह्मदेवानें, तीं जीं दोन शकलें त्यांतून वरच्या शकलापासून स्वर्गलोक, आणि खालच्या शकलापासून पृथ्वी, आणि त्या दोहोंच्या मध्यें आकाश, आठ दिशा व समुद्ररूपी असें उदकाचें स्थिर स्थान इतकीं उत्पन्न केलीं.

" नंतर ब्रह्मादेवानें परमात्म्यापासून संकल्पविकल्परूप मन उत्पन्न केलें, आणि मी सर्व कार्य करण्याविषयीं समर्थ आहें असा अभिमान धारण करणारा अहंकार मनाचे उत्पत्तीचे पूर्वीं उत्पन्न केला.

" अहंकाराचे पूर्वीं आत्मरूप असें महत्तत्व; सत्व, रज

आणि तम; व शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, यांतें ग्रहण करणारीं पंच ज्ञानेंद्रियें आणि पंच कर्मेंद्रियें आणि शब्द-तन्मात्रादिक हीं हळूहळू उत्पन्न केलीं.

“ परमात्म्यानें अहंकार, आकाशादि पंचतन्मात्रा ( शब्द-तन्मात्र, स्पर्शतन्मात्र, रूपतन्मात्र, रसतन्मात्र आणि गंध-तन्मात्र ) हे जे सहा अति बलिष्ठ पदार्थ यांचे सूक्ष्म अवयव परस्पर विकारांचे ठायीं मिळवून सर्व भूतें ह्मणजे मनुष्य, पशु, पक्षी, वृक्ष इत्यादिक उत्पन्न केलीं.

“ ज्या हेतूस्तव, परमेश्वराच्या मूर्तीचे संपादक जे सहा सूक्ष्म अवयव ( तन्मात्राहंकाररूप ) ते, भूतें आणि इंद्रियें यांचा कार्यत्वानें आश्रय करितात, यास्तव ब्रह्माची जी मूर्ति ( स्वभाव ) तिला विद्वान् लोक **शरीर** असें ह्मणतात. शरी-रोत्पत्तिकालीं शब्दादि पंचतन्मात्रारूपानें राहिलेल्या ब्रह्माचे ठायीं, पूर्वोक्त आकाशादि महाभूतें आपापल्या कर्मासहवर्त्त-मान प्रवेश करितात. आकाशादि महाभूतांचीं कर्में—आका-शाचें कर्म अवकाश देणें, वायूचें कर्म व्यूहन ( विन्यास—स्थापन ), तेजाचें कर्म पाक करणें, जलाचें कर्म पिंडीभूत ( गोळा करणें ), पृथ्वीचें कर्म धारण करणें, आणि सर्व उत्पत्तीस निमित्त, अविनाशी असें जें मन तें स्वकीय जे सूक्ष्म ( बहिरिंद्रियांस अगोचर ) अवयव ( शुभाशुभ संकल्प सुखदुःखादिरूप ) त्यांसहवर्त्तमान प्रवेश करितें. ( मनु. १. ९–१९. )

### (२) गायत्रीजपमाहात्म्य.

“ वेद जाणणारा ब्राह्मण उभय संध्याकालीं ओंकार व तीन व्याहृति एतत्पूर्वक त्रिपाद गायत्रीचा जप करील तर

त्याला तीन वेदांच्या अध्ययनाचें पुण्य प्राप्त होतें, या हेतूस्तव उभय संध्याकालीं प्रणवव्याहृतित्रययुक्त गायत्रीचा जप करावा असा विधि प्राप्त होतो.

"जो द्विज संध्याकाळावांचून अन्यकालीं, ग्रामाच्या बाहेर नदीतटाक, अरण्य इत्यादि स्थानीं जाऊन ओंकार, तीन व्याहृति एतत्सहित गायत्रीचा प्रत्यहीं सहस्र जप करील तो महापातकापासूनहि एका महिन्यानें मुक्त होतो. जसा सर्प आपली त्वचा टाकून मुक्त होतो तद्वत्. तस्मात् पापक्षयास्तव गायत्रीचा जप करावा.

" ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांतून जो कोणी गायत्रीचा जप टाकील, तसेंच सायंप्रातःकालीं होम देणें इत्यादि स्वकर्म करणार नाहीं, तो साधूंचे ठायीं निंदेस पात्र होतो. तस्मात् स्वकालीं गायत्रीजप आणि स्वकर्म यांचा त्याग कदापि करूं नये.

"ओंकारपूर्वक, अक्षरब्रह्मप्राप्तिफलक यास्तव अव्यय अशा तीन महाव्याहृति ( ओंभूर्भुवःस्वः ), आदि त्रिपदा गायत्री ह्या ब्रह्माचें (वेदाचें ) मुख होत; यास्तव प्रथम त्या ह्मणून नंतर वेदाध्ययनाला आरंभ करावा. अथवा ब्रह्म ह्मणजे परमात्मा याच्या प्राप्तीचें हें द्वार होय; कारण, यांचें अध्ययन, जप इत्यादिकानें जो निष्पाप झाला त्याला ब्रह्मज्ञानाच्या उत्कर्षानें मोक्षप्राप्ति होते.

"जो पुरुष निरालस्यपणानें दररोज ओंकार, व्याहृति यांहीं युक्त गायत्रीचें अध्ययन तीन वर्षें करील तो परब्रह्माप्रत पावेल, आणि तो वायुभूत ह्मणजे वायूसारिखा पाहिजे

तेथें संचार करणारा होतो, व शरीराचा नाश झाल्यानंतर खमूर्तिमान् ह्मणजे ब्रह्ममूर्तिच होतो.

"ओंकार हा साक्षात् परब्रह्म आहे; कारण, ओंकाराच्या जपेंकरून त्याचा अर्थ जें परब्रह्म त्याची भावना प्राप्त होते व तद्वारा ब्रह्मप्राप्ति होते. प्रणव, व्याहृति, आणि शिर यांहीं युक्त गायत्रीचा एक वेळ जप करावा तो प्राणायाम, असे तीन प्राणायाम प्रत्यहीं अवश्य करावे, व तेंच उत्तम तप. गायत्रीहून दुसरा श्रेष्ठ मंत्र नाहीं, आणि मौनाहूनहि सत्य भाषण हें श्रेष्ठ आहे. ह्या ओंकारादि चौघांची स्तुति केली यास्तव या चौघांची उपासना करावी असा विधि कल्पित होतो." ( मनु २. ७८–८३. )

## (३) संस्कार.

"वेदांत सांगितलेल्या शुभकर्मेंकरून ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांचा गर्भाधानादिक शरीरसंस्कार करावा. गार्भहोम ( गर्भशुद्धीकरितां करायाचे होम ), जातकर्म, चूडाकर्म, आणि उपनयन हे संस्कार केल्यानें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांचें बीजसंबंधी, व गर्भसंबंधी पातक दूर होतें. नालच्छेदनाचे पूर्वीं पुत्राचा जातकर्मनामक संस्कार करावा, आणि त्या समयीं मंत्रांनीं सुवर्ण, मध व घृत हीं ( मिश्र करून ) त्याला प्राशन करवावीं. जन्मदिवसापासून दहाव्या अथवा बाराव्या दिवशीं नामकरणसंस्कार करावा. ब्राह्मणाचें मंगलवाचक, क्षत्रियाचें बलवाचक, वैश्याचें धनवाचक आणि शूद्राचें निंदावाचक याप्रमाणें नांवें ठेवावीं. चतुर्थमासाचे ठायीं बालकाचा निष्क्रमणसंस्कार ( घरांतून बाहेर सूर्यदर्शन करण्याकरितां नेणें तो )

करावा. सहाव्या मासीं अन्नप्राशनसंस्कार करावा. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या सर्वांचा चूडाकरणसंस्कार ( शेंडी राखण्याचा ) धर्मासाठीं प्रथम वर्षीं अथवा तृतीय वर्षीं करावा. गर्भापासून आठव्या वर्षीं ब्राह्मणाचें, अकराव्या वर्षीं क्षत्रियाचें, बाराव्या वर्षीं वैश्याचें उपनयन ( मुंज ) करावें." ( मनु. २. २६–३६. )

### ( ४ ) ब्राह्मणाचें श्रेष्ठत्व.

" ब्रह्मदेवानें आपल्या मुखापासून प्रथमतः ब्राह्मण उत्पन्न केला. तो अशासाठीं कीं, त्यानें देवकर्मे व पित्र्यकर्मे करून देवपितरांचा संतोष करावा, आणि तपश्चर्या करून ह्या सर्व जगताचें संरक्षण करावें. ज्या ब्राह्मणाच्या मुखेंकरून सर्वकाळ देवता हव्यें भक्षण करितात, आणि पितर कव्यें भक्षण करितात असा जो ब्राह्मण ह्याहून अधिक श्रेष्ठ प्राणी कोण आहे ? ब्राह्मणाचें केवळ जन्म हीच कोणी एक धर्माची अखंड मूर्ति आहे. कारण ब्राह्मण धर्मासाठीं झाला आहे, ब्राह्मण जन्म पावतो त्या दिवसापासूनच तो पृथ्वीवर श्रेष्ठ होतो; आणि सर्व प्राण्यांच्या धर्मरूपी भांडाराचें रक्षण करण्यासाठीं प्रभु तोच आहे. जें कांहीं पृथ्वीवरील धन, तें सर्व ब्राह्मणाचेंच स्वतांचें होय. कां कीं, हा ब्रह्मदेवाच्या मुखापासून प्रथम उत्पन्न झाला व सर्वांहून श्रेष्ठ असल्यामुळें सर्व धनाचा स्वामी होण्यास ब्राह्मणच योग्य आहे. ब्राह्मण जें दुसऱ्याचें अन्न भक्षण करितो, दुसऱ्याचें वस्त्र परिधान करितो, आणि दुसऱ्याचें घेऊन इतरांला देतो तें सर्व ब्राह्मणाचें धन." ( मनु. १. ९४–१०१. )

## (५) स्त्रीपुरुषधर्म.

" स्त्रियांचें जातकादि संस्कार मंत्रांनीं करूं नयेत, अशी शास्त्रमर्यादा व्यवस्थित आहे. धर्मप्रमाण, मंत्र यांहींकरून स्त्रिया विरहित असून अनृताप्रमाणें अशुभ होत अशी शास्त्रमर्यादा आहे, तस्मात् यत्नेंकरून रक्षण करावें."—गृहाचे ठायीं स्त्रिया पुरुषांला मोठ्या उपकारक, प्रजोत्पादनविषयीं भाग्यवती, वस्त्रालंकारादि दानेंकरून पूजेला योग्य, व गृहाची शोभा करणाऱ्या स्त्रिया व लक्ष्मी आहेत, या उभयतांमध्यें कोणाचेंही आधिक्य नाहीं, दोनही समान आहेत.—" ह्या स्त्रीपासून जें अपत्य होईल तें तुझें व माझें असें उभयतांचें असो, याप्रमाणें मनांत फलेच्छा धरून जें अपत्य उत्पन्न केलें त्याचे विभागी क्षेत्री, व बीजी असे दोघे होतात.—" संतति नसेल तर विधवा स्त्रीनें श्वशुर इत्यादिकांची आज्ञा घेऊन दिरापासून अथवा सपिंडापासून ईप्सित प्रजा उत्पन्न करावी." ( मनु. अ० ९. १८,२६,५३,५९. )

## (६) कन्यादान.

बुद्धिमान् मनुष्यानें एकाला कन्या वाणीनें देऊन तीच कन्या पुनः दुसऱ्याला देऊं नये, कदाचित् देईल तर तो सहस्र पुरुषांच्या वधाचा दोष पावतो.—जो मनुष्य दोषयुक्त कन्या असतां दोष सांगितल्यावांचून तिचें दान करितो त्या दुरात्म्या कन्यादात्याचें तें दान व्यर्थ करावें, ह्मणजे ती कन्या पुनः माघारी देऊन दुसरी कन्या वरावी. ऋतुमतीही कन्या मरणपर्यंत पितृगृहीं राहो, परंतु ती कन्या विद्यागुणहीन वराला कदापि देऊं नये."

( मनु. अ० ९.७१,७३,८९. )

### ( ७ ) गृहस्थाश्रमधर्म.

देव, पितर इ० स अन्नार्पण; अतिथिपूजन.

"ऋषि, पितर, देव, भूतें आणि अतिथि हे सर्व, गृहस्थाश्रमी यांपासूंन आपणाला अन्न, उदक मिळावें असें इच्छितात, यास्तव शास्त्रज्ञ गृहस्थ पुरुषानें त्या ऋष्यादिकांला संतुष्ट करावें. प्रतिदिवशीं जसा संभव असेल तदनुरूप अन्न, तिल, व्रीहि, यव, अथवा उदक किंवा दूध, मुळें, फलें यांहींकरून पितरांचा संतोष करीत होत्साता श्राद्ध करावें. गृहाच्या उपरिभागीं जें गृह त्याचे ठायीं अथवा दात्याचे पृष्ठभागस्थ भूप्रदेशीं 'सर्वात्मभूतये नमः" असें ह्मणून आहुति द्यावी. पूर्वोक्त आहुति देऊन अवशिष्ट राहिलेलें सर्व अन्न घेऊन दक्षिण दिशेचे ठायीं दक्षिणामुख होऊन प्राचीनाविति करून 'स्वधापितृभ्यः' असें ह्मणून आहुति द्यावी. दुसरें अन्न पात्रांत घेऊन तें कुत्रे, पतित, श्वपच, पापरोगी ( कुष्टी ), कावळे, आणि कृमि यांना भूमीवर ( केरकचरा त्या अन्नाला न लागेल अशा युक्तीनें ) द्यावें. याप्रमाणें जो ब्राह्मण सर्वभूतांची अन्नदानादिकानें नित्य पूजा करितो तो ब्रह्मरूप, स्वयंप्रकाश जें उत्तमस्थान त्याप्रत सरळ अशा अर्चिरादिमार्गेंकरून जातो, ह्मणजे ब्रह्माचे ठायीं लय पावतो. कदाचित् पुष्कळ अन्न नसेल तर तत्वेंकरून वेद व वेदार्थ जाणणाऱ्या ब्राह्मणाला ग्रासप्रमाण अन्नहि व्यंजनादिकांसह ( कोशिंबिरी, कढी इत्यादिकांसह ) सत्कारपूर्वक यथाविधि द्यावें. ग्रासप्रमाण अन्नही नसल्यास उदकानें भरलेलें पात्र फलपुष्पादिकांनीं सत्कार करून यथाविधि द्यावें. जे ब्राह्मण वेदाध्ययन, वेदार्थ व वेदानुष्ठांनतेज यांहींकरून हीन ते भस्मासारखे

निस्तेज होत, यास्तव दात्यांनीं अज्ञानेंकरून त्या ब्राह्मणांला देव पितरांच्या उद्देशानें दिलेलीं अशीं हव्यकव्य अन्नें निष्फळ होतात. जे गृहस्थाश्रमी आतिथ्याच्या ( अतिथिसत्काराच्या ) लोभेंकरून अन्यग्रामीं जाऊन परान्नसेवन करितात ते निषिद्ध परान्नदोषातें अनभिज्ञ होत्साते त्या परान्न भोजनेंकरून जन्मांतरीं त्या अन्नदात्यांचे गृहीं पशु होऊन राहतात. जे जे उत्तम पदार्थ असतील ते ते अतिथीला समर्पण करून आपण भक्षण करावे, जे अतिथींला समर्पण केले नाहींत ते भक्षण करूं नयेत. अतिथीचें पूजन धन, यश, आयुष्य, आणि स्वर्ग यांतें देणारें होतें. अतिथिधर्मशाली असे वैश्य, शूद्र हेहि परगांवाहून ब्राह्मणाचे घरीं येतील तर क्षत्रियाचे भोजनानंतर यजमान व यजमानपत्नी यांचे भोजनाच्या पूर्वीं सेवकाबरोबर सत्कारपूर्वक, दयापुरःसर त्यांलाही भोजन घालावें. सुवासिनी, सुना, कन्या, कुमारी, गर्भिणी या स्त्रियांला अतिथीला भोजन घालण्याच्या पूर्वींच भोजन घालावें, अतिथि उपोषित असतां यांला भोजन कसें द्यावें असा विचार करूं नये. अतिथीपासून सेवकापर्यंत जितके भोजन देण्याला योग्य सांगितले त्यांला भोजन दिल्यावांचून व्यतिक्रमभोजनदोष न जाणत होत्साता जो भोजन करितो तो मृत झाल्यानंतर कुत्रे, गृध्र हे आपणाला भक्षण करितात हें तो जाणत नाहीं. ब्राह्मण ( अतिथि ), ज्ञाति, भृत्य ( दासादिक ) हे सर्व भोजन केल्यानंतर अवशेष राहिलेल्या अन्नाचें दंपती ( यजमान व तत्पत्नी ) यांनीं भोजन करावें. जो मनुष्य आपणाकरितांच स्वयंपाक करून भोजन करितो, देवादिकांला देत नाहीं, तो पापच केवळ

भक्षण करितो, अन्न नाहीं; कारण, पाकयज्ञ ( वैश्वदेवादि यज्ञ ) करून त्यांचें अवशिष्ट राहिलेलें अन्न भक्षण करावें तें साधूंचें अन्न असें ह्मटलें आहे. (मनु. ३. ८०,८२,९१-९३,९६,९७,१०४,१०६,११२,११४–११६,११८).

(८) राजधर्म. मनु. अ. ८.

" जो राजा प्रजांचें रक्षण करितो त्याला प्रजांच्या पुण्याचा सहावा भाग प्राप्त होतो, आणि जो प्रजारक्षण करीत नाहीं त्याला प्रजांच्या अधर्माचा सहावा अंश प्राप्त होतो."–"जो राजा प्रजेचें रक्षण न करितां प्रजांपासून नजराणा, कर, शुल्क ( व्यापारसंबंधीं ड्यूटी ), प्रतिभाग ( फल, पुष्प, शाका इ० चा प्रतिदिवशींचा कर ), आणि दंड घेतो तो मृत झाल्यानंतर तत्काल नरकाप्रत जाईल." ( ३०४, ३०७. )

(९) राजदंड.

" ब्राह्मणाच्या गाई चोरणें, वाहण्याकरितां वांझ गाईचें नाक टोंचणें, बकरा, मेंढा इ० यज्ञपशु चोरणें या अपराधीं अर्धा पाय तोडावा."–गुरु, बाल, वृद्ध, बहुत पढलेला ब्राह्मण हे सर्व आततायी ( आग लावणारा, विष देणारा, धन हरण करणारा, क्षेत्र व स्त्री यांतें हरण करणारा ), होत्साते येतील तर विचार न करितां शीघ्र मारावें.–"ब्राह्मणाचें मुंडन करावें, हाच त्याला प्राणांतिक दंड, साक्षात् वधदंड ब्राह्मणास नाहीं. इतर वर्णांस साक्षात्प्राणांतिक दंड आहे."–"पृथ्वीचे ठायीं ब्राह्मणवधाहून मोठा अधर्म दुसरा नाहीं, या कारणास्तव राजानें ब्राह्मणाचा वध मनेंकरूनहि चिंतन करूं नये." ( ३२९, ३५०, ३७९, ३८१. )

"चारचक्षु ( ह्मणजे दूतरूप नेत्रांनीं पाहणाऱ्या ) राजानें परद्रव्याचा अपहार करणारे प्रकाश ( प्रसिद्ध ) अप्रकाश ( अप्रसिद्ध ) असे जे दोन प्रकारचे चोर त्यांची निरंतर चौकशी करावी." (९. २५६). "लांच खाणारे, भयप्रदर्शन करून लोकांपासून द्रव्य घेणारे; सुवर्णादिवस्तूंमध्यें खोटी वस्तु टाकून लोकांला ठकवून परद्रव्याचा अपहार करणारे, जुगार, पैजा खेळणारा; धनपुत्रादिकांचा लाभ होईल इत्यादिक मंगल समाचार सांगून उपजीविका करणारे; आपल्या पातकाचें गोपन करून उत्तम आचार लोकांस प्रसिद्ध करून परधनाचा अपहार करणारे, हातावरच्या रेघा इत्यादिक पाहून त्यांचीं शुभाशुभ फलें पाहून दुसऱ्यापासून द्रव्य उपटणारे." ( २५८ ). "हत्तींला नाना प्रकारच्या गति शिकवून, त्याजवर उपजीविका करणारे; चिकित्सा ( वैद्यकी ) करून उपजीविका करणारे; शिल्पविद्या व चित्रलेखनविद्या यांच्यावर उपजीविका करणारे; आणि वेश्या स्त्रिया हे सर्व परधन हरण करण्याविषयीं निपुण होत असें जाणावें." ( २५९ ). इत्यादिक हे प्रसिद्ध लोकांला वंचना करणारे ( ठकविणारे ) होत. यास्तव यांची दूतद्वारा चौकशी ठेवावी, आणि इतर जे गुप्तपणानें ब्राह्मणादिकांचा वेष धारण करून धन हरण करणारे शूद्र त्यांचीही चौकशी ठेवावी. ( २६१ ). [आमचे हिंदु सर्कसवाले, हिंदु दाक्तर, औद्योगशाळेंत शिकलेले, आर्ट्स स्कुलांतील विद्यार्थी हे यास काय ह्मणतील?] आपापल्या कर्मांमध्यें

---

१ यांविषयीं इंग्लंडांत जसा कायदा आहे तसा ह्या देशांत सरकारानें कां करूं नये ? अशा कायद्यास आड येण्यास लोकांस मार्ग नाहीं.

तत्वपूर्वक त्यांचे दोष लोकांत प्रसिद्ध करून चांगल्या प्रकारें करून राजानें अपराधानुरूप त्यांस दंड करावा." (२६२).

(१०) **प्रायश्चित्तविधि**–मनु. अ० ११.

"सर्प जसा आपल्या त्वचेपासून मुक्त होतो, तसा मनुष्य आपलें पाप जसजसें कबूल करील, तसतसा तो पापमुक्त होतो. (२२८). पाप करून पापी पश्चात्ताप करील तर तो त्या पापापासून मुक्त होतो, पुनः पाप करणार नाहीं असें ह्मणण्यानें तो दोषमुक्त होत नाहीं, तर पश्चात्तापी होऊन पाप करण्याचें सोडल्यानें तो मुक्त होतो. (२३०.) कर्मांचें फल परलोकीं प्राप्त होणार आहे असें चिंतन करून मन, वाणी, देह यांहींकरून नित्य शुभकर्म आचरण करावें. (२३१.) पाप करणारा मनुष्य आपल्या पापाचें कथन (अंगीकार), तपश्चर्या, वेदाध्ययन यांहीं अनुताप करून स्वकीय पापापासून मुक्त होतो. तो जर हीं धर्मकृत्यें करायास समर्थ नसला तर दानेंकरून मुक्त होतो. (२२७.) महापातकी आदिकरून सर्व तपानें मुक्त होतात. (२३९.) कीट, सर्प, पतंग, पशु, पक्षी, वृक्षादिक हीं सर्व भूतें तपोमहात्म्येंकरून स्वर्गाप्रत जातात. (२४०.) जो ब्रह्महत्यादि महापातकी असेल त्यानें इंद्रियें जिंकून भिक्षान्न भक्षण करून एक वर्षपर्यंत गाईच्या मागून भ्रमण करावें, व पावमानी ऋचांचा प्रतिदिवशीं जप करावा, तेणेंकरून तो त्या पातकांपासून मुक्त होतो. (२९७.) अज्ञानेंकरून सुरा प्राशन करील तर तप्तकृच्छ्रपूर्वक पुनःसंस्कारेंकरून शुद्ध होतो. जाणून प्राशन करील तर मरणांत प्रायश्चित्त करून शुद्ध होतो. (१४६.) ब्राह्मण, क्षत्रिय आणि

वैश्य हे सुरा प्राशन करितील तर त्यांनीं अग्नींत तापवून लाल केलेली सुरा प्राशन करावी, तेणेंकरून शरीर नष्ट झाल्यानें त्या पापासून शुद्ध होतो.” ( ९०.)

(११) कर्मफल-मनु. अ० १२.

“मणि, मोत्यें, पोंवळीं आणि इतर नानाविध रत्नें यांची लोभानें चोरी करणारा मनुष्य सोनाराच्या योनीप्रत जातो. ( ६१. ) धान्य, कांस्य, जल, मध, दूध, रस, घृत यांची चोरी करणारा क्रमेंकरून उंदीर, हंस, प्लवनामक पक्षी, दंश ( वनमक्षिका ), कावळा, कुत्रा, मुंगूस यांच्या योनीप्रत जातो.” ( ६२. )

(१२) व्यवहार-मनु. अ० ८.

“शूद्र द्विजातींला ( ब्रा० क्ष० वै० ) शिवीगाळ करील तर तो जिव्हाछेदास पात्र होईल; कारण, तो निकृष्ट अंग जे पाय त्यांपासून झालेला आहे. ( २७० ) शूद्र द्विजातींला ‘हे यज्ञदत्ता, तूं सर्व ब्राह्मणांत नीच आहेस’ असें उच्च स्वरानें नामजाति ग्रहण करून वैरभावानें बोलेल तर त्याचे मुखांत दहा अंगुळपरिमित असा लोखंडाचा तप्त शंकु घालावा.” ( २७१. )

“आई, बाप, भार्या, भाऊ, सासरा, गुरु ह्यांवर तोंड टाकणारास आणि मार्गांत जात असतां गुरूला मार्ग देत नाहीं त्यास १०० पण दंड करावा. ( २७५. ) शूद्र अहंकारानें ब्राह्मणाचे केश, पाय, दाढी, मान, वृषण धरील तर त्याचे हात तोडावे, त्याविषयीं विचार करूं नये. ( २८३. ) राज-दैविक उपद्रवानें गुरें मेलीं असतां गुराख्यानें कातडें, पुच्छ,

वसा, स्नायु रोचन असे त्यांचे अवयव आणून गुरांच्या धन्याला द्यावे. (२३४.) शेळ्या, मेंढ्या यांला लांडग्यांनीं सभोंवार घेरलें असतां गुराखी धांवून त्या लांडग्यांचें निवारण करणार नाहीं, आणि ते शेळ्यामेंढ्यांला मारतील तर तो गुराख्यांचा अपराध जाणावा. (२३५.) भार्या, पुत्र, दास, शिष्य, सोदर, भ्राता यांपासून अपराध होईल तर दोरी अथवा बांबूची बारीक काठी यांहींकरून त्यांला ताडन करावें." (२९९.)

### (१२) दायविभाग. मनु. अ. ९.

"पिता आणि माता मृत झाल्यानंतर भावांनीं एकत्र मिळून त्यांचें धन समान वांटून घ्यावें. आईबाप जीवंत असतां पितृधनाचा विभाग करण्यास पुत्राला अधिकार नाहीं.—जर कदाचित् ज्येष्ठ पुत्र धार्मिक असेल तर त्यानेंच बापाची सर्व जिंदगी घ्यावी आणि इतर भावांनीं बापाच्या आज्ञेंत राहिल्याप्रमाणें ज्येष्ठ भ्रात्याच्या आज्ञेंत राहून उपजीवन करावें.—एका पुरुषाला दोन स्त्रिया आहेत आणि कनिष्ठ स्त्रीचे ठायीं प्रथम पुत्र झाला, नंतर ज्येष्ठ स्त्रियेला पुत्र झाला, तर प्रथम विवाहित जी स्त्री तिचे ठायीं नंतर जो झालेला पुत्र त्यानें एक श्रेष्ठ वृषभ उद्धार घ्यावा, आणि इतर भ्राते यांनीं त्या श्रेष्ठ वृषभाखेरीज कनिष्ठ वृषभ उद्धार घ्यावे. मातेच्या विवाहक्रमानें ज्येष्ठत्व जाणावें.—ज्येष्ठ स्त्रीला प्रथम पुत्र झाला असेल तर त्यानें पंधरा गाई व एक बैल याप्रमाणें घ्यावें. त्यानंतर इतर जे बहुत स्त्रियांपासून झालेले पुत्र असतील त्यांनीं आपल्या मातेच्या विवाहक्रमा-

प्रमाणें ज्येष्ठत्व पाहून इतर गाईंचा विभाग करावा." (१०४, १०५, १२२–१२४.)

---

## प्रकरण ४.

### याज्ञवल्क्यस्मृतींतील उतारे.

( रा० जनार्दन महादेव गुर्जर यांच्या पुस्तकांतून. )

(१) दिव्य. व्यवहाराध्याय, प्र० ७.

"तुला, अग्नि, जल, विष, कोष, हीं पांच द्रव्यें शुद्धीसाठीं ह्मणजे संदिग्ध व्यवहारांतला संदेह दूर होण्यासाठीं करवावीं. तंडुल वगैरे दुसरींही द्रव्यें ग्रंथांतरीं आहेत.

"ज्या व्यवहाराचा निर्णय मानुषप्रमाणेंकरून होत नाहीं त्या व्यवहाराचा निर्णय करणारें जें प्रमाण तें दिव्य होय. (नारद.) सत्याचे आधारावर धर्म राहतोः आणि न्याय करण्याचें काम तर साक्षीच्या आधारावर आहे, परंतु दिव्यप्रमाणेंकरून जो व्यवहार शाबीत होणारा त्याविषयीं साक्षीचा अथवा लेखाचा पुरावा घेऊं नये. ( नारद. )

दिव्य करण्याचे नियम.

"पूर्वदिवशीं उपोषित आणि दुसऱ्या दिवशीं सूर्योदयकालीं सचैल स्नान केलेला असा दिव्यकर्त्ता याला बोलावून राजा, सभासद आणि ब्राह्मण यांच्या सन्निध सर्व दिव्यें न्यायाधिशानें करवावीं.

"उपास करण्याचा नियम न्यायाधिशानेंही अवश्य पाळला पाहिजे. ( पितामह. )

शीतकाळीं उदकदिव्य करूं नये, उष्णकाळीं अग्निदिव्य करूं नये, आणि वर्षाकालीं विषदिव्य करूं नये. ज्या कालीं वारा बहुत वाहत असेल, त्या समयीं तुलादिव्य करवूं नये.

कोणतें दिव्य कोणीं करावें. तुलादिव्य.

स्त्री, बाल, वृद्ध, अंध, पंगु, ब्राह्मण आणि रोगी यांला तुलादिव्य, अग्नि व उदक यांचें दिव्य आणि शूद्राविषयीं विषदिव्य. तुलाधारण जाणणारे (सोनार इत्यादिक) यांनीं दिव्य करणारास तुलेंत बसवून त्याला तोलावें. नंतर त्याला खालीं उतरून पुनः तोलावें. तोलल्यानंतर जर तो वाढेल तर तो शुद्ध (निर्दोष) समजावा. जर समान किंवा कमी होईल तर अशुद्ध (दोषी) समजावा. शिकें तुटेल, तुला मोडेल किंवा आंकडे मोडतील, दोरी तुटेल तेव्हांही तशीच अशुद्धि समजावी.

धर्मादि देवतांचें आवाहन, पूजा इत्यादि करावी. तुलेचें प्रार्थनेचा मंत्रः—

त्वं धट ब्रह्मणा सृष्टः परीक्षार्थं दुरात्मनाम् ।
धकाराद्धर्ममूर्तिस्त्वं टकारात्कुटिलं नरम् ।
धृतो भावयसे यस्माद्धटस्तेनाभिदियसे ।
त्वं वेत्सि सर्वजन्तूनां पापानि सुकृतानि च ।
त्वमेव देव जानीषे न विदुर्यानि मानवाः ।
व्यवहाराभिशस्तोऽयं मानुषः शुद्धिमिच्छति ।
तदेनं संशयादस्माद्धर्मतस्त्रातुमर्हसि ॥

अर्थ.—हे घट (तुले), दुष्ट (मिथ्यावादी) लोकांच्या परीक्षेसाठीं ब्रह्मदेवानें तुला उत्पन्न केला आहे. (तुझ्या नांवांतील) धकाराकडून तूं धर्ममूर्ति आणि टकाराकडून

पुरुषांप्रत दाखवून देणारा आहेस, यास्तव धट असें तुला ह्मणतात. तूं सर्व मनुष्यांचें पापपुण्य जाणतोस. मनुष्यांला ज्या गोष्टींचें ज्ञान नाहीं, त्या सर्व तूंच जाणतोस. ह्या मनुष्यावर अपराधाचा संशय आहे, ह्याला धर्मन्यायेंकरून संशयापासून रक्षण करण्याविषयीं तूं योग्य आहेस.

अग्निदिव्य.

रुईच्चीं सात पानें हातावर ठेवून त्या पानांवर तप्त लोखंड ठेवून सात पावलें चालावें, जर तो न पोळेल, तर तो शुद्ध.

अग्नीची प्रार्थनाः—"हे अग्नी, तूं सर्व भूतांचे अंतःशरीरीं वास करितोस, हे कवे, हे पावका, तूं साक्षीप्रमाणें, पापपुण्य पाहून सत्य प्रकार जो असेल तो दाखवावा."

उदकदिव्य.

"सत्येन माभिरक्षत्वं" ह्या मंत्रेंकरून उदकाचें अभिमंत्रण करून नाभिप्रमाण उदकामध्यें पुरुषाला उभें करून त्याचे उरु ( मांड्या ) धरून दिव्यकर्त्यानें उदकांत बुडी मारावी, त्याच समयीं वेगवान् पुरुष जाऊन पोंचल्यानंतर दुसऱ्या मनुष्यानें पूर्वीं सोडलेला बाण घेऊन येऊन जर दिव्यकर्त्याचें बुडालेलें अंग पाहील तर तो शुद्ध झाला. ( ह्याचा स्पष्टार्थ टीकेंत पाहावा. )

विषदिव्य.

विषाची प्रार्थनाः—हे विष, तुला ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आहे. आणि तूं सत्यधर्माचे ठायीं राहणारा आहेस, यास्तव अभिशापा ( मिथ्या आरोपा ) पासून माझें रक्षण कर. आणि सत्येंकरून मला अमृतप्राय हो. अशा अर्थाच्या मंत्रेंकरून दिव्यकर्त्या पुरुषानें विषाची प्रार्थना करून हिमालय पर्वतावर उत्पन्न झालेलें शार्ङ्ग ( शृंगोद्भव ) विष भक्षण करावें. नंतर पाहिजे

तें विष वेगावांचून त्याला पचेल तर तो शुद्ध होतो. (शरीराच्या ) एका धातूपासून दुसऱ्या धातूंत जो प्रवेश तो विषवेग. (त्वचा, रुधिर, मांस इ० सप्त धातु आहेत. )

ह्या विषदिव्याच्या प्रयोगावर अनेक स्मृतिकारांचीं मतें व टीका आहेत, त्यांत विष किती, कशांत, केव्हां द्यावें इ० प्रकार सांगितले आहेत:—

( २ ) **स्त्रीधनाविषयीं.** ( दायविभाग प्र० ८. )

**मूलार्थ.** पिता, माता, नवरा, भ्राता ह्यांनीं दिलेलें व अध्यग्नि, तसेंच आधिवेदनिक इत्यादिक स्त्रीधन सांगितलें आहे.

**टीकार्थ.**—१. पित्यानें, नवऱ्यानें आणि भ्रात्यानें दिलें असेल तें व जें अध्यग्नि ह्मणजे विवाहकालीं विवाहाग्निसमीप मातुल वगैरेंनीं दिलेलें तें; आधिवेदनिक ह्मणजे दुसरें लग्न करितेसमयीं पहिल्या बायकोला दिलेलें तें.

**मूलार्थ**—तसेंच **बंधुदत्त, शुल्क,** आणि **अन्वाधेयक** हेंही **स्त्रीधनच.**

**टीकार्थ.**—बंधुदत्त ह्मणजे कन्येचे मातृबंधु, व पितृबंधु ह्यांनीं दिलें तें. शुल्क ह्मणजे जें द्रव्य घेऊन कन्या दिली जाते तें. अन्वाधेयक ह्मणजे विवाह झाल्यानंतर जें दिलें जातें तें.

स्त्रीधनाचा विभाग:—

**मूलार्थ.**—अनपत्य स्त्री मृत झाली असतां तिचें धन **बांधवांस** मिळेल. ( बांधव ह्मणजे नवरा वगैरे. )

---

## प्रकरण ५.

## विष्णुस्मृतींतील उतारे.

### ( १ ) गृहस्थाश्रमधर्म—भोजनविधि.

ग्रहणसमयीं भोजन करूं नये. मध्यरात्रीं, मध्यान्हीं व संध्याकालीं ( तीनसांजा ) जेवूं नये. ओलीं वस्त्रें नेसून, नग्न शरीरानें, पाण्यांत, नावेंत, फुटक्या पाटावर बसून, पलंगावर ओटंगून, पालथें पडून भोजन करूं नये. फुटक्या ताटांतून, मांडीवर ठेवून, भूमीवरून, तळहातावरून अन्न भक्षण करूं नये. शिजविल्यानंतर मीठ घातलेलें जें अन्न तें खाऊं नये. आपल्या पंक्तीस बसलेल्या मुलास जेवतांना शिवी देऊं नये. मिष्ट पदार्थ एकटयानेंच खाऊं नये. पूर्वेकडे अथवा दक्षिणेकडे तोंड करून जेवावें. पात्रावरील सर्व अन्न भक्षण करूं नये. ताक, मध, तूप, मांस व मिठाई हीं मात्र सर्व भक्षण करावीं. स्त्रीसहित भोजन करूं नये. उघड्यावर, शून्य गृहांत व देवालयीं भोजन करूं नये. ओंजळीनें पाणी पिऊं नये. (अ. ६८.)

### ( २ ) निद्रेविषयीं.

ओल्या पायीं निजूं नये. उत्तरेस किंवा पश्चिमेस तोंड करून निजूं नये. ओल्या बांबूंवर, मोडक्या पलंगावर, पांच जातींच्या लांकडांच्या पलंगावर, पळसाच्या लांकडाच्या पलंगावर, हत्तीनें चिरलेल्या झाडाच्या लांकडांच्या पलंगावर, वीज पडून जळालेल्या लांकडांच्या पलंगावर, घागरीनें पाणी घालून वाढविलेल्या वृक्षाच्या लांकडांच्या पलंगावर शयन करूं नये. धान्यावर, गायीच्या गोठ्यांत,

गुरूच्या पलंगावर, चुलीपाशीं निजूं नये. दिवसा, संध्याकाळीं ( तीनसांजा ), मलमूत्राच्या जागीं ओलसर जमिनीवर, व पर्वताच्या शिखरावर निजूं नये. ( अ० ७०.)

( ३ ) स्त्रीधर्म.

स्त्रियांनीं आपल्या पतीशीं एकोप्यानें राहावें. त्यांनीं आपले सासुसासरे, गुरू, वडील व देव यांच्या पायां पडावें. घरांतील सूप, टोपल्या इ० वस्तु व्यवस्थेनें लावून ठेवाव्या. काटकसरीनें खर्च करावा. उखळ, मुसळ इ० पदार्थ जपून ठेवावे. झाडांचीं मुळें वगैरे पदार्थांनीं टाणेटोणे करूं नये. पति घरीं नसतां अंगावर अलंकार घालूं नयेत, व परक्याचे घरीं जाऊं नये. आपल्या दाराशीं किंवा खिडकींत उभें राहूं नये. कोणतेंही काम आपल्याच विचारानें करूं नये. लहानपणीं बापाच्या, तरुणपणीं नवऱ्याच्या व ह्मातारपणीं पुत्रांच्या स्वाधीन राहावें. पतिमरणानंतर पवित्र राहावें किंवा सहगमन करावें. पतीची आज्ञा पाळणें हाच स्त्रियांस स्वर्गप्राप्तीचा मार्ग होय. जी स्त्री पति जीवंत असतां उपोषण किंवा कोणतेंही प्रायश्चित्त करिते ती आपल्या पतीचा जीव गमावते व स्वतां नरकास जाते. ( अ० २५. )

( ४ ) गुरुमहात्म्य.

मनुष्याला तीन अतिगुरु आहेत; पिता, माता, आणि ( धर्म ) गुरु. ते जें सांगतील तें त्यानें करावें. त्यांस जें आवडेल व उपयोगीं पडेल तें आचरावें. त्यांच्या आज्ञेवांचून कांहीं करूं नये. हे तिघे तीन वेदांसमान आहेत. ( ऋ० य० सा० ) ते तिघे तीन देवांसमान आहेत. ( ब्र०

वि० शि० ) ते त्रिभुवनांसारिखे आहेत. ( जन—देव—ब्रह्म-लोक ) ते तीन अग्नीसमान आहेत. पिता गार्हपत्यअग्नी-समान, माता दक्षिणअग्नीसमान, व गुरु आहवनीयअग्नीसमान. जो ह्या तिघांस मानतो तो सर्व धर्म आचरितो. मातेस पूजल्यानें इहलोक पावतो. पित्याला पूजल्यानें देवलोक मिळतो, आणि गुरुआज्ञापालन केल्यानें ब्रह्मलोकाप्रत जातो. ( अ. ३१. )

---

# खंड ४. ऐतिहासिक काव्यें.

## रामायण आणि महाभारत.

### प्रकरण १. उपोद्धात.

रामायण वेद-तुल्य आहे.

रामायण आणि महाभारत हीं दोन महाकाव्यें आहेत; तीं इतिहासांत गणिलीं असून त्यांची मातबरी वेदाप्रमाणेंच आहे असें त्यांतच सांगितलें आहे:—"हें रामायण चित्तशोधक ( मन पवित्र करणारें ) असून सर्व प्रकारें पुण्याचें साधन, पापनाशक व सर्व वेदरहस्य ब्रह्माचें प्रतिपादन आहे, यास्तव हें वेदतुल्य आहे. ह्या चरित्राचा पाठकर्त्ता ब्राह्मण वेदपारंगत होतो; क्षत्रिय, भूपति होतो; वैश्य धनसमृद्धि पावतो. शूद्र, ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य यांहून इतर सर्व प्रजांपेक्षां इहलोकीं श्रेष्ठ होऊन देहांतीं आपल्या सन्निध श्रेष्ठवर्णप्राप्तिरूप फल पावतो." ( रामायण. बालकांड अ. १. )

भारत वेदाच्या योग्यतेचें आहे.

महाभारताविषयीं असेंच ह्मटलें आहे:—कृष्णाविषयींचा हा वेद ( महाभारत ) जो

जाणतो व दुसऱ्यास पठण करून दाखवितो त्याला अन्नप्राप्ति होते. एकदां सर्व देवांनीं मिळून चार वेद एका तराजूच्या पारड्यांत घातले व दुसऱ्या पारड्यांत भारत घातलें, तेव्हां त्याचा भार वेद व उपनिषदें यांच्यापेक्षां अधिक झाला ह्मणून त्याला भारत असें ह्मणूं लागले."

ह्या उताऱ्यांतील दुसऱ्या वचनाचें मूळः—

एकतश्चतुरो वेदान् भारतं चैतदेकतः ।
पुरा किल सुरैः सर्वैः समेत्य तुलया धृतम् ।
चतुर्भ्यः सरहस्येभ्यो वेदेभ्यो ह्यधिकं यदा ।
तदाप्रभृति लोकेऽस्मिन्महाभारतमुच्यते ॥

( महाभारत, आदिपर्व,. २६१, २६४ ).

"हें महाभारत अतिपवित्र, अतिउत्तम, वेदतुल्य, सर्वपठणयोग्य, ग्रन्थांत सर्वोत्तम, प्राचीन, व ऋषींनीं स्तविलेलें असें आहे."

भारतदानाचें व पठणाचें फल.

"कोणी हें भारत पठण करील तो ज्ञानी होऊन वेदपारंग होईल."

"हें भारतपुराण पुस्तक लिहून जो वाचकांस देतो त्या पुरुषास समुद्रवलयांकित पृथ्वी दान केल्याचें पुण्य लागतें."

(आदिपर्व. अ. ६२.)

---

## प्रकरण २.

## रामायण.

वाल्मीकि.

रामायणाचा कर्त्ता वाल्मीकि नामक मुनि होता. हा प्रथम कोळी असून अरण्यांत वाटसरू लोकांस मारून व लुटून कुटुंबाचा व आपला उदरनिर्वाह करीत असे. तो नारदाच्या ज्ञानोपदेशानें ऋषि

झाला अशी कथा आहे. ह्याचें वासस्थान चित्रकूट नामक पर्वतावर होतें.

रामायण रचण्याचें प्रयोजन.

रामायण लिहिण्याचें कारण ग्रन्थान्तरीं येणेंप्रमाणें सांगितलें आहे:—एकदां वाल्मीकि नदीवर स्नान करीत असतां समोर एका वृक्षावर क्रौंच पक्ष्याची नर व मादी बसलीं होतीं. त्यांतून मादीस एका पारध्यानें मारिलें, तेणेंकरून नरास अत्यंत शोक झाला. इकडे वाल्मीकि ऋषीचेंही अंतःकरण दयेनें व्याप्त होऊन त्याच्या मुखांतून असें वाक्य निघालें कीं, "मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ॥ यत्क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥" म्हणजे "हे निषाद, ज्यापेक्षां या क्रौंच पक्ष्यास तूं वधिलेंस त्यापेक्षां तूं बहुत वर्षें वांचणार नाहींस." असा शाप दिल्यावर त्या ऋषीला पश्चात्ताप झाला कीं, हें मीं अनुचित केलें. मग त्याला ब्रह्मदेवानें येऊन सांगितलें कीं, "ज्या अनुष्टुप् छंदानें तूं हा शापमय श्लोक रचिलास त्याच छंदानें आतां स्त्रीविरहरूप काव्य कर, आणि जसें तूं वर्णन करशील तसें सर्व पुढें घडून येईल." याप्रमाणें ब्रह्मदेवाच्या आज्ञेनुसार वाल्मीकीनें रामावतार होण्यापूर्वी रामायण रचिलें. रामायणाच्या उत्पत्तीची ही कथा रामायणांत असून दुसरीही एक कथा त्यांत अशी आहे कीं, रामावताराचें भविष्यरूप कथन नारदमुनीनें वाल्मीकीस केलें, तेंच त्यानें कवनरूपानें रचिलें. तिसरी कथा अशी आहे कीं, वाल्मीकि ऋषीनें समाधींत सकल रामचरित्र योगोत्पन्न बलानें अवलोकन केलें. यांतून कोणतें खरें असेल याचा निर्णय वाचकांनीं करावा.

रामायणाचे विभागास कांड ह्मणतात. एकंदर सात

ग्रंथविभाग.

कांडें आहेतः—१ बालकांड, २ अयोध्याकांड, ३ अरण्यकांड, ४ किष्किंधाकांड, ५ सुंदरकांड, ६ युद्धकांड, ७ उत्तरकांड. हें शेवटलें कांड जुन्या रामायणास फार मागून जोडलेलें असावें असें परीक्षकांचें मत आहे. या प्रत्येक कांडांतील विषयाचा सारांश सांगण्यास एथें जागा पुरणार नाहीं. मराठी भाषेंत वा० रामायणाचें भाषांतर झालें आहे तें पाहावें. तें मुंबईचे प्रसिद्ध रा० रा० जावजी दादाजी ह्यांनीं करवून छापिलें आहे. रामचरित्राचा सारांश **दशावतार** प्रकरणांत पाहा.

---

## प्रकरण ३.

## महाभारत.

महाभारताइतकें लांबचलांब काव्य जगांत दुसरें नसेल.

ग्रंथविभाग.

यांत रामायणांतील विषयांपेक्षां अनेक विषयांची भरती केली आहे. दंतकथा, आख्यानें, नीतिसंवाद, ब्रम्हविचार इ० अनेक गोष्टींचा यांत संग्रह आहे; व पुढें जीं पुराणें झालीं त्यांच्या असंख्य विषयांची खाण यांत आहे. हें एका मनुष्यानें किंवा एका काळीं लिहिलें असें नाहीं, अनेक ग्रन्थकारांचे त्याला हात लागले असून तें शेंकडों वर्षांची रचना आहे. तथापि विष्णुपुराणांत सांगितलें आहे कीं, तें एकटया कृष्णद्वैपायनानें ( व्यासानें ) लिहिलें !

कृष्णद्वैपायनं व्यासं विद्धि नारायणं प्रभुम् । कोन्यो हि भुवि मैत्रेय महाभारतकृतद्भवेत् ॥ ( वि० पु० ३. ४. ५. )

व्यास हा पराशराचा सत्यवती नांवाच्या कोळणीपासून झालेला मुलगा होता, ह्याला वेदव्यास असेंही ह्मणतात, कारण यानें वेदाचा व्यास ( रचना—व्यवस्था ) केला.

ह्या काव्यांत एकंदर २२०००० श्लोक आहेत. ह्याचे पर्व नामक विभाग केले आहेत. पर्वें १८ आहेत, त्यांचीं नांवें:—आदि—सभा—वन—विराट—उद्योग—भीष्म—द्रोण—कर्ण—शल्य—सौतिक—स्त्री—शांति—अनुशासन—आश्वमेधिक—आश्रमवासिक—मौसल—महाप्रस्थानिक—स्वर्गरोहणिक—पर्व.

महाभारताचें संपूर्ण महाराष्ट्र भाषांतर झालें नाहीं, परंतु भारतसार नामक ( ३ भाग ) ग्रंथांत त्याचा बराच सारांश दिला आहे. हें पुस्तक पुण्यांतील प्रसिद्ध रा० रा० रावजी श्रीधर गोंधळेकर यांनीं छापिलें आहे.

मुख्य विषय. ह्या महाग्रन्थाचा मुख्य विषय कौरव-पांडवांचें युद्ध हा आहे.

कौरव हे सोमवंशी क्षत्रिय होते. ह्या वंशांतील ययाति राजाला पूरु आणि यदु असे दोन पुत्र झाले. यदु हा यादवांचा मूळपुरुष होता; यदुकुळांतील शेवटले पुरुष वसुदेव व कृष्ण हे होते. पूरूच्या वंशांत पंधरावा पुरुष दुष्यंत राजा होता. त्याच्या पुत्राचें नांव भरत. ह्याच्यावरून हिंदुस्थानाला **भारतवर्ष** किंवा **भरतखंड** असें नांव पडलें. भरतापासून नववा कुरु झाला. त्याच्यापासून चौदावा शंतनु विचित्रवीर्य. तो मरण पावल्यावर त्याची विधवा अंबिका हिला ( तेव्हांच्या चालीप्रमाणें ) तिचा दीर व्यास

कौरवांचा वंश.

ह्यापासून पुत्रोत्पत्ति झाली. ह्या पुत्राचें नांव धृतराष्ट्र. हा अंध होता. याला शंभर पुत्र होते. हे **कौरव** या नांवानें प्रसिद्ध आहेत. त्यांतील दुर्योधन, दुःशासन, विकर्ण, चित्रसेन, इ० अकरा पुत्र महारथी होते. कौरवांच्या आईचें नांव गांधारी.

पांडवांचा वंश.

पुरूच्या वंशांत **पांडव**नामक पांच बंधु झाले, त्यांचीं नांवें:—धर्म किंवा युधिष्ठिर, भीम, अर्जुन, नकुल, व सहदेव. यांच्या बापाचें नांव पंडु व पहिल्या तीन भावांच्या आईचें नांव कुंती होतें, व दुसऱ्या दोघांच्या आईचें नांव माद्री होतें.

पांडवांचे चमत्कारिक जन्म.

ह्या पांडवकौरवांचें जन्म विलक्षण कारणानें व सृष्टिनियमबाह्य झालें. "पंडु राजा एकदां आपल्या दोघी स्त्रियांस घेऊन अरण्यांत विहारार्थ गेला. तेथें एक ऋषि मृगवेषानें स्वस्त्रीशीं क्रीडा करीत असतां यानें अज्ञानानें त्याला बाण मारिला. तेव्हां त्यानें पूर्वरूप धरून प्राण सोडितांना राजाला शाप दिला कीं, तूंही असाच स्त्रीसमागम होतांच मरण पावशील. पुढें तो वैराग्यधारण करून अरण्यवासांत कालक्रमण करूं लागला. इकडे त्याची राणी कुंती घरीं असतां दुर्वास ऋषि तिच्या एथें आला, त्याची हिनें अहोरात्र इतक्या एकनिष्ठेनें सेवा केली कीं, तो जातांना तिला पुत्रप्राप्तीचे मंत्र देऊन गेला; आणि सांगितलें कीं ज्या देवाच्या नांवानें तूं हे मंत्र जपशील तो तुझ्यापाशीं येईल व त्यापासून त्याच्यासारिखा तुला पुत्र होईल. हें वर्तमान तिनें आपल्या पतीस कळविलें आणि अशी वि-

नंती केली कीं, आज्ञा द्याल तर मी पुत्र उत्पन्न करीन. मग त्याच्या संमतीनें तिनें यमधर्म, वायु आणि इंद्र यांचे मंत्र जपले, त्या देवांपासून तिला क्रमेंकरून धर्म, भीम, व अर्जुन असे पुत्र झाले. एक मंत्र तिनें आपली सवत माद्री हिला दिला, तेणेंकरून तिला नकुल व सहदेव असे दोन पुत्र झाले. कुंतीला कर्णनामक आणखी एक पुत्र ती कुमारी असतां झाला होता. त्याची कथा अशी आहे कीं, तिनें सूर्यमंत्र जपल्यावर तिला सूर्यापासून पुत्र झाला. पण तिनें त्यामुळें लज्जित होऊन त्याला एका पेटींत घालून नदींत सोडलें. ती पेटी वाहत वाहत अंग देशास जाऊन पोंचली. तेथें सत्यकर्मानामक राजाच्या रथीस ( रथ हांकणारास ) सांपडली, व त्याच्या कुटुंबांत तो बालक वाढला."

कौरवांचीही उत्पत्ति अशाच प्रकारची वर्णिली आहे.

कौरवांची चमत्कारिक उत्पत्ति.

"गांधारी ही आपला पति धृतराष्ट्र हा अंध असे, त्याशिवाय इतर पुरुष दृष्टि पडूं नये, ह्मणून सर्वदां नेत्रांस पट बांधीत असे. तिच्या घरीं व्यासमुनि एकदां आला असतां तिनें जशी कुंतीनें दुर्वासाची सेवा केली तशी त्याची मोठ्या तत्परेनें सेवा केली. तेव्हां त्यानें वर माग ह्मणून सांगितलें, तिनें शंभर पुत्रांचा वर मागितला. पुढें तिला जो गर्भ राहिला तो दोन वर्षें तिच्या उदरांत होता. तो बाहेर निघाल्यावर केवळ मासाचा गोळा होता. त्याचे व्यासानें अंगुष्ठप्राय शंभर तुकडे करून ते घृतकुंभांत टाकिले, तेच पुढें तिचे शंभर पुत्र झाले."

द्रौपदी.

पांच पांडवांस द्रौपदी नामक द्रुपद राजाची सुंदर कन्या स्त्री होती. ही गोष्ट हिंदुधर्माप्रमाणें अगदीं निंद्य व शास्त्रविरुद्ध आहे. तिचा दोषनिवारणार्थ भारतांत असें सांगितलें आहे कीं, द्रौपदी पूर्वजन्मीं ऋषिकन्या होती. तिनें तप करून शिवापाशीं पति मागितला. त्यानें तिला पांच पतींचा वर दिला. तेव्हां ती ह्मणाली, मला एकच नवरा पाहिजे असतां आपण पांच कां देतां ? शिव ह्मणाला, तुला दुसऱ्या जन्मीं पांच भ्रतार मिळतील; कारण तूं पांच वेळां माझ्यापाशीं पति मागितलास. "द्रौपदी ही परमपतिव्रता, सद्‌गुणी व क्षमाशील असे. हिचे पांच पुत्र अश्वत्थाम्यानें मारिले असतां भीमार्जुनांनीं त्यास धरून हिजपुढें आणून उभें केलें, व पुढें मारावें तों, हिला दया येऊन हिनें ह्मटलें कीं, मी जशी माझ्या पुत्रांच्या मरणानें दुःखी झालें आहें, अशीच याची माताही होईल; यास्तव याचा वध करूं नका. त्यावरून त्यांनीं त्यास सोडून दिलें." भारती युद्धाचें मूळ कारण द्रौपदी होती. हिला कौरवांनीं बहुत छळिलें, तें सर्व सोसून ती आपल्या पतींसह अरण्यवासांत व अज्ञातवासांत संतोषानें राहिली. पांडवबंधूंपैकीं कित्येकांनीं द्रौपदीशिवाय आणखीही स्त्रिया आपापल्यास करून घेतल्या होत्या. अर्जुनाची दुसरी बायको कृष्णाची बहीण सुभद्रा होती, व तिसरी चित्रांगदा नामक चित्रवाहन राज्याची कन्या होती. भीमाला हिडिंब नामक राक्षसाची बहीण हिडिंबा होती.

पांडवांचे गुण.

ह्या पांच भावांचे गुण निरनिराळे होते. युधिष्ठिर सात्विक स्वभावाचा, दयाळु व स्नेहाळु होता. भीम अतिशय बलाढ्य व दांडग्या स्वभावाचा असून त्याचा आहारही मोठा असे, यावरून त्याला वृकोदर ( लांडग्याच्या पोटाचा ) असें नांव पडलें होतें. हा गदायुद्धांत निपुण होता. अर्जुन धनुर्विद्येंत निपुण असून त्याचें व कृष्णाचें मोठें सख्य होतें. युद्धसमयीं कृष्ण त्याचें सारथ्य करी. त्याचें मन कोमल होतें, त्याला युद्धांत स्वजनांस मारणें हा अधर्म वाटून तो युद्ध करणें सोडून देणार होता, परंतु कृष्णानें त्याला अठरा अध्याय गीतेचा उपदेश करून युद्धास उभें केलें. नकुल हा फार देखणा होता. सहदेव हा खड्गयुद्धांत निपुण होता.

त्यांशीं कौरवांचा द्वेष.

पांडव हे थोर व युद्धांत निपुण व विजयी होऊं लागल्यावर कौरवांनीं त्यांशीं द्वेष आरंभिला. त्यांनीं त्यांस एकदां लाक्षा (लाखेच्या) गृहांत जाळण्याचा विचार केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. पुढें पांडवांस अर्धराज्य मिळून ते इन्द्रप्रस्थ नगरींत राज्य करीत असतां त्यांनीं राजसूयनामक मोठा यज्ञ केला. त्या यज्ञाला दुर्योधनादि कौरवांला आमंत्रण केलें होतें. त्यांस त्यांचें ऐश्वर्य पाहून मोठा मत्सर उत्पन्न झाला. आणि त्यांच्या बरोबर द्यूत ( जुगार ) खेळून त्यांची सर्व संपत्ति हरण करून घेतली व त्यांची बायको द्रौपदीही पणास लावून तिला जिंकिलें; पुढें त्यांस धृतराष्ट्रानें मुक्त केल्यावर त्यांनीं स्त्रीसहवर्तमान बारा वर्षें वनवासास जावें व एक वर्ष अज्ञातवास करावा आणि त्यांत उमगल्यास पुनः

बारा वर्षें वनवास करावा अशा करारावर त्यांस अरण्यांत लाविलें.

त्यांचा वनवास.

पांडव वनांत असतां अनेक गोष्टी घडल्या त्या सर्व एथें सांगतां येत नाहींत. धर्मराजापाशीं पुष्कळ ऋषि येत असत. त्यांच्यापासून त्यानें अनेक इतिहास व देवादिकांचीं चरित्रें श्रवण केलीं. त्यांत रामचरित्रही होतें, तें भारतांत **रामोपाख्यान** या नामानें लिहिलेलें आहे. त्यांत व वाल्मीकि रामायणांत कित्येक महत्वाच्या गोष्टींचा भेद आहे. वनांतून अर्जुन हिमालयास गेला व मोठें तीव्र तप करून शिवापासून पाशुपत अस्त्र मिळविता झाला. दुसऱ्याही देवांनीं त्यास अस्त्रें व रथ दिले. ही कथा वनपर्वांत आहे. याच पर्वांत **नलदमयंतीची** प्रसिद्ध कथा आहे.

त्यांचा अज्ञातवास व युद्ध.

तेराव्या वर्षीं पांडव विराट राजाच्या घरीं अज्ञातवासांत राहिले. तो काळ सरल्यावर त्यांनीं दुर्योधनापाशीं राज्याचा अर्धभाग मागितला. तो त्यानें न दिल्यामुळें युद्ध उत्पन्न झालें; तें अठरा दिवस चाललें, त्याचें वर्णन मोठ्या विस्तारानें भारतच्या अनेक पर्वांत केलें आहे.

कृष्ण धर्मराजास लबाडी करायास सांगतो.

ह्या युद्धांत ज्या अनेक गोष्टी घडल्या, त्यांत एक अशी आहे कीं, कृष्णानें धर्मराजाला अनृत भाषण करायास सांगितलें, त्याचें कारण असें होतें कीं, धृष्टद्युम्न व द्रोण ह्या दोघां वीरांचें युद्ध चाललें असतां पहिल्याला दुसरा आटपेना, तेव्हां कृष्णानें युधिष्ठिराला अशी

युक्ति सुचविली कीं, द्रोणाचा पुत्र अश्वत्थामा हा युद्धांत मरण पावला अशी कंडी उठीव, म्हणजे ती ऐकतांच द्रोण शस्त्रें खालीं ठेवील. परंतु युधिष्ठिर तसें करायास मान्य होईना म्हणून अश्वत्थामा नामक हत्ती मारून तो मेल्याची वार्त्ता द्रोणाच्या कानीं पडावी असें सुचविलें. त्यांत अशी कपटयुक्ति लढविली कीं, प्रथम भीमानें कृष्णाच्या सांगण्याप्रमाणें द्रोणाचार्यासमीप जाऊन "गज" हीं दोन अक्षरें हळूच उच्चारून "अश्वत्थामा मरण पावला" अशी गर्जना केली. ती ऐकतांच द्रोण सत्यवक्ता जो धर्मराज त्याकडे गेला. त्यानेंही कृष्णाच्या सूचनेवरून तसेंच भाषण केलें, तें येणेंप्रमाणें:—"ज्याकरितां तूं शस्त्र धारण करितोस तो तुझा प्रियपुत्र अश्वत्थामा भूमीवर शयन करितो," असें म्हणून "गज" हीं अक्षरें अस्पष्ट बोलून "अश्वत्थामा मरण पावला" हे शब्द मोठ्यानें बोलला. ते ऐकल्यावर द्रोण शस्त्र खालीं ठेवून बसला असतां धृष्टद्युम्नानें येऊन त्याचा शिरच्छेद केला. (द्रोणप० अ० १९४.)

तो अर्जुन व भीम यांस धर्मयुद्धाचे नियम मोडायास सांगतो.

भारतांतील युद्धें धर्मयुद्धें होतीं, म्हणजे एका वीराशीं एकच वीर लढत असे. असें असतां कृष्णानें कित्येक अनीतीच्या सूचना करून शत्रुपक्षाच्या कित्येक वीरांचा पांडवाकडून प्राण घेवविला. तो तर स्वतां कोणाशीं लढला नाहीं, अर्जुनाचा रथ मात्र हांकीत असे. द्रोणाचा वध त्यानें कसा करविला हें वर सांगितलेंच आहे. कर्ण अर्जुनाशीं लढत असतां त्याच्या रथाचें चाक भूमींत रुतलें, तें वर काढण्यासाठीं तो खालीं उतरला असतां त्याला मारण्या-

विषयीं कृष्णानें अर्जुनास सुचविलें. असें करणें धर्मयुद्धाच्या नियमास विरुद्ध होतें. तसेंच भीम व दुर्योधन यांचें युद्ध लागलें असतां गदायुद्धांत कमरेच्या खालीं मारूं नये असा नियम असून कृष्णानें त्या नियमाचा भंग करायास भीमास मसलत दिली; त्याप्रमाणें त्यानें दुर्योधनाच्या मांडीवर गदा मारून त्यास खालीं पाडलें. भीमानें युद्धांत आणखीही कित्येक अघोर कृत्यें केलीं, त्यांपैकीं एक हें होतें कीं आपला चुलतबंधु दुःशासन ह्याला युद्धांत मारिल्यावर त्याचा ऊर चिरून त्याचें रक्त प्राशन केलें!

कौरवही तसेंच करितात.

कौरवांकडील योद्धयांनींही ह्या नियमाचा भंग करून कृष्णाचा भाचा अभिमन्यु यावर व्यूह रचून सहा जणांनीं मिळून त्या एकट्यास मारिलें.

युद्धाचा शेवट.

ह्या युद्धांत उभय पक्षांकडील बहुत वीर पडले. कौरवसैन्याचा अगदीं मोड झाला, सर्व कौरवबंधु मरण पावले, आणि युधिष्ठिर राजपदारूढ झाला.

पांडवांचें राज्य.

पांडवांनीं पुढें केवळ ३६ वर्षें राज्य केलें. कृष्णाच्या मरणाचें वर्तमान ऐकिल्यावर अर्जुनाचा नातु परीक्षित यास राज्यावर स्थापून हे पांच बंधु द्रौपदीसहवर्तमान हिमालयाकडे गेले व तेथें यांचा काल झाला. परंतु भारतांत असें सांगितलें आहे कीं ते मेरु पर्वतावरून स्वर्गास गेले. ही कथा त्या ग्रंथाच्या महाप्रस्थानिक व स्वर्गारोहणिक नामक शेवटच्या दोन पर्वांत आहे.

परीक्षित राजा.

परीक्षित राजा जन्मेजयाचा बाप होता. ह्याविषयीं अशी कथा आहे कीं, त्यानें एकदां एका समाधिस्थ ऋषीच्या गळ्यांत मृतसर्प घातला, तेव्हां त्या ऋषीच्या पुत्रानें तूं सर्पदंशानें मरशील असा शाप दिला. त्याप्रमाणें तो मरण पावला. मरणापूर्वीं त्यानें सात दिवस भागवत पुराण ऐकिलें व सातव्या दिवशीं त्याला सर्पदंश झाला.

पांडवांचें स्वर्गारोहण.

स्वर्गारोहणाच्या कथेंत असें सांगितलें आहे कीं, पांच पांडव व द्रौपदी हीं मेरु पर्वताकडे चाललीं असतां त्यांच्या बरोबर एका कुत्र्याशिवाय आणखी कोणी नव्हतें; त्यांस बहुत देश व समुद्र व नद्या ओलांडून जावें लागलें. सर्वांच्या पुढें युधिष्ठिर चालत होता. त्याच्या मागून भीम, अर्जुन व दुसरे दोघे बंधु क्रमानें होते; शेवटीं द्रौपदी होती. सर्वांच्या मागें कुत्रा होता. त्यांस जेव्हां समुद्र लागला तेव्हां अर्जुनानें त्यांत आपलें धनुष्य व भाते टाकिले. ते हिमालयाच्या पलीकडे गेल्यावर त्यांस वालुकामय समुद्र लागला. मग त्यांनीं सर्व पर्वतांचा राजा जो मेरु तो पाहिला. त्यावर चढत असतां द्रौपदी खालीं भूमीवर पडली, तिच्या मागून भीम, युधिष्ठिर व कुत्रा हीं खेरीज करून, सर्व पडले. असे निर्दोष प्राणी कसे गळून पडले हें भीमाला समजेना, म्हणून तो युधिष्ठिरास पुसूं लागला. त्यानें मागें न पाहतां सांगितलें कीं हें सर्व त्यांच्या पापिष्ठ वासनांचें व अतिशय प्रपंचासक्तीचें फळ होय. द्रौपदीची अर्जुनावर परमप्रीति होती, सह-

देव हा जरी पांचांमध्यें नम्र होता तरी त्याला आपल्या ज्ञानाचा गर्व होता. नकुलास आपल्या सौंदर्याचा व अर्जुनास आपल्या बलाचा गर्व होता. असें भाषण होत आहे तों भीमही पडूं लागला. त्याला युधिष्ठिरानें सांगितलें कीं, हें तुझ्या स्वार्थबुद्धीचें व गर्वाचें व विषयवासनेचें फळ आहे. शेवटीं युद्धिष्ठिर व कुत्रा हे दोघे मात्र राहिले. मग इंद्र आपणास स्वर्गांत येण्याविषयीं बोलावीत आहे, अशी वाणी त्याला ऐकूं आली, तेव्हां आपले भाऊ व बायको यांनींही आपल्याबरोबर यावें अशी त्यानें इंद्राची विनंती केली. इंद्र ह्मणाला कीं, त्यांचे आत्मे स्वर्गीं गेले आहेत, तूं मात्र सदेह ये. युधिष्ठिर ह्मणतो, माझ्या कुत्र्यास मजसंगतीं येऊं दे. इंद्र ह्मणाला "ज्याच्या समागमें कुत्रे आहेत त्यांस स्वर्गांत जागा नाहीं." तरी युधिष्ठिर आपला आग्रह सोडीना, असें पाहून इंद्र म्हणतो, "तूं आपले भाऊ व बायको ह्यांस सोडिलेंस, आणि कुत्र्यास कां सोडीत नाहींस ?" युधिष्ठिर म्हणतो, "त्यांस जीवंत करण्याची मला शक्ति नाहीं. जे जीवंत नाहींत त्यांस सोडलें असें कसें म्हणावें ?"

हा कुत्रा पांडवांचा बाप होता; त्यानें आतां श्वानवेष टाकून आपलें खरें रूप धारण केलें, आणि आपल्या पुत्राच्या स्थैर्याची प्रशंसा करून ते उयभतां स्वर्गांत गेले. तेथें त्याला आपले भाऊ दृष्टीस पडण्याबद्दल दुर्योधन व त्याचे बंधु भेटले, तेव्हां तो मोठा अचंबित होऊन त्या स्थळीं राहण्यास मान्य होईना. मग एका दूतानें त्याला

वैतरणी नदी उतरून असिपत्रवन* ( तरवारींच्या पानांचें रान ) नामक नरकांत नेलें, तेथें निबिड अंधारांतून पलीकडे गेल्यावर त्यानें महाअग्नीच्या ज्वालांत आपल्या भावांचें क्लेशयुक्त आक्रंदन ऐकिलें, तेव्हां तो त्यांच्या दुःखांचा विभागी होण्याकरितां त्यांच्यामध्यें जाऊन राहिला. पण हें सर्व मायाजाल होतें; धर्मराजाची बंधुप्रीति पाहण्याकरितां ही त्याची परीक्षा होती. नंतर त्यानें स्वर्गंगेंत स्नान करून खऱ्या स्वर्गांत प्रवेश केला. तेथें त्याला द्रौपदीसह आपले बंधु भेटले व त्यांच्या सहवर्तमान तो सुखांत राहिला.

---

अनेक प्रकारचे नरक.

* ह्या नरकाचें वर्णन महाभारतांत जें केलें त्याचें सार येणेंप्रमाणें आहे—: "अंधकारानें व्याप्त व घोर, केश हेंच कोणी शेवाळीं व तृणें, ज्यामध्यें मांसरक्ताचा चिखल, ज्यामध्यें पापी मनुष्यांच्या गंधानें युक्त, दंश उत्पादक भल्लक व मक्षिका, पिसा इ० जीवांनीं वेष्टित, लोखंडाच्या मुखाचे काक व गृध्र ( कावळे व गीध ) यांनीं सेवित, विंध्यपर्वतासारखें प्रेतांनीं वेष्टित, छिन्न झालेले बाहु, ऊरू व पाणी यांहींकरून व मेदरुधिरांनीं युक्त व छिन्न होऊन पसरलेल्या उदरपादांनीं युक्त, प्रेत शरीरांचा अकल्याणरूप रोमांच उभा करणारा दुर्गंध ज्यामध्यें बहुत सुटलेला, अशा स्थानीं धर्मराजा गेला." पौराणिक नरकाचें हें सामान्य वर्णन आहे. दुसरे विशेष नरक कुंभिपाक रौरव, महारौरव इ० विशेष पापाची शिक्षा भोगण्याकरितां आहेत; उदाहरणार्थ, केवळ देहभरणावर दृष्टि देऊन अधर्मीं रत होणाऱ्यांस महारौरव न० प्राप्त होतो, कुटुंबभरणासाठीं अनेक प्रकारच्या हिंसा करणारा रौरवीं जातो. जे सजीव प्राण्यांचें पचन करितात ते कुंभिपाकांत पडतात.

# प्रकरण ४.

## रामायणांतील वेंचे.

**(१) प्रथम स्त्रीची उत्पत्ति.** ( उत्तरकांड. अ. ३०. )

ब्रम्हदेव इंद्राप्रत म्हणतो— मीं बुद्धिकरून प्रजा निर्माण केल्या. त्या अशा कीं, ज्यांची देहकांति एकासारखी असून ज्यांची भाषा समान आहे व ज्यांच्या वयोवस्था सर्व समान आहेत अशा त्या प्रजांच्या रूपलक्षणवर्णादिकांत निश्चयेंकरून विशेष केला नाहीं.

त्यानंतर मीं एकाग्रचित्त होत्साता त्या प्रजांचें चिंतन केलें. नंतर त्या प्रजांचें चिंतनकर्ता जो तो मी, त्यांच्या विशेषार्थ म्हणजे त्यांमध्यें अंगवैकल्यप्रयुक्त परस्परांमध्यें विलक्षणपणा सिद्ध होण्याकरितां एक स्त्री निर्माण केली. ती अशी कीं, प्रजांचा प्रत्येक जो विशिष्टावयव तो मीं काढून घेतला. तदनंतर रूपगुणांहींकरून मी अहल्या स्त्री निर्माण केली. ह्या अहल्या शब्दामध्यें जो हलशब्द आहे त्याचा अर्थ या जागीं वैरूप्य होय; व त्या हलापासून जें उत्पन्न तें हल्य ( निंद्यत्व ) आहे असें जें हल्यनामक निंद्यत्व तें जीस नाहीं यामुळें जी अहल्या म्हणून प्रख्यात अशी असल्यामुळें अहल्या असेंच मीं तिचें नाम प्रसिद्ध केलें.

**(२) रामाचें वल्कलधारण.** ( अयो० कांड. अ० ३७. )

राम दशरथापाशीं वल्कलें मागतो.

“....असें महापात्र नामक जो प्रधान त्याचें वचन श्रवण करून विनयसंपन्न रामचंद्र नम्र होत्साता दशरथास असें वाक्य बोलतो कीं, हे राजन्, मी सर्व राज्यभोगाचा त्याग करून अरण्यांत कंदमूलादिकांनीं जीवन पावणारा झालों, अशा

सर्वसंगपरित्याग करणाऱ्या मला समागमें सैन्य घेऊन काय कर्तव्य आहे? कारण वनवास करणाऱ्यानें बरोबर सैन्य नेणें हें असंगत होय. याविषयीं दृष्टांत कीं, उत्तम गजदान करून त्या गजाच्या बंधनरज्जूचे ठिकाणीं दानकर्त्यानें जसें मन ठेवणें आश्चर्यकारक होतें; कारण ज्यानें येवढ्या मोठ्या गजाचाहि त्याग केला त्यास रज्जूविषयीं स्नेह उत्पन्न होऊन तो रज्जूचा त्याग करणार नाहीं काय? करीलच; तसेंच हे सज्जनश्रेष्ठ जगत्पते राजन्, मीं सर्व राज्याचाही त्याग केला तेव्हां त्या गजबंधनतुल्य सैन्याचा त्याग करणें मला काय कठीण आहे? तस्मात् हें सर्व सैन्यादिक या मातुश्रीच्या प्रीतीस्तव मीं भरतास दिलें आहे. त्याचा उपयोग भरतानेंच करावा आणि माझीं जीं वल्कलें मला देण्यासाठीं सिद्ध केलीं असतील तीं माझीं मला कैकेयीच्या दासी आणून देवोत. हे दासीहो, तशींच चतुर्दश वर्षेंपर्यंत वनांत वास करणाऱ्या मला कंदमूलादिक भूमींतून खणून आणण्याविषयीं कुदळ व खोरें हीं दोन मात्र मला आणून देण्याविषयीं तुम्ही शीघ्र गमन करा.

“ असें रामानें सांगतांच तत्काल कैकेयीनें स्वतः उठून आपणच तीं वल्कलें आणून राघवास दिलीं, आणि ती निर्लज्ज असल्यामुळें जनसमुदायांतहि हे रामा, हीं वल्कलें तूं परिधान कर; याप्रमाणें बोलली. नंतर त्या पुरुषश्रेष्ठ रामानें कैकेयीपासून तीं वल्कलें ग्रहण केलीं आणि पूर्वीं धारण केलेल्या सूक्ष्म उत्तम वस्त्रांचा त्याग करून त्या मुनिवस्त्रांचेंच परिधान केलें.

"तसाच लक्ष्मणानेंहि शुभ वस्त्रांचा त्याग करून पित्याच्या अग्रभागीं तपस्व्यांनीं धारण करण्यास योग्य अशा वल्कलांचा स्वीकार केला; नंतर कैकेयीनें सीतेसही परिधानार्थ दिलेलें वल्कल त्या पीतांबर परिधान करणाऱ्या सीतेनें अवलोकन करतांच जशी हरिणी पाश पाहून त्रस्त होत्ये, तशी ती अत्यंत त्रास पावली. आणि ती कैकेयीपासून वल्कलें ग्रहण करून शुभ लक्षणानें युक्त जानकी अत्यंत लज्जित होत्साती पतीची अशी अवस्था झाली म्हणून मनांत अतिशय दुःखित होऊन ती धर्म दर्शविणारी धर्मज्ञ असल्यामुळें अश्रुपूर्णनेत्र होऊन गंधर्वराजतुल्य पतीस असें म्हणत्ये कीं, हे स्वामिन्, वनवास करणाऱ्या ऋषिपत्नी कशीं वल्कलें परिधान करितात? कारण, तिला तीं वल्कलें ठाऊकच नसल्यामुळें धारण करण्याविषयीं ती अकुशल होती. यास्तव ती वारंवार मोहित होत्साती एक वल्कल हस्तांत घेऊन तिनें आपल्या कंठास वेष्टिलें आणि ती जनकात्मजा लज्जित होऊन तेथें उगीच उभी राहिली. तों तत्काल धर्म धारण करणाऱ्यांत श्रेष्ठ अशा रामानें समीप येऊन तें वल्कल सीतेच्या हस्तांतून स्वतः आपणच ग्रहण करून तिच्या पीतांबरावरच तें बांधिलें.

लक्ष्मण व सीता वल्कलें नेसतात

"याप्रमाणें सर्वोत्तम राम सीतेला वल्कलें नेसवितो हें अवलोकन करतांच अंतःपुरांतील सर्व स्त्रिया नेत्रांतून अश्रुपात गाळूं लागल्या, आणि त्या अत्यंत खिन्न होऊन महातेजःपुंज रामास म्हणाल्या कीं, हे वत्सा, ही सीता उदार

अंतःपुरांतील स्त्रियांचा शोक.

मनाची असल्यामुळें तुजसारखीं वल्कलें परिधान करून वनवास करण्याविषयीं योग्य नव्हे. यद्यपि तूं पित्याच्या वाक्यानुरोधेंकरून निर्मनुष्य अरण्यास गमन करतोस तर कर; परंतु हे प्रभो, तूं पुनः परत येईस तोंपर्यंत हिचें दर्शन आम्हांस असावें म्हणजे आमचें जीवन सफल होईल. यास्तव हे बालका, तुला जर सहाय हवा असेल तर लक्ष्मणास समागमें वनवासास घेऊन जा; परंतु ही कल्याणी तपस्व्यासारखी वनांत वास करण्यास समर्थ नाहीं. यास्तव हे पुत्रा, आमची याचना सफल कर. कदाचित् तुला जर राहा म्हणावें तर तूं नित्य धर्मानें वर्तणारा असल्यामुळें तूं स्वतः येथें राहण्याविषयीं इच्छित नाहींस; परंतु ही भामिनी सीता तरी येथें राहो. अशा त्यांच्या वाणी श्रवण करीत दशरथात्मज रामानें स्वस्वभावतुल्य अशा सीतेनें प्रेरणा केल्यावरून तिला पूर्वोक्तप्रकारें वल्कलें नेसविलीं.

वसिष्ठाचा क्रोध व कैकेयीचा निषेध.

"अशा वल्कलपरिधान करणाऱ्या सीतेस अवलोकन करतांच राजगुरु वसिष्ठ हे साश्रुनेत्र होऊन सीतेस तूं वल्कलें परिधान करूं नकोस म्हणून त्यांनीं तिचें निवारण केलें. आणि क्रोधायमान होऊन कैकेयीस म्हणाले कीं, हे अमर्याद स्वभावे, हे दुर्बुद्धिसंपन्ने, हे कुलपांसनि, नीचे कैकेयी, तूं राजास वंचना करून वर संपादन केलास कीं, एकट्या रामानेंच वनास जावें असें असून सीतेसही वल्कलें देऊन पाठवितेस; तस्मात् तुझ्या भाषणाचें कांहीं प्रमाण नाहीं. यास्तव हे दुःशीले, या सीता देवीनें वनास गमन करूं नये. तर,

रामचंद्र चतुर्दश वर्षांनीं माघारीं येईपर्यंत इनें रामाच्या सिंहासनावर बसून राज्य करावें. तूं म्हणशील कीं, स्त्रियांस कसा राज्याधिकार प्राप्त होईल, तर सांगतों कीं, यावत् जितके गृहस्थ आहेत, तितक्यांच्या दारा ( स्त्रिया ) ह्या आत्माच आहेत. याविषयीं श्रुतिहि प्रमाण आहे कीं, " पुरुषाचें पत्नी हें अर्धशरीर होय." यांत स्त्रीपुरुषांच्या अवयवांचें परस्पर मेलन असल्यामुळें सर्व लोकांतहि त्या उभयतांची परस्पर प्रीति ही प्रत्यक्ष दृश्य आहे. यास्तव या रामाचें जें राज्य तें आपलेंच म्हणून त्याचें सीता पालन करील; अथवा जर तुझ्या आग्रहानें रामासहवर्त्तमान वैदेही वनास जाईल तर, आम्ही सर्व ब्राम्हण व हे अयोध्यानगरवासी सर्व लोकहि जेथें राम वास करील तेथें राहण्याविषयीं यांच्या समागमें जाऊं. तसेंच जेथें राघव स्त्रीसहित वस्ती करील तेथें सर्व अंतःपुराचे रक्षक व राष्ट्रांतील दंडशासनादि करणारे हे सर्व आपापलें उपजीवनसाधनभूत जें द्रव्य तें घेऊन जातील. तसेंच सर्व राष्ट्र, दासीदासादि परिवारासहित सर्व नगर व शत्रुघ्नासहवर्त्तमान जटावल्कलें धारण करून भरतहि वनामध्यें संचार करीत पूर्वज जो काकुत्स्थ राम ह्याच्या समागमें वास करील..... .... ....
याप्रमाणें अप्रतिमप्रभावसंपन्न राजगुरु ब्राम्हणश्रेष्ठ वसिष्ठांनीं भाषण केलें असतांही सीतेनें प्रियपतितुल्य वल्कलपरिधानादिरूप जो वेष धारण केला होता त्यापासून ती निवृत्त झाली नाहीं."

**( ३ ) हनुमंताची बलपरीक्षा** ( सुंदर कां. अ. १. )

"तदनंतर लंकेंत प्रवेश करणाऱ्या हनुमंताच्या बलपरी-

क्षार्थ देवकृत सुरसेची प्रवृत्ति वर्णितात. तो प्रकार असा कीं, गंधर्वांसह देव, सिद्ध आणि परमऋषि, सूर्यसदृश अशा सुरसानामक नागमातेस म्हणाले कीं, हा हनुमान्नामक श्रीमान् वायुपुत्र समुद्रावरून जात आहे त्यास तूं मुहूर्तमात्र विघ्न कर. तें असें कीं, तूं ज्यास दृष्टांत पर्वताचा आहे असें घोर राक्षसरूप धारण करून जें दाढांनीं भयंकर असून ज्याचे नेत्र पिंगटवर्ण असें आकाशास स्पर्श होण्याजोगें मुख करून पूर्वोक्तप्रकारें विघ्न करावें; कारण ह्या मारुतीचें ज्ञानबल व उपायबल आणि पराक्रम जाणण्याविषयीं आम्ही इच्छा करीत आहों. त्याचाच असा विस्तार करतात कीं, असें केल्यानें उपायेंकरून तो तुला जिंकील अथवा विषाद पावेल. याप्रमाणें देवांनीं सत्कारयुक्त केलेली असून पूर्वोक्तप्रकारें ती देवी उक्त झाली असतां त्या सुरसेनें समुद्राच्या मध्यभागीं विक्राळ व विद्रूप असल्यामुळें सर्व लोकांस भयावह असें रूप धारण केलें; आणि ती उल्लंघन करणाऱ्या हनुमंतास आडवी होऊन असें हें पुढील वचन बोलली कीं, देवांनीं, वानरश्रेष्ठ असा तूं मला भक्ष्य काल्पिला आहे. यास्तव तूं माझ्या मुखांत प्रवेश कर; म्हणजे मी तुझें भक्षण करीन; कारण पूर्वीं मला ब्रम्हदेवानें हा वर म्हणजे पुढें आलेल्याचें भक्षण करण्याविषयींचा वर दिला आहे. असें बोलून ती सुरसा त्वरायुक्त होत्साती विशाल मुख पसरून मारुतीच्या पुढें उभी राहिली.

"याप्रमाणें सुरसेनें तो उक्त झाला असतां हर्षास्तव विकसित मुखकमल होत्साता म्हणूं लागला कीं, "हर्ष होण्याचें कारण हें कीं, यद्यपि तिला ब्रम्हदेवानें भक्षण कर-

ण्याचा वर दिला, तथापि तिजपासून सुटून जाण्याचें उपायज्ञान त्याच्या अंगीं असल्यामुळें तो हर्षित झाला." दाशरथिनामा रामचंद्र, बंधु लक्ष्मण व विदेहराजकन्या भार्या यांसह दंडकारण्यास आला; नंतर हा राक्षसांसह शूर्पनखाविरूपकरणादिक कर्मांवरून बद्धवैर झाला असून मायामृगवधरूप कार्यांतरांत आसक्त झाला असतां, त्याची कीर्तिसंपन्न अशी सीतानामक भार्या रावणानें हरण केली. यास्तव रामाच्या आज्ञेवरून मी त्याचा दूत होत्साता त्या सीतेच्या समीप जात आहें, व तो रामचंद्र सर्व देशांचा अधिपति आहे. यासाठीं हे तद्देशवासिनि सुरसे, तूंही रामाचें सहाय करण्याविषयीं योग्य आहेस; अथवा मी मिथिलाराजकन्या सीतेस पाहून निर्दोषकर्म करणाऱ्या रामास तिचा वृत्तांत कळविल्यावर तुझ्या मुखांत प्रवेश करीन, हें तुला मी सत्य प्रतिज्ञापूर्वक सांगतों. याप्रमाणें मारुतीनें ती यथेच्छरूप धारण करणारी सुरसा प्रार्थिली होत्साती ह्मणाली कीं, कोणीही प्राणी अभक्षित असा मजपासून जाणार नाहीं असा मला वर आहे. इतकें सांगितलें असतां व वरदान श्रवण करविलें असतांहि पुनः येईन असें सांगून गमनार्थ उद्युक्त झालेल्या मारुतीस ती त्याचें बल जाणण्याविषयीं इच्छा करणारी नागमाता सुरसा वाक्य बोलली कीं, हे वानरोत्तमा, जर तुला शक्ति असेल तर आज माझ्या मुखांत प्रवेश करूनच गमन करावें; कारण कीं, पूर्वीं हा वर मला ब्रह्मदेवानें दिला आहे, असें ती बोलली. इतकें सांगितल्यानंतर ती त्वरायुक्त होत्साती विशाल मुख पसरून मारुतीपुढें उभी राहिली.

"याप्रमाणें सुरसेनें उक्त झाल्यामुळें तो वानरश्रेष्ठ क्रुद्ध झाला, आणि ह्मणाला कीं, ज्या मुखेंकरून तूं माझें सहन करणार तें मुख निश्चयेंकरून खचितच विस्तीर्ण कर. याप्रमाणें क्रुद्ध झालेला हनूमान् जिचें मुख, दहा योजनें ह्मणजे चाळीस कोस विस्तारयुक्त आहे अशा सुरसेस पूर्वोक्त प्रकारें बोलून त्या कालीं तोहि दहा योजनें विस्तारयुक्त झाला. ते समयीं तें त्याचें रूप पाहून त्या सुरसेनेंहि आपलें मुख वीस योजनें विशाल केलें. असें त्या सुरसेनें पसरलेलें मुख बुद्धिमान् वायुपुत्रानें असें पाहिलें कीं, ज्या मुखांतील जिव्हा दीर्घ असून ज्यास दृष्टांत नरकाचा आहे याप्रमाणें पाहिलें. असें तें पूर्वोक्त प्रकारचें मेघासारखें वीस योजनें दीर्घ मुख हनूमंतानें पाहून तो क्रुद्ध होत्साता तीस योजनें वाढला. त्यानंतर सुरसेनें तसेंच चाळीस योजनें दीर्घ व उच्च असें मुख धारण केलें. पश्चात् वीर असा तो हनूमान् पन्नास योजनें उंच झाला. तेव्हां सुरसेनें आपलें मुख साठ योजनें वाढविलें. असें झालें असतां तत्काळ वीर असा तो हनूमान् सत्तर योजनें उंच वाढला. पश्चात् सुरसेनें ऐशीं योजनें मुख उंच वाढविलें. ते समयीं अग्नीसारखा तो मारुति नव्वद योजनें उंच वाढला. त्या कालीं सुरसेनें शंभर योजनें दीर्घ असें मुख वाढविलें. त्या कालीं मेघासारख्या वृद्धिंगत झालेल्या त्या मारुतीनें आपला देह संक्षिप्त करून ह्मणजे आकुंचित करून तो हनूमान् त्याच मुहूर्तकालीं प्रमाणेंकरून अंगुष्ठाएवढा झाला. नंतर महाबलसंपन्न व श्रीमान् असा तो मारुति अकस्मात् तिच्या मुखांत जाऊन [ उजव्या कानांतून ] बाहेर निघाला.

## (४) राक्षसांचा तपस्वी जनांस उपद्रव.

कोणी एक वृद्ध ऋषि रामचंद्राशीं भाषण करितो—हे रामा, एथें कोणेका रावणाच्या कनिष्ठ बंधु राक्षसानें जनस्थानांत राहणाऱ्या सर्व तपस्विजनांचें उत्पाटन केलें आहे आणि हे ताता, तो राक्षस दांडगा असून जयसंपादनेंकरून शोभणारा, घातुक तसाच पुरुषभक्षणकर्ता, गर्विष्ठ व पापी असा असल्यामुळें तूंहि त्यास असह्य आहेस आणि हे ताता राघवा, तूं ह्या आश्रमांत ज्या दिवसापासून येऊन राहिलास, तेव्हांपासून राक्षस तपस्विजनांस उपद्रव देतात. आणि ते राक्षस आपलीं शरीरें लोकांस किळस येण्यासारिखीं असून क्रूर यास्तव भय उत्पन्न करणरीं अशीं नानाप्रकारचीं विद्रूप यास्तव दर्शनेंकरून असुखकारक अशीं आम्हांस दाखवितात. तसेच ते हलकट राक्षस तपस्विजनांस पाप उत्पन्न करणाऱ्या अपवित्र पदार्थांची योजना करून उपद्रव देतात व ते गरीब तपस्विजनांच्या अग्रभागीं उभे राहून त्यांस व अन्य तापसांसही पीडा देतात आणि ते त्या त्या आश्रमांतील लोकांच्या निद्रासमयीं कोणास न समजेल अशा रीतीनें लपून निर्भयपणें त्यांस आलिंगन करतात व त्या योगानें अत्यंत मुमुर्षु (मरणोन्मुख) झालेल्या त्या तपस्विजनांचा नाश करीत होत्साते क्रीडा करितात, आणि ते राक्षस होमकर्म प्रवृत्त केलें असतां हवनकर्त्यांची स्रुवाआदिकरून पात्रें जिकडे तिकडे फेंकून देतात व अग्नींत उदकाचें सिंचन करितात. तशींच उदकपात्रेंही अगदीं फोडून टाकतात. (अयोध्याकांड. अ. ११६.)

### (५) राक्षसरूपाचें वर्णन.

रामानें वनांत एक राक्षस पाहिला. तो आकृतीनें पर्वत शिखरासारखा, मोठा भयंकर शब्द करणारा, त्याचप्रमाणें पुरुषभक्षक असा होता. त्याचे नेत्र मोठ्या कूपासारिखे अगाध असून पर्वताच्या गुहेपेक्षांही ज्याचें मुख अत्यंत विस्तारयुक्त अशा रीतीचा तो विशाल असून ज्याचें उदरही अत्यंत विस्तीर्ण व जो अतिशय बीभत्स ( किळस येण्यासारिखा ) आणि ज्याच्या शरीरावयवांची रचना उंचसखलपणानें रचिलेली व जो दीर्घ व विपरित वेषयुक्त यास्तवच दर्शनेंकरून भयंकर व व्याघ्रचर्म नेसलेला व मासांतील वसानामक जो स्नेह ( चर्बी ) तेणेंकरून भिजलेला व रक्तानें भरलेला असा असल्यामुळें सर्व प्राण्यांस त्रास उत्पन्न करणारा असून पसरलेल्या मुखेंकरून युक्त असल्या कारणानें यमासारखा भयंकर व ज्यानें आपल्या लोखंडी शूलावर तीन सिंह, चार व्याघ्र, दोन लांडगे, दहा चित्रविचित्र बिंदुयुक्त असे पृषत नांवाचे मृग, तसेंच मांसस्नेहेंकरून लिप्त झालेले दंतांनीं युक्त गजाचें मोठें मस्तक हीं सर्व सिंहादिक भक्षणाकरितां लटकाविलीं आहेत, अशा मोठ्या भयंकर नाद करणाऱ्या राक्षसास ते समयीं रामानें पाहिलें. ( अरण्यकांड अ. २. ).

---

## प्रकरण ५.

## महाभारतांतील वेंचे.

### (१) स्वर्गसुखाविषयीं मुद्गलऋषि व देवदूत यांचा संवाद. ( वनपर्व. अ. २६१. )

**मु० ऋषि.**—हे दूता, स्वर्गांत राहणारे काय करितात ? सुख, दुःख व दोष स्वर्गीं कसकसे आहेत तें मला सांग.

**दूत.**—हे महर्षे, उत्तम स्वर्गसुख प्राप्त झालें असतां त्यास बहुत मानावें असें असतां तूं अज्ञानासारिखा विचार करितोस हें काय ? पृथ्वीपासून ऊर्ध्वभागांत स्वर्ग आहे, तप व यज्ञ केल्यावांचून हा लोक प्राप्त होत नाहीं. धर्मात्मे, जितात्मे, शांत, दांत, मत्सररहित जे पुरुष असतील ते या लोकीं राहतात. देव, साध्य, विश्वेदेव यांचीं गृहें पृथक् पृथक् या लोकीं आहेत. या लोकीं वास करणारे तेजोमय असतात. तेहतीस हजार योजनें ज्याचा परिघ असा मेरुनामक सुवर्णाचा पर्वत संपूर्ण पर्वतांचा राजा त्याजवरही संपूर्ण देवांचीं स्थानें आहेत. नंदनादि वनें या लोकांत विहार करण्यास उत्पन्न केलीं आहेत. क्षुधा, तृषा ग्लानि, शीत, उष्ण यांचें भय नाहीं. भाषण केल्यावांचून एकमेकांचे अभिप्राय एकमेकांस दर्शनेंकरून कळतात. पुष्पास म्लानता कधीं नसते. असें स्वर्गामध्यें बहुत सुख आहे; परंतु स्वर्गाहून एकापेक्षां एक श्रेष्ठ लोक बहुत आहेत. त्या लोकीं देवही जाण्यास इच्छितात, कारण त्या लोकीं स्त्रीकृत ताप नाहीं. जरा, मृत्यु, हर्ष, प्रीति, सुख, दुःख, राग, द्वेष यांचा संभव नाहीं. तो लोक तुला प्राप्त होईल.

आतां स्वर्गलोकीं दोष किती आहेत ते तुला सांगतों. केलेल्या कर्मांच्या फलाचा उपभोग स्वर्गीं होतो. अधिक कर्म करण्याचा अधिकार नाहीं; तेणेंकरून कर्माचा मूलच्छेद होऊन शेवटीं या लोकीं तो परत पतन पावतो, हा मोठा

दोष होय............ब्रह्मलोकापर्यंत जितके लोक आहेत तितक्यांची हीच अवस्था. तस्मात् कर्मेंकरून हे सुखलोक प्राप्त होतात खरे, परंतु कर्माचा अधिकार नसल्यामुळें पुढें पुण्याचा मार्ग स्तब्ध होऊन दुःखभूमीस येणें घडतें. हें मोठें भय आहे म्हणोन ही कर्मभूमि व स्वर्ग ही फलभूमि असें म्हणतात.

**मु०**—हे देवदूता, स्वर्गांतील दोष तूं सांगितलेस तर निर्दोष लोक कोणता ?

**दूत.**—ब्रह्मदेवाचे लोकापासून ऊर्ध्वभागीं विष्णूचें स्थान आहे; त्या लोकीं विषयात्मक पुरुष जात नाहींत. ( भारत-सार ग्रंथ. )

वेदकालीन लोकांस हें विष्णूचें स्थान किंवा ब्रह्मलोक वगैरे ठाऊक नव्हते. ( वेदप्रकरणांतील **स्वर्गवर्णन** पाहा. )

( २ ) **भार्याप्रशंसा** ( शांतिपर्व, आपद्धर्म अ. १४. )

भीष्म म्हणतात—हे धर्मा, एका वृक्षावर एक कपोत पक्षी होता त्याची भार्या प्रातःकाळापासून अरण्यांत संचारार्थ गेली होती. ती सायंकालीं यावी, परंतु न आल्यामुळें रात्रौ तो पक्षी शोक करीत बोलूं लागला कीं, माझी प्रिय भार्या अद्यापि आली नाहीं याचें कारण काय ? अशा वायु-पर्जन्यवृष्टीमध्यें कोणत्या अरण्यांत कशी सुखरूप राहिली असेल बरें ? तिच्यावांचून हें गृह केवल शून्य झालें. गृहिणी जेथें आहे अशा वृक्षाखालीं जरी वास केला तरी तें गृहच समजावें. तिच्यावांचून इंद्रभुवनसदृश जरी मंदिर आहे तरी तें महाअरण्यतुल्य होय. तस्मात् ती आज न येईल तर मी वांचून काय करावें. मी भोजन व स्नान केल्याशिवाय

ती करीत नाहीं, मी संतुष्ट असतां ती संतुष्ट, मी दुःखित असतां ती दुःखित असत्ये. मी ग्रामांतरास गेलों असतां ती दीनवदन होऊन अलंकारादि धारण करीत नाहीं. मी क्रुद्ध झालों असतां ती प्रिय भाषणें करून क्रोध शांत करिते. अशी पतिव्रता व पतीच्या हितावियषीं रत भार्या ज्यास आहे तो पुरुष या पृथ्वीवर परम धन्य होय. विपत्तिकाल प्राप्त झाला असतां भार्येसारखें औषध, धैर्य देणारा व मित्र कोणी नाहीं. तसाच भार्येसमान बंधु, आश्रय व सहाय्य इतर कोणी नाहीं. अशी ज्याची उत्तम साध्वी व प्रियवादिनी भार्या जर गृहीं नसेल तर त्यानें अरण्यवास करावा. ( भारतसार. )

( ३ ) **शेषाचें पृथ्वीधारण.** ( आदिपर्व . अ. ३६. )

महायशस्वी भगवान् शेष नामक नाग गंधमादन पर्वतावर वायुभक्षणादि व्रतपरायण होऊन घोर तप करूं लागला. हें पाहून पितामह ( ब्रह्मदेव ) तेथें येऊन त्यास भाषण करितो. हे शेषा, तूं हें काय करतोस? प्रजेचें कल्याण होईल तें कर, या तीव्र व्रतानें तूं प्रजेस त्रास मात्र देतोस. तर आतां तुझी कामना काय आहे ती सांग, मी पूर्ण करितों. हें ब्रह्मदेवाचें वाक्य श्रवण करून शेष म्हणतो, हे पितामहा, माझे सर्व सहोदर बंधु मंदचित्त आहेत. ते परस्पर शत्रूसारखी असूया करितात; यास्तव त्यांचा मला समागम नको.........हें जाणून मीं तपाचरणानें या कलेवराचा त्याग करण्याचा निश्चय केला आहे. असें केलें असतां मला त्यांचा या लोकीं व परलोकीं समागम होणार नाहीं. हें ऐकून ब्रह्मदेव भाषण करितात, हे शेषा, तुझ्या सर्व

बंधूंचें चेष्टित मी जाणतों. हे शेषा, तुला इच्छित वर असेल तो मी देतो. तुझे ठिकाणीं माझी परम प्रीति आहे. हे पन्नगोत्तमा, दैवयोगें तुझी बुद्धि धर्माचे ठायीं आहे अशीच निरंतर स्थिर राहील. हें श्रवण करून शेष भाषण करितो; हे पितामहा, माझी बुद्धि धर्माविषयीं, शमाविषयीं व तपाविषयीं स्थिर असो. हा माझा इच्छित वर आहे. असें शेषवाक्य श्रवण करून ब्रम्हदेव बोलतात, हे शेषा, या तुझ्या इंद्रियजयानें व मनोजयानें मी संतुष्ट झालों. तूं माझ्या आज्ञेनें प्रजांच्या हितास्तव ही पर्वतसमुद्रासह पृथ्वी ग्रहण करून अचल राहील असें कर. हें श्रवण करून शेष भाषण करितो; हे ब्रह्मदेवा, आपण ज्यापेक्षां मला आज्ञा करितां त्यापेक्षां मी पृथ्वीस निश्चल धारण करीन; परंतु माझ्या मस्तकीं आपण ही पृथ्वी आणून स्थापन करावी. ब्रह्मदेव सांगतात, हे भुजंगा, तूं या पृथ्वीच्या अधोभागीं गमन कर. ही तुला जाण्यास विवर देईल. तूं या पृथ्वीस धारण केलीस ह्मणजे माझें मोठें प्रिय केलें असें होईल. शेषानें असें ब्रह्मदेवाचें वाक्य श्रवण करून आंत प्रवेश केला, आणि समुद्रवलयांकित पृथ्वीस मस्तकावर धारण करितांच ब्रह्मदेव भाषण करितात. हे नागोत्तमा, तूं एकटा ज्यापेक्षां पृथ्वीस धारण करितोस त्यापेक्षां तुला अनंत फणा होतील. जसा मी आणि इंद्र अद्वितीय तसा तूं या पृथ्वीवर अद्वितीय होशील. ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें एकाकी शेष पृथ्वीस धारण करून तिचे अधोभागीं वास करीत असतां त्याचे साहायार्थ ब्रह्मदेवांनीं गरुडास दिला. ( भा० सा० )

**(४) गायींचें महात्म्य.** ( अनुशासनपर्व अ० ८१. )

धर्मराज प्रश्न करितात. "हे भीष्मा, पूर्वी सांगितल्याशिवाय जें पवित्रांमध्यें पवित्र असेल तें सांगा. भीष्म सांगतात. हे धर्मराजा, गायींहून पुण्यकारक व पवित्र त्रैलोक्यांत कांहीं नाहीं; गोधनासारखें पावन करणारें दुसरें पवित्र नाहीं, कारण सर्व भूतांची प्रतिष्ठा, परम आश्रय व पुण्यकारक गायीच आहेत. पूर्वी गायींस शिंगें नव्हतीं तीं आपणांस असावीं म्हणोन गायींनीं ब्रह्मदेवाची उपासना केली. त्या कालीं ब्रह्मदेवानें त्यांस शृंगें दिलीं. जे साधु ब्राह्मणास गोदान करितात ते गोलोकास जातात. तेथें ते अप्सरांशीं क्रीडा करीत रमतात. गायीचें उष्ण मूत्र तीन दिवस, उष्ण दुग्ध तीन दिवस, उष्ण दुग्ध व घृत असें तीन दिवस, तीन दिवस उष्ण घृत व तीन दिवस वायु अशा क्रमानें पंधरा दिवसपर्यंत यांचा आहार करणार पुरुष ब्रह्महत्यासमान पातकांपासून मुक्त होतो. हें गोव्रत करणारा पुरुष पुत्र, धन इ० सर्व मनोरथांस पावतो. तशीच पतीची इच्छा करणारी जी स्त्री तिला सुंदर पति प्राप्त होतो, कारण सेवा करणाऱ्या पुरुषांस व स्त्रियांस गायी संतुष्ट होऊन त्यांचे मनोरथ पूर्ण करितात. ( भा० सा० )

वैदिकधर्म व पौराणिकधर्म यांतील केवढें हें अंतर! ऋग्वेदांत असें सांगितलें आहे कीं, "एकजण पांगळी गायी पाण्यावर हांकून नेत आहे. दुसरा पाण्यांतून काढलेल्या ( गायीच्या ) मांसाचे तुकडे तुकडे करीत आहे. तिसरा संध्याकाळीं ( गायीचा ) पहिला कोठा नेऊन टाकून देतो. ह्याशिवाय पुत्रापाशीं आईबापांनीं आणखी काय मागावें?" ( म्हणजे हीं कर्में पुत्राचीं कर्तव्यें आहेत. ) ( ऋ० अ. २,

सू. १५१, मंत्र. १०.) यावर सायणाचार्य, हा मंत्र गायीच्या यज्ञाविषयीं आहे अशी टीका करितात. (वे० य०) वेदांचीं खंडें ज्या व्यासानें केलीं त्यानेंच जर महाभारत रचलें, तर त्यास भारताच्या काळांत वर सांगितलेल्या वेद-धर्माचा खरोखर विसर पडाला असावा असें म्हटलें पाहिजे.

**(५) म्लेंछ, यवन इत्यादि जातींची उत्पत्ति, व विश्वामित्रराजा ऋषि होण्याचें कारण.**

(आदिपर्व. अ. १७५.)

वसिष्ठऋषीपाशीं इच्छिलेलें काम पूर्ण करणारी अशी कामधेनु होती. तिच्याबद्दल विश्वामित्र राजानें एक अब्ज गाई देतों म्हणून ती मागितली, परंतु ऋषि गाय देईना. मग विश्वामित्र बलात्कारानें तिला घेऊन जाऊं लागला. ते समयीं गाईनें आपलें अंग कंपित करितांच अंगावरील सकल रोमांच उभे राहिले आणि तिच्या पुच्छापासून पन्हव नामक म्लेंछ आणि कासेपासून द्रविड, आणि शक नामक म्लेंछ, योनिदेशापासून यवन, शेपापासून शबर नामक म्लेंछ, मूत्रापासून दुसऱ्या जातीचे शबर, पार्श्वभागापासून पौंड्र, किरात, यवन, सिंव्हल, बरबर, खस, चिबूक, पुलिंद, चिन, केरल, या जातीचे लोक, फेनापासून आणखी कितीएक जातींचे म्लेंछ उत्पन्न केले. ह्या सर्वांनीं विश्वामित्राचें सैन्य पळविलें. तें पाहून तो बोलला कीं, अहो, या क्षत्रियबलास धिक्कार असो. ब्रह्मतेज यासच बल म्हणावें, इतर सर्व बलें व्यर्थ आहेत. नंतर सकलराज्य, श्री, व सर्व भोगांचा त्याग करून तपास आरंभ केला, आणि तपाच्या योगानें ब्राह्मण होऊन तो इंद्रासहवर्त्तमान यज्ञामध्यें सोमपान करूं लागला. (भा० सा०)

---

# खंड ५.—पुराणें.

## प्रकरण १. उपोद्घात.

रामायण व भारत यांच्या मागून पुराणें झालीं. यांत अनेक विषयांचा भरणा आहे. सृष्टीची उत्पत्ति, खगोल-भूगोलसंबंधी ज्ञान, अध्यात्मज्ञान, देवादिकांचे अवतार, देवादानवांचीं युद्धें, राजांच्या कथा, व्रतें, व त्यांच्या उत्पत्तीच्या कथा, दानें, तीर्थें, यज्ञ इत्यादिकांचें वर्णन आहे. पश्चिमेकडील विद्वानांचें असें मत आहे कीं, हीं पुराणें फार अलीकडलीं ह्मणजे एक हजार वर्षांचीं आहेत. त्यांचे कांहीं भाग त्याहून पुरातन असतील, परंतु त्यांचें प्रस्तुतचें रूप फार अर्वाचीन आहे.

पुराणें निरनिराळ्या पंथांचीं आहेत, त्यामुळें प्रत्येक पुराणांत ज्या देवाचें महत्व वर्णिलें आहे तोच मात्र इतर देवांहून थोर, सृष्टीचा उत्पन्नकर्त्ता, परमात्मा, परब्रह्म असा मानिला आहे. सर्व पुराणें अद्वैत मताचीं असून त्यांत सांगितलेली भक्ति वैदिक भक्तीहून फार भिन्न आहे.

पुराणांचे तीन भेद.

जसे वेदाचे सात्त्विक, राजस, वगैरे प्रकार मानिले आहेत, तसेच पुराणांतही तीन भेद आहेत. विष्णु, नारदीय, भागवत, गरुड, पद्म आणि वराह हीं सात्त्विक पुराणें होत. मत्स्य, कूर्म, लिंग, शैव, स्कंद आणि अग्नि हीं तामस; कारण त्यांत तमस—अज्ञान—अंधार हा गुण विशेष आहे. ब्रह्मांड, ब्रह्म वैवर्त्त, मार्कंडेय, भविष्य, वामन व ब्रह्म हीं राजस मानिलीं आहेत. सर्व सात्त्विक पुराणें वैष्णवपंथाचीं आहेत व तामस पुराणें शैवपंथी आहेत, आणि त्या सर्वांचा कर्त्ता व्यास होता असें मानिलें आहे.

त्यांची संख्या. व कर्ता.

पुराणें अठरा आहेत, त्यांचीं नांवें वरच्या यादींत आलींच आहेत. त्यांविषयींचा एक श्लोक येणेंप्रमाणें आहेः—

ब्राह्मंभोरुहंविष्णुशैवभगवत्संज्ञं ततो नारदं ।
मार्कंडेयमथाग्निदैवतमिति प्रोक्तं भविष्योत्तरम् ॥
तस्माद्ब्रह्मविवृत्तसंज्ञमुदितं स्कंदं वराहं तथा ।
लैंगं वामनमत्स्यकूर्मगरुडं ब्रह्मांडमष्टादशम् ॥

त्यांचीं पांच लक्षणें.

प्रत्येक पुराणांत पांच लक्षणें असावीं असें हिंदु ग्रंथकारांचें मत आहे, परंतु तीं लक्षणें विष्णुपुराणाखेरीज कोणत्याही पुराणांत दिसून येत नाहींत; पांचांपेक्षां अधिक विषय प्रत्येक पुराणांत भरले आहेत. पांच लक्षणें तीं येणेंप्रमाणेंः—

१ वस्तुमात्राची मूळ उत्पत्ति. २ दुसरी उत्पत्ति. ३ देवांची व मूळ पूर्वजांची वंशावळी. ४ मन्वंतरें किंवा मनूंचीं राज्यें. ५ सूर्यवंशी व चंद्रवंशी राजांचा इतिहासः—

सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वंतराणि च ।
वंशानुचरितं चैव पुराणं पंचलक्षणम् ॥

सर्व पुराणें संवादरूपानें लिहिलीं आहेत, ह्मणजे एकजण प्रश्न करितो व दुसरा त्यास उत्तर देतो.

पुराणांची योग्यता.

पुराणें वेदाच्या बरोबरीचीं व वेदापेक्षांही प्राचीन आहेत असें त्यांच्या कर्त्यांचें मत आहे.

मत्स्य ३. ३:—

---

१. ह्मणजे पद्म.

पुराणं सर्वशास्त्राणां प्रथमं ब्रह्मणा स्मृतम् ।
नित्यं शब्दमयं पुण्यं शतकोटिप्रविस्तरम् ॥

" ब्रह्मदेवानें सर्व शास्त्रांच्या पूर्वी नित्य, शब्दमय व शंभरकोटि विस्ताराचें पुण्यकारक अशा पुराणाचें स्मरण केलें."

वायु १. ५६:—

" सर्व शास्त्रांच्या प्रारंभीं प्रथम ब्रह्मदेवानें पुराण सांगितलें; नंतर त्याच्या मुखांतून वेद निघाले."

छांदोग्य उपनिषदः—

" पुराण पांचवा वेद आहे."

इतिहासपुराणं पंचमं वेदानां वेदं ३०

( तुकारामाच्या अभंगांसही वारकरी लोक पांचवा वेद ह्मणतात. )

ह्याच वाक्यांत पुराणें वेदांप्रमाणेंच अनादि आहेत असेंही म्हटलें आहे.

वायुः—

" जो कोणी वेद व उपनिषदें जाणतो, तो पुराण जाणल्यावांचून विद्वान् आहे असें म्हणवत नाहीं. यास्तव इतिहास व पुराणें शिकून वेदाध्ययन पूर्ण करावें."

भागवत २. ८. २८:—

" भगवंतानें सृष्टीच्या आरंभकालीं ब्रह्मदेवास भागवत पुराण सांगितलें. तें वेदतुल्य आहे."

प्राह भागवतं नामपुराणं ब्रह्मसंमितं ।
ब्रह्मणे भगवत्प्रोक्तं ब्रह्मकल्प उपागते ॥

ब्रह्मवैवर्त्तपुराण तर आपल्या थोरपणाची यापेक्षांही फार मोठी शेखी मिरवितें. तें ह्मणतें कीं, मी सर्व पुरा-

णांचें सार असून इतर पुराणें व उपनिषदें व वेद यांत ज्या भ्रम उत्पन्न करणाऱ्या गोष्टी आहेत त्यांचें खंडन करणारें आहे:—

पुराणोपपुराणानां वेदानां भ्रमभंजनम् ।

जशी वेदमंत्र जप केल्यानें पुण्यप्राप्ति होते तशीच पुराणपठण किंवा श्रवण किंवा दान केल्यानें बहुत पुण्यप्राप्ति व उत्तम गति होते, असें प्रत्येक पुराणांत सांगितलें आहे:—

पुराण पठणाचें व श्रवणाचें फळ.

"जो कोणी हें (विष्णु) पुराण नित्य श्रवण करितो तो पितर, देव व मनुष्य यांच्या ऋणापासून मुक्त होतो."

पितृयज्ञमनुष्येभ्यः समस्तामरसंस्तुतिः ।
कृता तेन भवेदेतद्यः शृणोति दिने दिने ॥ (वि. पु. अं. ६, अ. ८.)

ब्रम्हवैवर्त्तपुराण दान दिल्याचें फळ:—

पुराणं ब्रह्मवैवर्त्तं यो दद्यान्माघमासि च ।
पौर्णमास्यां स भवनं ब्रह्मलोके महीयते ॥

पुराणदानाचें फल.

"जो कोणी ब्रम्हवैवर्त्तपुराण माघमासीं दान देतो तो ब्रम्हलोकाप्रत जातो."

उपपुराणें.

हीं अठरा आहेत, त्यांचीं श्लोकबद्ध नामें येणेंप्रमाणें:—

गणेशं नारदीयं च नारसिंहं च कापिलम् ।
नांदिकेयं च वारुण्यं दौर्वाससमथांबिकम् ॥
कालिकेयं च मारीचं औशानशं च भार्गवम् ।
माहेश्वरं च सौरं च पाराशर्यं च मौद्गलम् ॥
सनत्कुमारकं चैव कौमारं च प्रजापते ।
अष्टादश पुराणानि कथितानि समासतः ॥

## प्रकरण. २
## पुराणांतील वेंचे.
### (१) सृष्ट्युत्पत्ति.

कल्पाच्या आरंभीं ब्रह्मदेव सृष्टिचिंतन करीत असतां आरंभीं अबुद्धि (अज्ञान) उत्पन्न झालें, तें अंधकारमय होतें. त्यापासून पांच प्रकारचें अज्ञान झालें. तें तमस्, मोह, महामोह, तामिस्र (अंधार), अंधतामिस्र (केवळ अंधकार) असें होतें; याप्रमाणें सृष्टीचा स्रष्टा ध्यानांत निमग्न असतां तो पंचविध स्थावररूप उत्पत्ति होता. ती (उत्पत्ति) निर्बुद्ध, अप्रकाशक, बधिर, अगमनात्मक (अचल) होती. याप्रमाणें स्थावर पदार्थ प्रथम उत्पन्न केले ह्मणून त्यांस **मुख्य सर्ग** (पहिली उत्पत्ति) ह्मटलें आहे. ब्रम्हदेवानें ही उत्पत्ति अपुरी (उणी) आहे असें पाहून दुसरी करण्याचें योजिलें; आणि तो चिंतन करीत असतां **तिर्यक्स्रोतस्** सृष्टि (ज्यांच्या पोटांतील नळ वांकडा आहे असे प्राणी) प्रगट झाली. त्यांस पश्वादि ह्मणतात. त्यांचा गुण तामस (अंधार) आहे. त्यांस ज्ञान नाहीं, ते अनावर, ते भ्रमाला ज्ञान समजतात, ते अहंकृत व अभिमानी आहेत. ते अठ्ठावीस प्रकारच्या बंधानें (खोडीनें) वेष्टित आहेत, त्यांस अंतरीं इंद्रियज्ञान आहे. ते आपापल्या जातीशीं व्यवहार करितात. हीही उत्पत्ति अपुरी पाहून ब्रम्हदेवानें आणखी ध्यान केलें; मग **ऊर्ध्वस्रोतस्** नामक सात्त्विक गुणाची तिसरी सृष्टि प्रगट झाली. ह्या सृष्टींत जे प्राणी उत्पन्न झाले त्यांस सुख व प्रीति असून ते आंतून बाहेरून अनावृत

(मोकळे), अंतर्बाह्य प्रकाशित असे होते. ही **देवसर्ग**-नामक सृष्टि ब्रह्मदेवाचें तिसरें कृत्य होतें. ती पाहून तो जरी संतुष्ट झाला तरी तीही अपुरी होती असें त्याला दिसून आलें. यास्तव आणखी ध्यान केल्यावर त्याच्या सत्यसंकल्पापासून **अर्वाक्स्रोतस्** नामक सृष्टि उत्पन्न झाली. त्यांच्या अन्नाशयाचा मार्ग खालचा आहे. त्यांस ज्ञानाचा प्रकाश बहुत आहे, तरी तमाचें आणि रजोगुणाचेंही त्यांजमध्यें आधिक्य आहे. यास्तव त्यांस बहुत दुःख होतें व ते वारंवार कर्म करायास प्रवृत्त होतात. त्यांस अंतर्बाह्य ज्ञान आहे व ते आपल्या उत्पत्तीचा अर्थ (आत्म्याची मुक्ति) साधायास साधक आहेत. हे प्राणी मनुष्य होत. (वि०पु० अंश १. अ०५.)

(२) ब्रह्मांड.

सृष्टि ब्रह्मांडापासून उत्पन्न झाली असेंही हिंदुमत आहे. ह्या अंडाचें वर्णन विष्णुपुराण (अं० १. अ० २), लिंगपुराण (१. ३), भागवत (३. २०) इ० ग्रंथीं केलें आहे. त्याचा सारांश असा आहे कीं, महत्, अहंकार, प्रधान इ० तत्त्वांपासून हें अंड उत्पन्न झालें. तें सुवर्णाचें असून जलावर तरंगत होतें. त्यांत ईश्वर (ह्मणजे निरनिराळ्या पुराणांच्या मतें ब्रह्मा, रुद्र किंवा विष्णु) एक सहस्र वर्षेंपर्यंत होता, त्याच्या नाभीपासून कमल झालें, तें सकळ जीवांचें वासस्थान होतें. त्यांत स्वराट् (ब्रह्मा) हाही स्वतां जन्मला. त्या ब्रह्मदेवामध्यें जलाशयावर शयन करणारा भगवान् यानें प्रवेश करून (अथवा तें भेदून किंवा क्षोभित करून) आपल्या सत्त्वापासून त्यानें सकल लोक निर्माण केले. (भागवत.)

परंतु शतपथब्राह्मणांत प्रजापतीनें अनेक अंडें केलीं व त्यांपासून अनेक सृष्टि झाली असें सांगितलें आहे. "प्रजापतीनें अनेक स्त्रियांस भोग दिला. अग्नीच्या द्वारें पृथ्वीशीं संभोग केल्यानें एक अंडें उत्पन्न झालें, त्यापासून वायु झाला. वायूच्या द्वारें अंतरिक्षाशीं संग केला तेव्हां आणखी एक अंडें उत्पन्न झालें. याप्रमाणें त्यानें सात अंडें केलीं, व त्या सातांपासून त्याला संतति झाली." श. ब्रा ६: १, २, ६.

**( ३ ) यज्ञाविषयीं पौराणिक ऋषींचें मत.**

" त्या कालीं सर्व ऋत्विज त्या श्रेष्ठ कर्मांत स्वकर्माविषयीं प्रवृत्त असून होम करणारा अग्नींत अनेक प्रकारचे होमद्रव्यांचा देवांच्या उद्देशानें होम करीत असतां, तेथें देव आले; तेव्हां सामवेदाचें गायन करणारे सुस्वरानें गायन करूं लागले; ते समयीं अध्वर्यूच्या हाताखालचे त्वरायुक्त पुरुष पशूंस मारण्याविषयीं प्रवृत्त होऊन त्यांनीं ते यज्ञाचे पशु मारले असतां, मन आदिकरून सर्व इंद्रियांस प्रेरणा करणारे जे देव ते यज्ञांतील भाग ग्रहण करणारे आहेत; ते देव नंतर त्या कालीं यज्ञार्थ बोलावून तेथें आले असतां जे प्रतिकल्पाचे आरंभीं इंद्राचें सहाय्य करणारे देव असतात ते त्या देवांचें यजन करतात, नंतर अध्वर्यूनें प्रेषोच्चार करण्याचे समयीं ते सर्व महर्षि उठले. आणि आर्तस्वरानें ओरडणाऱ्या त्या पशूंच्या समुदायास पाहून ते दयाळु ऋषि त्या कालीं त्रैलोक्यराज इंद्रास विचारूं लागले कीं, हे इंद्रा, हा तुझे यज्ञाचा विधि कसा आहे ? हे देवोत्तमा इंद्रा, या तुझ्या यज्ञांत धर्माच्या इच्छेनें ही दीन पशूंची हिंसा चालली आहे हा महाबलिष्ठ अधर्म

आहे; तस्मात् पशु मारण्याचा हा विधि तुझे यज्ञांत आम्हांस इष्ट नाहीं. हे इंद्रा, त्वां धर्माच्या नाशार्थ पशु मारून हा अधर्म आरंभला आहेस, हा कांहीं धर्म नव्हे; तर हा अधर्मच आहे; कारण शास्त्रांत हिंसेस धर्म असें म्हणत नाहींत. तस्मात् तूं धर्म करण्यास इच्छीत असशील तर वेदाचे प्रमाणानें धर्माचें आचरण कर. हे देवश्रेष्ठा, ज्या धर्मांत इतरांस दुःख नाहीं अशा शास्त्रविधियुक्त यज्ञाचे विधीनें धर्म, अर्थ व काम यांचे साधनास कारण अशा यज्ञोपयोगी धान्याचे बीजांनीं यज्ञ कर. हे इंद्रा, हाच यज्ञ महान् श्रेष्ठ असें पूर्वी ब्रम्हदेवानें सांगितलें आहे; याप्रमाणें तत्त्वज्ञानी ऋषींनीं सांगितलें तरी तो त्रैलोक्यराज इंद्र, गर्व व अविचार यांनीं युक्त होता; त्यामुळें त्यानें त्या ऋषींचें मत मानिलें नाहीं. तेव्हां तेथें इंद्र व महर्षि यांचा मोठा विवाद उत्पन्न झाला; तो असा कीं, जंगम ( पशु ) स्थावर ( धान्यबीजें ) यांत कोणते द्रव्यानें यज्ञ करावा.

" नंतर ते ऋषि वादशक्तीनें समर्थ असूनही त्या वादानें खिन्न ( श्रमी ) होऊन इंद्राशीं मध्यस्थाचे द्वारानें निर्णय करण्याचा संकेत करून त्याविषयीं उपरिचर वसुराजास विचारितात. ऋषी बोलले, उत्तानपादवंशस्था, महाबुद्धिमंता, समर्था, उपरिचर वसुराजा, त्वां वेदशास्त्रांत यज्ञाचा विधि कसा पाहिला आहेस, तो सांगून आमचा संशय दूर कर. असें तें ऋषींचें वाक्य श्रवण करून तो उपरिचर वसु त्यांस बोलूं लागला. तो राजा बोलला कीं, मुंज झालेल्या ब्राह्मणांनीं जसा अवश्य यज्ञ करावा; तसेंच शुद्ध पशु किंवा फळें व मुळें यांनीं यज्ञ करावा. ऋषिहो, हिंसा हा

यज्ञाचा स्वभावच आहे; असें माझ्या पहाण्यांत आहे; तसेंच यज्ञाचे मंत्रांतही पशुहिंसा करण्याचींच लिंगें आहेत; असें दीर्घ तप करणारे असून सर्व नक्षत्रादिकांस ज्ञानदृष्टीनें प्रत्यक्ष पहाणारे ऋषि जाणतात; या प्रमाणावरून म्यां सांगितलें; तस्मात् आतां तुम्ही या वादापासून शांत होण्यास योग्य आहांत. ब्राह्मणहो, आपलीं वेदवाक्यें जर तुम्हांस प्रमाण आहेत तर जसें वेदवाक्यांचें प्रमाण आहे तसा तुम्हीं यज्ञ प्रवृत्त करावा; परंतु अन्यथा भाषण न करावें. असें त्या मध्यस्थ उपरिचर वसुराजानें उत्तर केल्यावर त्या ऋषींनीं ध्यानयोगानें पुढें अवश्य होणारें तें भविष्य जाणून त्या कालीं त्या उपरिचर वसुराजास तूं खालीं पड असा शाप दिला, नंतर तो राजा पूर्वी असा आकाशमार्गांत संचार करीत असून तसें ऋषींचे मुखांतून शापवज्र निघतांच त्यानें तो राजा रसातळांत प्रवेश करिता झाला. वसुराजा धर्मांचे विचारांत संशयच्छेद करणारा असून तो ऋषींच्या शापवाक्यानें खालीं जाऊन भूतलावर संचार करूं लागला." (मत्स्यपु० अ० १४२).

वरील संवादांत इंद्रानें किंवा वसुराजानें ह्या पौराणिक ऋषींच्या समाधानार्थ पशुयज्ञाविषयीं वेदांतील प्रमाणें द्यायाचीं होतीं. वैदिक इंद्रानें एकदां १,००० रेडे खाल्ले असें ऋग्वेदांत सांगितलें आहे; तें प्रमाण त्यानें आपल्याशीं वाद करणारापुढें ठेविलें असतें तर कदाचित् ते कुंठित झाले असते. हे पशु त्याला कोणीं भक्तानें यज्ञद्वारेंच अर्पण केले असतील !

यदि प्रवृद्ध सत्पते सहस्र महिषां अघः ।
आदित्त इंद्रियं महि प्र वावृधे ॥
(ऋग्वे. मंडल ८. सूक्त १२. मंत्र ८.)

### (४) कर्मयोग.

"कर्मयोगापासून उपन्न झालेल्या ज्ञानानेंच मोक्षपदाची प्राप्ति होते. कर्मयोगास आश्रयभूत वेद हेंच सर्वांचें मूल धन आणि वेदांनीं सांगितलेला आचारच सर्वांस हित-कारक आहे. कर्मयोगांत आत्म्याचे आठ गुण मुख्यत्वें सांगितले आहेत, ते असे कीं, सर्वभूतीं दया, सुखदुःखादि द्वंद्वें सहन करणें, दुःखिताचें रक्षण, लोकांचे गुणावर दोष-बुद्धि न करणें, मन व देह यांची प्राणायामांनीं व मृत्तिका-जलांनीं शुद्धि करणें, सर्व कार्यांत विशेष आयास न होतां मांगलिक आचाराचें सेवन करणें, पीडित झालेले व आपले आश्रित यांजविषयीं द्रव्याचा कृपणपणा न करणें, तशीच निरंतर परधन आणि परास्त्रिया यांची इच्छा न धरणें, हे आठ आत्म्याचे गुण पुराणार्थाच्या ज्ञात्यांनीं सांगितले आ-हेत. भूलोकीं कर्मावांचून कोणासही ज्ञान होत नाहीं, म्हणून श्रुतिस्मृतींनीं जो धर्म सांगितला तो अवश्य प्रयत्नानें आचरावा. कांडणें, दळणें, चूल पेटविणें, उदक आणणें, झाडणें, यांपासून गृहस्थाश्रम्यास पंचसूना दोष लागतो, यामुळें त्याचा स्वर्गास जाण्यास प्रतिबंध होतो, म्हणून त्यानें पंचसूनादोषपरिहारार्थ वेदांनीं सांगितलेले पंच महायज्ञ नित्यशः करावे." (मत्स्यपु० अ० ५२.)

### (५) मेरुपर्वत व जंबुनदी.

"मेरुपर्वत शिरस्थानीं बत्तीस सहस्र योजनपरिमित वि-

स्तीर्ण व मूलप्रदेशीं षोडश सहस्र योजनें विशाल असून सोळा हजार योजनें भूमींत प्रविष्ट आहे, व बाहेर चवऱ्यांशीं हजार योजनप्रमाणानें उंच दिसतो.

"मंदरगिरीच्या शिखराकर जंबूफळें (जांबळें) अतिउच्च प्रदेशापासून पतन पावण्यानें फुटतात, तीं अतिसूक्ष्म बीज-युक्त व गजदेहसदृश (हत्तीसारखीं) स्थूल असून त्यांच्या रसानें झालेली जंबूनामक नदी मेरुमंदर पर्वताच्या दशसहस्र योजनपरिमित उच्च शिखरावरून भूतलावर पडत असून तेथून आपल्या दक्षिणेकडे सर्व इलावृत खंडास व्याप्त करून वाहत आहे. तितक्या सर्व प्रदेशांतील त्या जंबूनदीच्या उभयतीरचे प्रदेशसंबंधीं जी मृत्तिका आहे ती त्या जंबूफलरसानें आर्द्र (ओली) होऊन तिचें वायु व सूर्य यांच्या संयोगजन्य परिणामानें जांबूनदनामक सुवर्ण होतें, तें सर्वदा अमरलोकांचें धारण करण्याचें भूषण आहे. यास्तव तें देवादिक स्वकीय स्त्रियांसहवर्तमान या नदीतीरीं येऊन मुगुट, कडीं, तोडे व कटिसूत्र इ० अनेक प्रकारच्या रूपानें निश्चयेंकरून धारण करितात." (भाग० स्कं० ५. अ० १६.)

**(६) इंद्र आणि दुर्वासऋषि.** (वि० पु० अंश १ अ० ९).

"एकदां शंकराचा अंश दुर्वास पृथ्वीवर संचार करीत असतां त्यानें विद्याधरीच्या हातांत एक पुष्पमाला पाहिली. ती स्वर्गींच्या वृक्षांवरून पुष्पें गोळा करून गुंफिलेली होती. त्या फुलांचा गंध वनभर पसरला होता, आणि त्याच्या छायेस बसणाऱ्यांस तो आल्हादित करीत असे. त्या काळीं दुर्वास ऋषि उन्मत्तव्रत पालन करीत होता. (ह्या व्रता-

विषयीं टीकाकार असें म्हणतो कीं, जे हें व्रत धारण करितात ते योगी असले तरी पिशाच्च होतात—योगिनो हि जडोन्मत्तपिशाचा इव वर्त्तंते. ) अशा स्थितींत त्यानें त्या सुंदर व विशालाक्षी अप्सरेपाशीं ती माला मागितली, ती तिनें त्याला नमन करून तत्क्षणीं दिली. ऋषीनें ती उन्मत्ताप्रमाणें आपल्या मस्तकावर ठेवून चालता झाला. मार्गांत त्याला त्रैलोक्यनाथ इंद्र ऐरावतावर बसून देवांसह चाललेला भेटला. त्याला पाहून त्या उन्मत्त मुनीनें ती माला त्याकडे फेंकली, ती त्यानें झेलून आपल्या हत्तीच्या गंडस्थलावर ठेविली. तेथें ती कैलासाच्या शिखरावर जशी जान्हवी ( नदी ) चमकते, त्याप्रमाणें चमकूं लागली. तो हत्ती मदांध झालेला असून त्या पुष्पांच्या वासानें मोहित झाला. त्यानें ती माला आपल्या सोंडेनें धरून भूमीवर टाकली. आपल्या मालेचा असा अपमान झाला असें पाहून दुर्वास क्रोधायमान होऊन देवांच्या राजाप्रत येणेंप्रमाणें बोलला:—“अरे दुष्टात्म्या, ऐश्वर्याच्या मदानें उन्मत्त होऊन तूं जिच्या ठायीं श्री ( लक्ष्मी ) वास करिते अशी माला मीं तुला दिली असतां तिचा तूं मदानें अपमान केलास. तूं ती प्रसाद मानून घेतली नाहींस, तूं मला प्रणिपात केला नाहींस, ती तूं हर्षानें प्रफुल्लितवदन होऊन मस्तकीं धारण केली नाहींस; तर आतां हे मूर्खा, मीं दिलेल्या मालेचा बहुमान केला नाहींस ह्मणून तुझ्या त्रैलोक्यींच्या राज्याचा विनाश होईल. तूं मला दुसऱ्या ब्राह्मणाप्रमाणें समजून माझा अपमान केलास. तर आतां ज्याप्रमाणें मीं दिलेली माला तूं भूमीवर टाकलीस त्याप्रमाणें तुझे त्रैलोक्यावरील अधिकार नष्ट होतील. हे दे-

वराजा, ज्याच्या कोपाला सर्व प्राणिमात्र भितात, त्या मला तूं आपल्या गर्वानें कोपित केलें आहेस."

हें भाषण ऐकून महेंद्र (इंद्र) हत्तीवरून त्वरेनें खालीं उतरला, आणि त्या निष्पाप (?) दुर्वासास शांत करूं लागला. त्यानें त्याला प्रणिपात केला व त्याची क्षमा मागितली; परंतु त्या मुनीनें त्याला हेंच उत्तर दिलें कीं, " मी कृपालु अंतःकरणाचा नाहीं, क्षमा करणें हा माझा स्वभाव नाहीं. दुसऱ्या मुनींस दया येईल. परंतु हे शक्रा (इंद्रा) मी दुर्वास आहें बरें, असें पक्कें जाण. मला कधीं पस्तावा होत नाहीं. वसिष्ठासारख्या कोमलांतःकरण मुनींच्या मुखस्तुतीनें तुला इतका दिमाख आला कीं, तूं माझा मानभंग केलास. क्रोधमुद्रेनें काळें झालेलें व पिंजारलेल्या जटांनीं वेष्टिलेलें असें माझें मुख पाहून थरथरां कांपणार नाहीं असा त्रिभुवनांत कोण आहे? आणखी बोलण्याचें काय प्रयोजन आहे? तूं कितीही नम्रतेचें सोंग दाखविलेंस तरी मी क्षमा करणार नाहीं."

असें बोलून तो ब्राह्मण चालता झाला. नंतर असें झालें कीं, त्रिभुवन व इंद्र यांची शक्ति निघून गेली. सर्व वनस्पति व झाडें व औषधी हीं वाळून मरून गेलीं. यज्ञ बंद झाले. धर्माचरण, तप, दान, धर्म हीं बंद झालीं; सर्व प्राणी निःसत्व झाले. सर्व लोकांचीं इंद्रियें लोभानें व्यापलीं; आणि त्यांच्या वासना अल्प वस्तूंचा अभिलाष करण्याकडे लागल्या.

### दुर्वासाच्या भाषणाचें मूळः—

"ऐश्वर्यमददुष्टात्मन्नतिस्तब्धोऽसि वासव ॥
श्रियो धाम स्रजं यस्त्वं मद्दत्तां नाभिनंदसि ॥ १३ ॥

प्रसाद इति नोक्तं ते प्रणिपातपुरःसरम् ॥
हर्षोत्फुल्लकपोलेन न चापि शिरसा धृता ॥ १४ ॥
मया दत्तामिमां मालां यस्मान्न बहु मन्यसे ॥
त्रैलोक्यश्रीरतो मूढ विनाशमुपयास्यति ॥ १५ ॥
मां मन्यसेऽन्यैः सदृशं नूनं शक्र भवान् द्विजैः ॥
अतोऽवमानमस्माकं मानिना भवता कृतम् ॥ १६ ॥
मद्दत्ता भवता यस्मात् क्षिप्ता माला महीतले ॥
तस्मात्प्रनष्टलक्ष्मीकं त्रैलोक्यं ते भविष्यति ॥ १७ ॥
यस्य संजातकोपस्य भयमेति चराचरम् ॥
तत्त्वं ममातिगर्वेण देवराजाऽवमन्यसे ॥ १८ ॥
महेंद्रो वारणस्कंधादवतीर्य त्वरान्वितः ॥
प्रसादयामास मुनिं दुर्वाससमकल्मषम् ॥ १९ ॥
प्रसाद्यमानः स तदा प्रणिपातपुरःसरम् ॥
प्रत्युवाच सहस्राक्षं दुर्वासा मुनिसत्तमः ॥ २० ॥
नाहं कृपालुहृदयो न च मां भजते क्षमा ॥
अन्ये ते मुनयः शक्र दुर्वाससमवेहि माम् ॥ २१ ॥
गौतमादिभिरन्यैस्त्वं गर्वमापादितो मुधा ॥
अक्षांतिसारसर्वस्वं दुर्वाससम० ॥ २२ ॥
वसिष्ठाद्यैर्दयासारैः स्तोत्रं कुर्वद्भिरुच्चकैः ॥
गर्वं गतोऽसि येनैवं मामप्यद्यावमन्यसे ॥ २३ ॥
चलज्जटाकलापस्य भृकुटीकुटिलं मुखम् ॥
निरीक्ष्य कस्त्रिभुवने मम यो न भयं गतः ॥ २४ ॥
नाहं क्षमिष्ये बहुना किमुक्तेन शतक्रतो ॥
विडंबनामिमां भूयः करोष्यनुनयात्मिकाम् ॥ २५ ॥

ज्या इंद्राला प्राचीन आर्यऋषि अत्यंत मोठा मान देत, ज्याचें ते फार भय धरीत, व ज्यापासून सर्व कल्याणकारक वस्तु मिळण्याची आशा बाळगीत, त्या इंद्राचा ह्या स्थळांत केवढा उपमर्द, निर्भर्त्सना, व हेटाळणी केली आहे? आणि

जे ऋषि वैदिक कालांत क्षुल्लक संसारिक सुखाकरितां देखील दीन दुर्बळाप्रमाणें आपल्या दैवतांपाशीं याचना करीत, जे वाबटुळीला देखील भीत व आपलीं मेंढरें, गुरें राखण्याविषयीं प्रार्थना करीत, त्यांचे वंशज पौराणिक कालामध्यें इतके समर्थ व पराक्रमी झाले कीं, त्यांच्या शापानें इंद्राचें त्र्यैलोक्यींचें राज्य देखील नष्ट झालें !! वैदिक धर्माच्या गोष्टींची एथें पुनरावृत्ति करायाची नाहीं, तरी वरील उताऱ्याच्या संबंधानें वेदांतील इंद्राविषयींचीं कांहीं वचनें एथें दाखविल्यानें हिंदुलोक आपला धर्म व आपले देव कसे बदलत आले व ब्राह्मणांनीं त्यांस आपल्या पूर्ण अखत्यारांत कसें आणिलें हें स्पष्ट रीतीनें समजेल:—

"हे इंद्रा, तुला ऋत्विग्जन स्तुतींनीं आणि स्तोत्रांनीं स्तवीत आले आहेत." "इंद्र या जगाचा प्राचीन काळापासून एकला प्रभु होय." (ऋ० मंडल ४. अ० २. सू० ५१.) "इंद्र एकटाच सर्व भुवनांला कांपवितो." "प्रजांचा पुरुहूत राजा इंद्र, त्याला सर्वजण स्तवितात." (४. २. १७.)

"हे इंद्रा, तूं महान् होस. तुझ्या मोठेपणामुळें पृथ्वी, द्यू हे तुझा अधिकार मान्य करिते झाले."

"गर्विष्ठ शत्रूचें हनन करणारा जो इंद्र त्याला तूं स्तव." (३. ४, ९१.)

आणि आतां पौराणिक काळांत "ब्राह्मण काय तो जगताचा प्रभु" "त्याचा अधिकार सर्वांनीं मान्य केला पाहिजे." "तो सर्व भुवनांला कांपवितो" अशीं स्तोत्रें गाइलीं पाहिजेत. ब्राह्मणानें इंद्राला हत्तीवरून खालीं उतरायास लाविलें ! ब्राह्मणानें इंद्राला मूर्ख व अधम ह्मटलें ! ब्राह्मणानें

इंद्राचें त्रैलोक्यावरील प्रभुत्व नष्ट केलें! ब्राह्मणाच्या शापानें सर्व लोक निःसत्व झाले! आणि उन्मत्त, उद्धट व अन्यायी असा जो दुर्वास ऋषि त्याला पुराणकर्त्ते "पवित्र" ह्मणतात!

**(७) महादेवाची उत्पत्ति.** (मार्कंडेय पु० अ० ५२.)

कल्पाच्या आरंभीं प्रभु (ब्रह्मा) आपणासारिखा पुत्र व्हावा असें ध्यान करीत असतां त्याच्या मांडीवर नील व लाल रंगाचा असा एक मुलगा प्रगट झाला. तो इकडे तिकडे धांवून रडूं लागला. तेव्हां ब्रह्मा त्याला ह्मणाला, तूं कां रडतोस? तो ह्मणाला, 'हे जगत्पति, मला नांव दे.' ब्रह्मा.—हे देवा, तुला रुद्र ह्मणतील, रडूं नको. धीर धर. असें ह्मटल्यावर तो मुलगा पुनः सात वेळ रडला. तेव्हां प्रभूनें त्याला आणखी सात नांवें ठेविलीं तीं येणेंप्रमाणें:—भव, सर्व, ईशान, पशुपति, भीम, उग्र, महादेव.

कल्पादावात्मनस्तुल्यं सुतं प्रध्यायतः प्रभोः ॥
प्रादुरासीदथाङ्केऽस्य कुमारो नीललोहितः।
रुरोद सुस्वरं सोऽथ द्रवंश्च द्विजसत्तम ॥
किं रोदिषीति तं ब्रह्मा रुदन्तं प्रत्युवाच ह।
नाम देहीति तं सोऽथ प्रत्युवाच जगत्पतिं ॥
रुद्रस्त्वं देव नाम्नासि मा रोदीर्धैर्यमावह।
एवमुक्तस्ततः सोऽथ सप्तकृत्वो रुरोद ह।
ततोऽन्यानि ददौ तस्मै सप्त नामानि वै प्रभुः ॥
भवं सर्वं तथेशानं तथा पशुपतिं प्रभुः।
भीममुग्रं महादेवमुवाच स पितामहः ॥ (२–७)

---

## प्रकरण ३.

### त्रिमूर्ति.

वैदिक त्रिमूर्ति

पुराणादि अर्वाचीन ग्रंथांत जें त्रिमूर्तींचें वर्णन केलें आहे तें जरी वेदांत सांपडत नाहीं, तरी त्रिमूर्तींची कल्पना फार प्राचीन आहे असें दिसून येतें. वेदांत जे ३३ देव सांगितले आहेत त्यांची संख्या ३ ला ११ नें गुणून केली आहे. ( त्रिभिरेकादशैरिह देवेभिर्यातं ॥ ऋ० १. ३४. ११. ) इंद्र, अग्नि व सूर्य ह्या वेदांतील त्रिमूर्ति आहेत. परंतु पुढें त्यांचें महत्त्व नष्ट होऊन त्यांच्या स्थानीं ब्रह्मा विष्णु व शिव ह्या त्रिमूर्ति आल्या. यांची उत्पत्ति ओंकाररूप जें ब्रह्म त्यापासून आहे असें हिंदु ग्रंथांत सांगितलें आहे; अ ह्मणजे विष्णु, उ ह्म० शिव, म ह्म० ब्रह्मा. अव्यक्त जें ब्रह्म त्याला लीला ( खेळ ) करण्यासाठीं ( प्रगट ) होण्याची इच्छा झाल्यावरून तें ह्या तीन रूपांनीं प्रगट झालें. कित्येकांच्या मतें हे तीन देव केवळ तीन गुण आहेत:—

रजो ब्रह्मा तमो रुद्रो विष्णुः सत्त्वं जगत्पतिः ।
अत एव त्रयो देवास्तत एव त्रयो गुणाः ॥ ( मार्कंडेयपु० )

मत्स्यपुराण ३. १६:—

गुणेभ्यः क्षोभमाणेभ्यस्त्रयो देवा विजज्ञिरे।
एकमूर्तिस्त्रयोभागा ब्रम्हाविष्णुमहेश्वरः ॥

" त्रिगुण क्षुब्ध झाले, त्यापासून तीन देव झाले; ते एक एक मूर्ति असून त्यांत, ब्रह्मा, विष्णु, शिव हे तीन भाग आहेत."

**(१) पौराणिक त्रिमूर्तींची उत्पत्तिः**--(वायु पु० अ० ६.)

दिवसांच्या आरंभीं परमेश्वर (महादेव) प्रकृतीपासून

संभवला, आणि अंड्यांत प्रवेश करून प्रधान ( प्रकृति ) व पुरुष यांस क्षोभित केलें. प्रधान क्षोभित केल्यावर त्यापासून रजोगुण उत्पन्न झाला. आणि जसें बीजांत जल प्रवृत्तक कारण असतें तसा तो त्यांत होता. जेव्हां गुणांत वैषम्य ( कमीजास्तीपणा ) उत्पन्न होतें तेव्हां त्यावरील अधिष्ठित देवता उत्पन्न होतात; याप्रमाणें क्षोभ पावलेले तीन गुणांपासून तीन देव उत्पन्न झाले. राजसगुण ब्रह्मा होऊन जन्मला, तमोगुण अग्नि झाला, ( ह्यालाच मार्कंडेय पुराणांत रुद्र ह्मटलें आहे. ) व सत्त्वगुण विष्णु झाला. हे तीन देव परस्परांस आधार आहेत. ते परस्परांशीं वागतात. त्यांचा क्षणमात्र वियोग होत नाहीं. ईश्वर ( महादेव ) हा परमेश्वर आहे. आणि विष्णु महतापेक्षां (बुद्धीपेक्षां) श्रेष्ठ आहे. ब्रह्मा रजोगुणसंपन्न असतां उत्पत्ति करावयास प्रवृत्त होतो.

त्रिमूर्तींचें आयुष्य.

ब्रह्मा, विष्णु, शिव हे जसे उत्पन्न झाले तसे ते नाशही पावतात. त्यांस आयुष्य आहे व तें सरलें ह्मणजे त्यांचा लय होतोः—

ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च सर्वा वा भूतजातयः।
नाशमेवानुधावंति सलिलानीव वाडवम् ॥ योगवासिष्ठ ॥

**अर्थ.**—ब्रह्मा, विष्णु, रुद्र हे सर्व पृथ्वीसुद्धां लय पावण्याचे लागास आले आहेत इ०.

स्कंद पुराणांत ब्रह्मदेवाची उत्पत्ति येणेंप्रमाणें सांगितली आहेः—

शिव विष्णूला ह्मणतो, "जेव्हां पहिला ब्रह्मा मरण पावला तेव्हां मी तुजजवळ येऊन तुजला सुखमय भोग दिला. तेव्हां तूं माता ( गरोदर ) होऊन आपल्या नाभीच्या

द्वारें प्रस्तुतच्या ब्रह्मास प्रसवलास नाहीं काय ?" ( त्रिमूर्तींचा इतिहास, सि. एल. सोसैटी, पृ० १९. )

कल्प.

ब्रह्मदेवाचें आयुष्यमान येणेंप्रमाणें आहेः—चार युगांचा ( ४३,२०,००० वर्षांचा ) एक पर्यय ( चौकडी ) असे सहस्र पर्यय झाले ह्मणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस ( प्रातःकालापासून सायंकालपर्यंत; ह्मणजे मनुष्याचीं ४ अब्ज ३२ कोटी वर्षें ) होतो. इतकीच पुढें रात्र. याप्रमाणें एक जें अहोरात्र त्यास **कल्प** ह्मणतात. या मानानें तीस दिवसांचा एक महिना व बारा महिन्यांचें एक वर्ष अशीं ब्रह्मदेवाचीं शंभर वर्षें झालीं ह्मणजे शिवाचा एक दिवस होतो. शिवाचीं शंभर वर्षें झालीं ह्मणजे विष्णूचा एक निमेष होतो. ( निमेष ह्मणजे नेत्राच्या पापण्या उघडमीट करण्यास जो काळ लागतो तो. )

तीन प्रकारचे प्रलय.

विष्णुपुराणांत तीन प्रकारचे प्रलय सांगितले आहेत, ह्मणजे नैमित्तिक, प्राकृतिक व आत्यंतिक. पहिला प्रलय प्रत्येक कल्पाच्या शेवटीं होतो, त्यांत सर्व प्राणिमात्र नाश पावतात. दुसरा ब्रह्मदेवाच्या आयुष्याच्या शेवटीं होतो, त्यांत सर्व तत्त्वें प्रकृतिमय होतात. आणि आत्यंतिक प्रलयांत सर्व कांहीं मोक्ष पावून आत्मरूप होतें. ( वि. पु. अं. ६. अ. ३. )

### ( २ ) त्रिमूर्तींची परीक्षा.

"सर्व देवांत श्रेष्ठ कोण असा ऋषिसभेंतील विचारांत संशय आल्यावरून त्या विचाराचे निर्णयार्थ ब्रह्मपुत्र भृगु ऋषीस त्यांनीं पाठविलें. तो प्रथम ब्रह्मदेवाच्या सभेस गेला, तेथें त्यानें नमस्कारपूर्वक ब्रह्मदेवाची स्तुति केली नाहीं. तेव्हां ब्रह्मदेव त्यावर रुष्ट झाले; नंतर तो कैलासास गेला, तेथें

त्याला शिव आलिंगन देण्यास उठला असतां, तूं उन्मार्गवृत्ति आहेस यास्तव मी तुझें आलिंगन इच्छित नाहीं असें ह्मणाला. तें ऐकून शिव क्रुद्ध होऊन त्याला त्रिशूल घेऊन मारण्यास उद्युक्त झाला. नंतर तो मुनि वैकुंठास गेला. तेथें विष्णु लक्ष्मीच्या मांडीवर मस्तक ठेवून निजलेला होता. त्याच्या वक्षस्थलावर लत्ताप्रहार केला. त्या काळीं विष्णूनें शय्येखालीं उतरून त्या मुनीस नमस्कार केला, आणि ह्मणाला कीं, आपण आलां हें मीं जाणलें नाहीं. या अपराधाची क्षमा असावी. कारण मुनिश्रेष्ठा, बाप्पा तुमचे चरण अत्यंत कोमल असल्यामुळें त्यांस माझ्या कठीण हृदयाचे संबंधानें दुःख झालें असेल. असें भाषण करून स्वहस्तानें त्या ब्राह्मणाचे चरण रगडीत बसला. आणि त्याची अशी प्रार्थना केली कीं, तुह्मीं आपले पादोदकानें मला सर्व लोक व माझे रूपांतील ब्रह्मादिक संपूर्ण लोकपाल यांसहवर्त्तमान पवित्र करावें; कारण तुमचें चरणोदक सर्व तीर्थांसही पवित्र करण्याची शक्ति देणारें आहे. तसेंच हे ऐश्वर्यसंपन्न ब्राह्मणा, मीही तुमच्या अनुग्रहानेंच लक्ष्मीस मुख्य प्रीतिपात्र झालों असून आज तुमच्या चरणताडनानें माझें सर्व अनिष्ट दूर झाल्यामुळें ही लक्ष्मी निरंतर माझ्या वक्षस्थळीं वास करील. नंतर भृगुऋषि परत येऊन ऋषिसभेस हा वृत्तांत निवेदन करिता झाला. तेव्हां सर्व देवांत विष्णूच अतिश्रेष्ठ आहे असा त्यांनीं निश्चय केला." ( भागवत स्कं. १०. अ. ८९. श्लो. १–१४. )

### ब्रह्मा किंवा ब्रह्मदेव.

परब्रह्मापासून ब्रह्मा, विष्णु, शिव असे तीन देव निर्माण झाले, अथवा ब्रह्मच ह्या तीन रूपांनीं प्रकट झालें असें

जरी हिंदुशास्त्रांचें मत आहे तरी, ब्रह्मदेवाची उत्पत्ति अनेक प्रकारें झाली अशींही मतें त्यांत आहेत:—

(१) ब्रह्मदेव अंड्यांत जन्मला. (मनु.—१. ८, ९.)

ब्रह्मदेवाची उत्पत्ति

"परमात्म्याला अशी इच्छा उत्पन्न झाली कीं, आपल्या शरीरापासून अनेक प्रकारची प्रजा उत्पन्न करावी, यावरून प्रथम उदक उत्पन्न केलें, आणि त्या उदकाचे ठायीं परमात्मा शक्तिरूप बीजाचें रोपण करिता झाला. नंतर तें बीज सुवर्णासारखें शुद्ध आणि सहस्र किरण धारण करणाऱ्या सूर्यासारिखी ज्याची कांति असें अंडें झालें. त्या अंडाचे ठायीं सर्व लोकांचा पितामह (जनक) ब्रह्मा उत्पन्न झाला."

(२) ब्रह्मदेव देवांसहित पाण्यांतून निघाला:—

ततः समभवद्ब्रह्मा स्वयंभूर्दैवतैः सह । (रामायण.)

(३) ब्रह्मदेव विष्णूच्या नाभिकमलापासून उत्पन्न झाला ही गोष्ट तर सर्वांस माहीत असून ती भागवत पुराणांत सांगितली आहे:—

सोऽशयिष्टाब्धिसलिले आंडकोशो निरात्मकः ।
साग्रं वै वर्षसाहस्रमन्ववात्सीत्तमीश्वरः ॥
तस्य नाभेरभूत्पद्मं सहस्रार्कोरुदीधिति ।
सर्वजीवनिकायौको यत्र स्वयमभूत्स्वराट् ॥

भागवत पु० ३. २०. १५, १६.

**अर्थ.** हें अंडें समुद्राच्या पाण्यावर निर्जीव राहिलें होतें, त्यांत ईश्वर पूर्ण सहस्र वर्षें होता. त्याच्या नाभीपासून सहस्र सूर्याच्या प्रभेसारिखें कमळ निघालें, त्यांत ब्रह्मदेव जन्मला.

(४) ब्रह्मदेवास महादेवानें उत्पन्न केलें. (महाभा. अनु. प.)

ब्रह्माणमसृजत्तस्माद्देवदेवः प्रजापतिः ॥

( ९ ) "रजोगुणी जें महात्म्या ईश्वराचें रूप त्यापासून चार मुखांचा ब्रह्मदेव झाला त्याला पितामह ह्मणतात."
( मत्स्य पु० ३. ३६. )

त्याचीं मुखें, शरीर, स्त्री इ०

ब्रह्मदेवाला चार मुखें आहेत, त्या मुखांपासून चार वेद निघाले व त्याच्या शरीराच्या चार भागांतून ( मुख, बाहु, उदर व पाय यांपासून ) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा चार जाति उत्पन्न झाल्या. ब्रह्मदेवानें कित्येक अवतार धारण केले होते. सृष्टीची उत्पत्ति अनेक देवांनीं केली असें जरी हिंदुशास्त्रांत सांगितलेलें आढळतें तरी ब्रह्मदेव सृष्टीचा उत्पन्नकर्त्ता होता हीच गोष्ट बहुधा सर्व लोकांस अवगत आहे. ह्या कर्माच्या संबंधानें त्याला प्रजापति, पितामह, इ० नांवें आहेत. त्याला सावित्री नामक स्त्री आहे. त्याच्या राहण्याच्या देशास सत्यलोक किंवा ब्रह्मलोक ह्मणतात, व त्याच्या गांवास ब्रह्मपुरी असें नांव आहे. तेथें तो सर्वदा वेदपठण करीत बसला आहे, असें त्याच्या चित्रांत दर्शवितात. त्याचें वाहन हंस आहे.

त्याचें स्वकन्यागमन.

सृष्ट्युत्पत्तीच्या संबंधानें ब्रह्मदेवाविषयीं अनेक कथा आहेत; त्यांपैकीं एक अशी आहे कीं, "त्यानें आपल्या देहाचे दोन भाग केले, त्यांतून अर्ध्या भागाचा पुरुष झाला, आणि अर्ध्या भागाची स्त्री झाली." (मनु. अ. १.) ह्या स्त्रीचे ठायीं मैथुनधर्मेंकरून त्यानें विराट्पुरुष उत्पन्न केला. हें कर्म त्याच्या सृष्ट्युत्पत्तीचा भाग होता असें मनूच्या ग्रंथावरून दिसतें, व त्याविषयीं त्याला कांहीं दोष लाविला नाहीं.

परंतु इतर ग्रंथांत हें त्याचें कर्म महा दूषणीय मानिलें आहे. भागवत पुराणांत ( ३ स्कं. १२ अ. ) ह्या ब्रह्मकन्येला वाच् असें नांव आहे. तिजशीं ब्रह्मा कर्म करूं इच्छीत असतां त्याचे पुत्र मुनि मरीच्यादि यांनीं त्याचा निषेधरूप बोध केला तो असाः—

नैतत् पूर्वैः कृतं त्वद्य न करिष्यंति चापरे ।
यत्त्वं दुहितरं गच्छेरनिगृह्यांगजं प्रभुः ।
तेजीयसामपि ह्येतन्न सुश्लोक्यं जगद्गुरो ।
यद्वृत्तमनतिष्ठन्वै लोकः क्षेमाय कल्पते ॥ इ० २९।३०

"असें कर्म तुझ्या पूर्वीं कोणीं केलें नाहीं व तुझ्या मागूनही कोणी करणार नाहीं. तूं प्रभु असतां आपल्या वासनेचा निग्रह करूं नयेस काय ? हे जगद्गुरू, तुजसारख्या तेजवान् पुरुषास हें कर्म स्तुत्य नाहीं. कारण महाजनांच्या मार्गास अनुसरून लोकांचें कल्याण होतें. आपल्या पुत्रांचें असें भाषण ऐकून प्रजापति लज्जित झाला. आणि त्या पुत्र-निंदित स्वतनूचा त्याग केला. हा त्याचा भयंकर देह नीहार ( धुकें ) रूपानें प्रसिद्ध झाला. तो दिशांनीं घेतला, व त्याला तम ( अंधकार ) असेंही ह्मणतात." अर्थात् आतां जें धुकट पडतें तें हें ब्रह्मदेवानें टाकलेलें शरीर होय !!

हीच कथा शतपथब्राह्मणांत कांहींशी निराळ्या प्रकारें सांगितली आहेः—"त्यावर देव रागावले. ते ह्मणाले कीं, 'हा पशुपति आमच्या बहिणीशीं असें दुष्कर्म करितो. त्याला बाणानें विंधा.' मग रुद्रानें त्याला बाण मारिला. देवांचा क्रोध शांत झाल्यावर त्यांनीं प्रजापतीला उपचार केले, आणि त्याच्या शरीरांतून बाण काढून काढला." ( श. ब्रा. १. ७, ४, १–४ ).

प्रजापतिर्ह वै स्वां दुहितरमभिदध्यौ । दिवं वोषसं वा मिथुन्येनया स्यामिति तां संबभूव ॥ १ ॥ तद्वै देवानामाग आस । य इत्थं स्वां दुहितरमस्माकं स्वसारं करोतीति ॥ २ ॥ ते ह देवा ऊचुः योऽयं देवपशूनामीष्टेऽतिसंधं वा अयं चरति य इत्थं स्वां दुहितरमस्माकं स्वसारं करोति विध्येनमिति तं रुद्रोऽभ्यायत्य विव्याध तस्य सामि रेतः प्रचस्कन्द तथेन्नूनं तदास ॥ ३ ॥ तस्मादेतदृषिनाभ्यनूक्तम् । पिता यत्स्वां दुहितरमधिष्कन् क्ष्मया रेतः संजग्मानो निषिञ्चदिति तदाग्निमारुतमित्युक्थं तस्मिंस्तद्व्याख्यायते यथा तद्देवा रेतः प्राजनयंस्तेषां यदा देवानां क्रोधो व्यैदथ प्रजापतिमभिषज्यंस्तस्य तां शल्यं निरकृन्तन्स वै यज्ञ एव प्रजापतिः ॥ ४ ॥

त्याचें पांचवें मुख.

मत्स्यपुराणांत सांगितलें आहे कीं, ह्या कर्माकडून ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न करण्याकरितां जें तप केलें तें सर्व नाश पावलें, आणि त्याची कन्या आकाशांत उड्डाण करून जात असतां तिजकडे पाहण्याकरितां त्याला पांचवें मुख उत्पन्न झालें; तें त्यानें जटांनीं झांकून घेतलें. ( म. पु. ३. )

ब्रह्मदेवास विष्णूच्या नाभिकमलाचा थांग लागला नाहीं.

"ब्रह्मदेव स्वकीय उत्पत्तिस्थानभूत कमलावर बसून त्या कमलाच्या आश्रयानें शोधार्थ पूर्वी प्रलयोदकांत त्या कमलाच्या अधोभागीं गेले. परंतु त्याचा शोध न लागल्यामुळें तेथून परावृत्त होऊन ते पुनः स्वस्थानीं येऊन बसले." (भाग. पु. २. ९. ९.)

हा प्रकार पुढें शिवाच्या वर्णनांत सांगितलेल्या लिंगाचा थांग लागण्यास ब्रह्मा, विष्णु हे गेले होते त्या कथेसारिखा आहे.

"सृष्ट्युत्पत्ति कशी करावी असा विचार ब्रह्मदेव करीत होते, तथापि चराचर सृष्टि निर्माण करण्याचा प्रकार सिद्ध होण्याविषयीं निश्चयेंकरून समर्थ अशी बुद्धि त्यांस सुचेना. तेव्हां त्यांनीं प्रलयजलांत समीप प्रदेशीं जें द्विवार उच्चारलेलें दोन अक्षरांचें वाक्य श्रवण केलें तें असें कीं, **क** पासून **म** पर्यंतचे स्पर्श नामक पंचवीस वर्णांतील सोळावा **त** व एकविसावा **प** हे दोन वर्ण मिळून जें **तप तप** असें वाक्य ब्रह्मदेवाच्या श्रवणांत द्विवार आलें तें तप तप (तप कर, तप कर) असें वाक्य श्रवण करून ब्रह्मदेवांनीं त्या वाक्याच्या वक्त्याचें दर्शन व्हावें या इच्छेनें आसमंतात् सर्व दिशांत अवलोकन केलें. परंतु इतर पुरुषाचें दर्शन झालें नाहीं. तेव्हां त्याच स्वस्थानीं बसून कोणी पुरुषानें आपणास याविषयीं प्रत्यक्ष आज्ञाच केली काय अशा रीतीनें तें आपलें हितकारक आहे असें विचारानें जाणून आज्ञा झालेल्या त्या तपाविषयीं मनःपूर्वक निश्चय केला." (भा. पु. २. ९. ५–७.)

ब्रह्मदेवाला सृष्ट्युत्पात्ति करण्यासाठीं तप करण्याची आज्ञा होते.

ब्रह्मदेवानें सकल सृष्टि केली असें अनेक पुराणांत व शास्त्रांतही सांगितलें आहे, व त्याविषयींचे कित्येक उतारे आम्हीं वर दिलेच आहेत. आतां एथें त्याच्या सृष्टीचे कांहीं विलक्षण मासले दाखवितों:—

ब्रह्मदेवाची विलक्षण सृष्टि; यक्ष व राक्षस.

"ज्या छायारूप देहानें अविद्या उत्पन्न केली, ती तामसी सृष्टि झाल्यामुळें ब्रह्मदेवानें असंतोषानें त्या देहाचा

त्याग केला. तोच रात्रिरूप झाला. त्यापासून उत्पन्न झालेले यक्ष राक्षस ते रात्रीं संचारादि करणारे असल्यामुळें रात्रींच त्यांस क्षुधा, तृषा उत्पन्न होतात. यास्तव त्यांहीं त्या रात्रीचें ग्रहण केलें. ते यक्ष, राक्षस क्षुधा व तृषा यांनीं व्याप्त होऊन ब्रह्मदेवास भक्षण करण्यासाठीं धांवले असून त्यांत कितीएक बोलले कीं, आपण क्षुधा तृषा यांनीं पीडित झालों, यास्तव हा आपला पिता आहे अशा कृपायुक्त बुद्धीनें याचें रक्षण करूं नका. तसेच इतर कोणी ह्मणाले कीं, स्वकीय क्षुधातृषानिवारणार्थ यास भक्षणच करा. ते समयीं ब्रह्मदेव भयभीत होत्साते त्यांस ह्मणतात, यक्षराक्षसहो, मला भक्षण करूं नका. रक्षण करा. कारण, तुह्मी माझे पुत्र झाले आहां. असे ते यक्षराक्षस उग्र स्वभावयुक्त झाले त्यांत जे भक्षण करा असें बोलले ते यक्ष झाले, व रक्षण करूं नका असें बोलले ते राक्षस झाले. हें ज्ञानहीन तामससृष्टीचें उपलक्षण आहे, यावरून इतर पशुपक्ष्यादि तामससृष्टिही याच तमोमय रात्रिस्वरूप देहापासून झाली असें जाणावें." ( भा. पु. ३. २०. १९–२० )

ब्रह्मदेवापासून रुद्र झाला.

विष्णुपुराणांत ( १. ७. ९ ३०. ) असें सांगितलें आहे कीं, ब्रह्मदेवाच्या क्रोधयुक्त मस्तकापासून रुद्र ( शिव ) उत्पन्न झाला. तो अर्धनारीनर असा होता:—

भ्रुकुटीकुटिलात्तस्य ललाटात्क्रोधदीपितात् ।
समुत्पन्नस्तदा रुद्रो मध्यान्हार्कसमप्रभः ॥
अर्धनारीनरवपुः प्रचंडोऽर्धशरीरवान् ॥ ३०

ब्रह्मदेवाच्या मनापासून दहा पुत्र झाले, यांस मानस-

त्याचे मानस व अंगज पुत्र.

पुत्र ह्मणतात. त्यांचीं नांवें:—मरिची, अत्री, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, ऋतु, प्रचेता, वसिष्ठ भृगु, नारद. त्याच्या शरीरापासून मातेवांचून नऊ पुत्र झाले त्यांस अंगज ह्मणतात, ते येणेंप्रमाणें:— उजव्या अंगठ्यापासून दक्षप्रजापति, स्तनाग्रापासून धर्म, हृदयापासून मदन, भ्रुकुटीच्या मध्यापासून क्रोध, अधरोष्ठापासून लोभ, बुद्धीपासून मोह, अहंकारापासून मद, कंठापासून हर्ष, नेत्रापासून मृत्यु.

त्याचे वर.

ब्रह्मदेवानें अनेक दैत्य व राक्षस यांस त्यांच्या तपश्चर्येवरून प्रसन्न होऊन वर दिले, त्यामुळें ते अतिशय प्रबल झाले. त्यांनीं पृथ्वी व स्वर्ग हीं जिंकून इतकी धुमाळी मांडली कीं, ते ब्रह्मदेवासही भारी झाले; मग विष्णु किंवा शिव यांस अवतार घेऊन त्यांस मोठ्या प्रयासानें, कित्येक प्रसंगीं कपटानें जिंकावे लागलें. रावणास त्याचा असा वर होता कीं, तूं देव, मानव किंवा यक्ष यांच्या हातून मरण पावणार नाहींस. तारकासुरानें त्यापाशीं असा वर मागितला होता कीं, त्याच्या किल्ल्यांत एक असें तळें असावें कीं, त्यांत लढाईत मरण पावलेला असुर टाकला ह्मणजे तो जीवंत व्हावा. असा वर मिळविल्यावर तारकासुरानें अतिशयच देवांचें ताडन व पीडन केलें. तेव्हां त्यांनीं ब्रह्मदेवापाशीं जें गाऱ्हाणें केलें त्यांतील केवळ एक वाक्य एथें घेतों:—"हे ब्रह्मदेवा, त्या असुरसैन्याच्या धुळीनें आमचीं सर्वांगें मलीन झालेलीं आहेत. असे आम्ही अत्यंत दीन होऊन त्या तारकासुराच्या द्वारांतच बहुत काल उभे होतों. पश्चात् महाप्रयासानें आह्मी देवद्वेषी तारक दैत्याच्या सभेंत गेलों. तेथेंही त्याच्या दूतांनीं आह्मांस निकृष्टस्थानीं बसविलें,

आणि राजकीय चिन्हांच्या काठ्या हातांत घेणाऱ्या भालदारांनीं आह्मांस दबावून मुकाट्यानें बसविलें, व त्यांनीं तेथें आमचा उपहासही बहुत केला." (मत्स्य पु. अ. १५३.)

त्याची पूजा बंद.

ब्रह्मदेवाची पूजा आतां बंद झाली आहे. त्याच्या नांवाचें जें पुराण (ब्रह्मपु.) आहे तें त्यानें मरीचीस सांगितलें. सर्व राजसपुराणांत ( **पुराण** प्रकरण पहा ) ब्रह्मदेवाचें माहात्म्य वर्णिलें आहे.

**विष्णु.**

वैदिक विष्णु.

हा त्रिमूर्तींतील दुसरा देव आहे. याचें नांव वेदांत सांपडतें, परंतु पुराणांत जी पदवी त्याला दिली आहे ती त्यांत नाहीं. तेथें त्याला इंद्र, अग्नि, वायु, इ० देवांमध्यें गणिलें असून जशी त्या देवांची प्रार्थना केली आहे तशीच याचीही केली आहे; आणि सोमरस व मांसादि हविरन्न त्याला अर्पिलें आहे. "सर्व देवांत पहिला अग्नि आहे, आणि विष्णु सर्वांत शेवटला आहे. ह्या उभयतांच्या मध्यें दुसरे सर्व देव आहेत."

अग्निर्वै देवानामवमो विष्णुः परमस्तदंतरेण सर्वा अन्या देवताः॥

वेदांत विष्णूला इंद्राचा सखा इंद्रस्य सखा ) व धाकटा इंद्र ( उपेंद्र ) ह्मटलें आहे.

त्यास इतर देवांसहवर्तमान आमंत्रिलें व स्तविलें आहेः—
" हे मरुतहो, हे विष्णू, अश्वीन, हे पूषन्, तुह्मी माझें स्तोत्र ऐकून या." ( ऋ. ८. २७. ८. )

"इंद्र आणि विष्णु तुह्मी सर्व स्तोत्रांचे उत्पादक आहां, तुह्मी सोमरस ओतायाचीं पात्रें आहां. त्या तुह्मांस आतां जी स्तुति केली तिच्याकडून संतोष होवो." (ऋ. ६. ६९. २.)

वेदांत "तो मोठमाठोलीं पावलें टाकणारा, तीन पावलांत तीन लोकांचें आक्रमण करणारा" असा वर्णिला आहे. ऋ. १. २२. १६–२१.

विष्णूची वैदिक स्त्री.

विष्णूला वेदकाळीं एक बायको होती, पण ती लक्ष्मी नव्हती, तिचें नांव अदिति होतें. सूर्यालाही वेदांत विष्णु ह्मटलें आहे. ऋग्वेदांत इंद्र, अग्नि, वायु, इ० चीं स्तोत्रें पुष्कळ आहेत, त्यांशीं ताडून पाहतां विष्णूच्या स्तुतीचीं फार थोडीं स्तोत्रें सांपडतात. सारांश, विष्णूचें माहात्म्य वेदांत फारच थोडें असून जें कांहीं आहे तें इतर वैदिक देवांच्या बरोबरीचें आहे.

पौराणिक विष्णु.

परंतु पुराणादि अर्वाचीन ग्रंथांत विष्णु फारच मोठा देव होऊन बसला आहे. त्यापासून सृष्टि उत्पन्न झाली. आणि तिची स्थिति व लयही त्यापासूनच होतात. त्याची लीला व माहात्म्यवर्णनार्थ अनेक पुराणें झालीं. पौराणिक विष्णूला लक्ष्मीनामक स्त्री आहे, ती त्याच्या रामावतारांत सीता व कृष्णावतारांत रुक्मिणी ह्या रूपानें अवतरली. तो चतुर्भुज असून शंख, चक्र, शारंग ( नांवाचें धनुष्य ), गदा, सुदर्शन हीं आयुधें धारण करितो. त्याच्या गळ्यांत कौस्तुभमणि आहे व छातीवर श्रीवत्सनामक केशमय चिन्ह आहे. गरुडनामक पक्षी त्याचें वाहन आहे.

वैकुंठ.

विष्णु वैकुंठीं राहतो. हें स्थान मेरू पर्वतावर आहे असें महाभारतांत सांगितलें आहे. दुसऱ्या कित्येक ग्रंथांप्रमाणें तें उत्तर महासागरांत आहे. तें केवळ सुवर्णमय असून त्याचा व्यास ८०,००० मैल आहे.

तेथें गंगा नदीचीं जलें वरच्या स्वर्गांतून ध्रुवाच्या मस्तकीं पडतात; आणि तेथून तीं सप्त ऋषींच्या केशांत पडतात, आणि नदीच्या रूपानें वाहतात. तेथें सूर्यासम दैदीप्यमान असा विष्णु कमलावर बसलेला आहे, आणि त्याचे उजव्या बाजूस लक्ष्मी आहे व कमलाचा सुवास ८०० मैल पर्यंत वाहतो.

क्षीरसागर.

विष्णु क्षीरसागरांत वास करितो असेंही वर्णन आहे. तेथें तो पहुडला आहे व लक्ष्मी त्याची चरणसेवा करीत आहे. जेव्हां पृथ्वीवर दैत्य माजतात व गोब्राह्मणांचा छळ होतो तेव्हां ब्रह्मदेवप्रभृति देव व पृथ्वी ( गायीच्या रूपानें ) क्षीरसागराच्या कांठीं उभे राहून विष्णूस शरण जातात. **( दशावतारवर्णन पहा. )**

ह्या स्थानास अनुलक्षून तुकारामाचा एक अभंग आहे:-

क्षीराब्धिवासा शेषशयना । लीलाविग्रहा गोपिकारमणा ॥ इ०

प्रलय व उत्पत्ति यांच्या मध्यंतरीं तो क्षीरसागरांत शेष किंवा अनंतनामक सहस्र फणांच्या सर्पावर शयन करितो, तेथें लक्ष्मी त्याची पादसेवा करीत बसली आहे, व त्याच्या नाभिकमलापासून ब्रह्मदेव उत्पन्न झाला आहे, असें त्याचें चित्र काढण्याचा फार प्रचार आहे. त्याच्या देवळांत जे दर्शनास जातात ते बहुधा हा पुढील श्लोक ह्मणतात:—

शांताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशम् ।
विश्वाधारं गगनसदृशं मेघवर्णं शुभांगम् ॥
लक्ष्मीकांतं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यम् ।
वंदे विष्णुं भवभयहरं सर्वलोकैकनाथम् ॥

त्यानें शुक्राची आई व भृगूची बायको हिचें मस्तक

तो भृगूच्या शापामुळें अवतीर्ण होतो.

छेदिलें ह्मणून भृगूनें त्याला शाप दिला, त्या शापानें तो सात वेळ पृथ्वीवर जन्मास आला. ( म. पु. अ. ४७.) राम कृष्ण इ० अवतार त्याचेच होते. ह्या अवतारांच्या योगानें त्याची भक्ति हिंदुस्थानांत फार पसरली.

त्याच्या अवतारांचीं दुसरीं कारणें.

दुष्टांचें ताडन करून भक्तांचें पालन करण्यास्तव धारण केलेल्या अवतारांखेरीज विष्णूनें धर्मग्रंथांची व्यवस्था लावण्याकरितां व त रचण्याकरितांही अवतार घेतले होते. विष्णुपुराणांत ( ३. २. १८.) असें लिहिलें आहे कीं, कृतयुगांत त्यानें कपिलादिकांचें स्वरूप धारण केलें, त्रेतायुगांत त्यानें व्यासाच्या रूपानें एका वेदाचे चार भाग केले व शतावधि शाखा केल्या. (वेदमेकं चतुर्भेदं कृत्वा शाखाशतैर्विभुः ) तसेंच द्वापारयुगांतही त्यानें पाराशररूपानें वेदांचे विभाग केले. त्याच्या एका अवतारावरून त्याचें वैकुंठ असें नांव पडलें.

त्याचेपासून ब्रह्मा व शिव झाले.

ब्रह्मा व शिव हे त्याच्या मस्तकांतून निघाले असें भारतांत आहे:—

ललाटाज्जातवान् शंभुः शूलपाणिस्त्रिलोचनः ।
इत्थं तावपि देवेशौ त्वच्छरीरसमुद्भवौ ॥
(भारत व. प. अ. १२)

त्याची मूर्ति व्रतें, नामें इ०

विष्णूची पूजा रामकृष्णादिकांचे मूर्तीच्या द्वारें होते. इतकेंच नाहीं, तर त्याची पृथक् मूर्ति करून लोक त्याला भजतात. त्याला तुलसीची फार आवड आहे. त्याच्या व्रतांपैकीं एकादशी हें एक मुख्य व मोठें व्रत आहे. त्याचें

एक अर्वाचीन स्तोत्र आहे त्याला विष्णुसहस्रनाम ह्मणतात; त्यांत त्याचीं एक हजार नांवें आहेत, त्यांपैकीं पद्मनाभ, पुरुषोत्तम, हरि, अनंत, शेषशाई, नारायण, लक्ष्मीपति, श्रीधर, गरुडध्वज, चक्रपाणि, विश्वंभर, अशीं आहेत. एका एकादशीस तो निजतो, तिला शयन ए० ह्मणतात.

त्याची स्तुति. विष्णुपुराणाच्या आरंभीं विष्णूची स्तुति येणेंप्रमाणें केली आहेः—

जितं ते पुंढरीकाक्ष नमस्ते विश्वभावन ।
नमस्तेऽस्तु हृषीकेश महापुरुषपूर्वज ॥
सदक्षरं ब्रह्म य ईश्वरः पुमान्गुणोर्मिसृष्टिस्थितिकालसंलयः ॥
प्रधानबुद्ध्यादि जगत्प्रपंचसूः स नोऽस्तु विष्णुर्मतिभूतिमुक्तिदः ॥

**अर्थ.** "हे पुंडरीकाक्षा, तुला जय असो. हे विश्वभावना हे हृषीकेशा, हे पूर्वजा, तुला नमन असो. जो सत् अक्षर (अविनाशी) ब्रह्म आहे, जो ईश्वर आहे, जो पुमान् (पुरुष, आत्मा) आहे, जो सत्त्वरजादि तीन गुणांसह सृष्टि, स्थिति व लय यांचा कर्त्ता आहे, जो मूलप्रकृति, बुद्धि इ० चा पिता आहे, तो आमचा बुद्धि–धन–मुक्ति दाता होवो."

तो विश्वरूप आहे. ह्याच पुराणांत विष्णूला विश्वरूप मानून त्याची स्तुति केली आहेः—

देवा यक्षासुराः सिद्धा नागा गंधर्वकिन्नराः ।
पिशाचा राक्षसाश्चैव मनुष्याः पशवस्तथा ॥
पक्षिणः स्थावराश्चैव पिपीलिकसरीसृपाः ।
भूम्यापोऽग्निर्नभो वायुः शब्दः स्पर्शस्तथा रसः ॥
रूपं गंधो मनो बुद्धिरात्मा कालस्तथा गुणः ।
एतेषां परमार्थं च सर्वमेव त्वमच्युत ।

विद्याविद्ये भवान् सत्यमसत्यं त्वं विषामृते ।
प्रवृत्तं च निवृत्तं च कर्म वेदोदितं भवान् ॥
( अं. १. अ. १९)

"हे अच्युता तूं देव, यक्ष, असुर, सिद्ध, नाग, गंधर्व, किन्नर आहेस. तूं पिशाच, राक्षस, मनुष्य, पशु आहेस. तूं पक्षी, किडे, सर्प, झाडें, दगड, माती, पाणी, अग्नि; आकाश, वायु, शब्द, स्पर्श, रस ( रुचि, ), रंग, वास, मन, बुद्धि, आत्मा, काळ, गुण आहेस. तूं ज्ञान, अज्ञान, सत्य, असत्य, विष, अमृत आहेस."

तो परब्रह्म, त्याला जाणत नाहीं तो गाढव.

वसिष्ठस्मृतींत असें सांगितलें आहे कीं, जो ब्राह्मण चार वेद शिकलेला असून विष्णूला जाणत नाहीं तो गाढव आहे. विष्णु हाच परब्रह्म आहे. सोम, सूर्य, इ० देव क्षत्रियांचे व वैश्यांचे आहेत. रुद्र (महादेव) हा शूद्रांचा देव आहे:—

चतुर्वेदी च यो विप्रो वासुदेवं न विंदति ।
वेदभारभयाक्रांतः स वै ब्राह्मणगर्दभः ॥
नारायणं परं ब्रह्म ब्राह्मणानां हि दैवतम् ।
सोमसूर्यादयो देवाः क्षत्रियाणां विशामपि ॥
शूद्रादीनां तु रुद्राद्या अर्चनीयाः प्रयत्नतः ॥

त्याचीं अनुचित कर्मे; तुलसीविवाह.

विष्णूनें अवतारसंबंधानें बहुत अनुचित कर्मे केलीं इतकेंच नाहीं, तर अवतार घेण्याचे पूर्वीं देखील त्याचीं सर्व कर्मे निर्दोष होतीं असें ह्मणतां येत नाहीं. त्यानें जलंधर राजाच्या वृंदानामक स्त्रीचें कृत्रिमानें पातिव्रत्य भंग केलें; तें तिला समजल्यावर तिनें प्राणत्याग केला. तिच्या वियोगानें तो परमदुःखी होऊन प्राणत्याग करणार होता, तेव्हां त्याचें सांत्वन करण्यासाठीं इतर देवांनीं तो जेथें बसला होता तेथें बिया

लाविल्या, त्यांपैकीं एकीपासून तुळसीचें झाड उगवलें तें त्याला फार आवडून त्यास त्यानें स्त्री मानून तिजशीं लग्न लाविलें. तुळसीविवाहाची ही उत्पत्ति कार्तिकमाहात्म्यनामक पोथींत सांगितली आहे.

त्याची परीक्षा. विष्णूची परीक्षा भृगुऋषीनें केली, तिचा वृत्तांत **"त्रिमूर्तींची परीक्षा"** ह्या प्रकरणांत पहावा.

इतर देवांनीं दैत्य मारिले तसे विष्णूनेंही अनेक दैत्य व

त्याचे पराक्रम. राक्षस मारिले; त्यांपैकीं मधु व कैटभ असे दोन असुर होते ते त्याच्या कर्णांतून उत्पन्न झाले. "हे विष्णूसच भय दर्शवूं लागले असतां, तो यांस ह्मणूं लागला कीं, वर मागा; हे ह्मणाले, तूंच पाहिजे तर वर माग. त्यावरून विष्णूनें तुह्मीं मला वध्य असावें ह्मणून मागितलें. यांनीं तथास्तु ह्मटल्यावर पुढें यानें त्यांस मारिलें. त्या काळीं त्यांच्या शरीरमेदानें संपूर्ण पृथ्वी भरली, व तेव्हांपासून तिला मेदिनी असें नांव पडलें." ( भारत. वनप० अ. २०३. )

सर्वदेवांपेक्षां विष्णु श्रेष्ठ व परब्रह्म आहे असें शिवानें स्वतां पार्वतीला सांगितलें असें विष्णुपुराणांत वर्णिलें आहे.

एकदां त्यानें स्त्रीअवतार घेतला होता, त्याची कथा

त्याचा स्त्री-अवतार. थोडक्यांत येणेंप्रमाणें आहे. समुद्रमंथन होऊन त्यांतून अमृत निघालें असतां त्यानिमित्त देवदैत्यांचा कलह लागला, व अमृतकलश दैत्य आपणांजवळ घेऊन बसले, तेव्हां त्यांस मोहित करून त्यांपासून तो कलश परत आणण्याकरितां

विष्णु स्त्री झाला. ह्या अवताराला मोहिनी अवतार ह्मणतात. ( भागव. स्कं. ८. अ. ८. )

विष्णु अमर नाहीं. ( मत्स्यपु० १५३. ३६६. )

### ३ शिव.

हा त्रिमूर्तींतला तिसरा देव होय. याची उत्पत्ति ओंकारापासून झाली असें शिवभक्त समजतात व तो ओंकाररूपच आहे असेंही मानितात.

वेदांत शिव नाहीं. वैदिकरुद्र.

वेदांत शिव ह्या नांवानें हा देव सांपडत नाहीं, पण तेथें रुद्रनामक एक किंवा अनेक देव सांगितले आहेत. रुद्र शब्दाचा अर्थ भयंकर असा होतो, दुसरा अर्थ गर्जणारा असा आहे. त्याचें मूल रुद् रडणें या धातुपासून आहे. वैदिकरुद्र प्रजापतीचा पुत्र होता, त्याच्या आईचें नांव उषा ( पहाट ) होतें. तो जन्मल्यावर रडूं लागला, तेव्हां बापानें त्याला कां रडतोस असें विचारिलें. तो ह्मणाला, माझें अद्याप नांव ठेविलें नाहीं. बाप ह्मणाला 'तूं रुद्र ( रड्या ) आहेस' ही कथा श. ब्रा. त आहे. तोच पुढें पौराणिक काळांत महादेव असें नामांतर पावला; इतकेंच नाहीं तर त्याच्या रूपांत व गुणकर्मांतही मोठा पालट झाला. वेदांतील रुद्र मरुतांचा बाप होता, व तो अग्नीचें रूप होता. शिवाविषयीं ऋ० वेदांत मुळींच उल्लेख नाहीं, तेव्हां तो ओंकाररूप होता असें त्यांत मिळण्याची आशा बाळगणें नको. रुद्राची इतर वैदिक देवांप्रमाणें योग्यता होती. त्याला वैद्यांचा वैद्य ह्मटलें आहे. तो गौरवर्ण होता, त्याच्या हातांत धनुष्य व बाण हीं मात्र आयुधें होतीं. तो रथांत बसत असे व हातांत वज्र धरीत असे. त्याचा स्व-

भाव सौम्य, कधीं कधीं क्रुद्ध असे. तो फार परोपकारी असे, असाही वर्णिला आहे.

पौराणिक शिव.

अर्वाचीन शिवाचें रूप भारतांत व लिंग वगैरे पुराणांत, आणि लोक जीं त्याचीं चित्रें काढतात त्यावरून दिसण्यांत येतें; तें असें आहे कीं, त्याला चार हात आहेत, त्याच्या शरीरास भस्म चर्चिलेलें असून गळ्यांत रुंडमाळा ह्मणजे मनुष्याच्या मुंडक्यांच्या माळा आहेत, त्यानें मस्तकीं गंगा धारण केली आहे, त्याच्या हातांत त्रिशूळ, डमरु, परशु, पाश इ० आयुधें आहेत. कित्येक शिवमूर्तींच्या हातांत हरण, करोटी, व मुंडकें हीं असतात. तो व्याघ्रचर्मावर बसलेला असतो. त्याच्या मस्तकांतून गंगा वाहते. तो जटाधारी आहे. त्याच्या अंगावर सर्पांचीं भूषणें आहेत. त्याचें वाहन नंदी. त्याच्या बायकोचें नांव पार्वती. दुसरें एक शिवाचें रूप आहे, त्यांत तो अर्धनारी ह्मणजे अर्धा पुरुष व अर्धी स्त्री असा दर्शविलेला असतो. त्याला कधीं कधीं पांच मुखें असतात. तो त्रिनेत्र आहे. तिसरा डोळा त्याच्या मस्तकांत आहे, त्यांत अग्नि आहे; त्याचा गळा निळा आहे, त्यावरून त्याला नीलकंठ असें नांव पडलें. महाभारतांत ( अनुशासनपर्व अ० १४. ) शिवाचें येणेंप्रमाणें वर्णन आहे:—

चक्री शूली गदापाणिर्मुसली खड्गपट्टिशी।
भूधरो नागमौंजी च नागकुंडलकुंडली॥
नागयज्ञोपवीती च नागचर्मोत्तरच्छदः।
हसते गायते चैव नृत्यते च मनोहरम्॥
वादयत्यपि वाद्यानि विचित्राणि गणैर्युतः।
वल्गते जृंभते चैव रुदते रोदयत्यपि॥

उन्मत्तमत्तरूपं च भाषते चापि सुस्वरः।
वेदीमध्ये तथा यूपे गोष्ठमध्ये हुताशने ॥
दृश्यतेऽदृश्यते चापि बालो वृद्धो युवा तथा।
क्रीडते ऋषिकन्याभिर्ऋषिपत्नीभिरेव च ॥
ऊर्ध्वकेशो महाशेफो नग्नो विकृतलोचनः।
एकवक्रो द्विवक्रश्च त्रिवक्रोनेकवक्रकः ॥

**अर्थ.**—"तो ब्रह्मा, विष्णु, इंद्र, रुद्र इ० चीं अनेक रूपें धारण करितो. तो मनुष्य, देव, स्त्रिया, प्रेत, पिशाच, किरात, शबर ( जंगली लोक ), ग्रामपशु, वनपशु, सर्पटणारे प्राणी, मत्स्य, यांचीं रूपें घेतो. त्याच्या हातांत चक्र, शूल, गदा, तरवार, कुऱ्हाड आहे. त्याला सर्पाचें जानवें आहे. आणि तो हत्तीच्या कातड्याचीं वस्त्रें परिधान करितो. तो गातो, नाचतो, वाद्यें वाजवितो. तो हंसतो, जांभया देतो (अथवा तोंड वासतो), रडतो, दुसऱ्यांस रडवितो. तो मद्यप्याप्रमाणें किंवा वेड्याप्रमाणें बोलतो, तो मधुर भाषण करितो. तो भयंकर रीतीनें हंसतो. तो यज्ञवेदीवर व यज्ञस्तंभावर व अग्नींत दृश्य व अदृश्य आहे. तो बाल, वृद्ध व तरुण आहे. तो ऋषिकन्या व ऋषिपत्नी यांशीं क्रीडा करितो. त्याचे केश उभे आहेत, त्याचें लिंग उभें आहे. तो नग्न व काबऱ्याबाबऱ्या दृष्टीचा आहे. तो एकतोंडया, दुतोंड्या व अनेकतोंड्या आहे."

शिवलीलामृत ग्रंथ.

शिवाविषयींच्या बहुत कथा आहेत, त्यांतून कित्येकांचा संग्रह शिवलीलामृतनामक प्राकृत ग्रंथांत केला आहे. वर जें त्याचें वर्णन केलें आहे त्यासंबंधानें कित्येक कथा संक्षेपानें सांगतों.

यमधर्मानें बैलाचें रूप धरून शिवाला त्याचें वाहन करायास सांगितलें, तेव्हांपासून तो बैलावर बसूं लागला. त्याचा कंठ काळा होण्याचें कारण असें होतें कीं समुद्रमंथनापासून जें विष निघालें तें इतकें तीव्र होतें कीं, जर तें खालीं ठेविलें असतें तर पृथ्वी जळून गेली असती. तें कोणी घेईना; मग शिवानें तें गिळलें, तेणेंकरून त्याचा गळा काळा झाला[1] व त्याच्या अंगाचा इतका दाह झाला कीं, त्याला मस्तकीं गंगा व चंद्र हीं धारण करावीं लागलीं, व वाघाच्या थंड कातड्यावर बसावें लागलें. त्याला मस्तकीं गंगा घेण्याचें दुसरें कारण असें सांगतात कीं, जेव्हां आकाशांतून गंगा पृथ्वीवर उतरली तेव्हां तिचा प्रवाह इतका मोठा होता कीं, जर शिवानें आडवें येऊन ती आपल्या जटामध्यें घेतली नसती तर पृथ्वीचा चुराडा झाला असता. त्याच्या व्याघ्रचर्माची अशी कथा आहे कीं, एकदां तो अरण्यांत ऋषिपत्न्यांस पाहून मोहित झाला. तें ऋषींस सहन न होऊन त्यांनीं मायेचा वाघ करून त्याच्या आंगावर सोडिला, त्याला त्यानें मारून त्याचें कातडें अंगावर घेतलें. नंतर त्यांनीं एका हरणास त्याच्या अंगावर उडी मारायास लाविलें, त्यास त्यानें धरून हातांत ठेविलें तें अद्याप तेथेंच आहे. मग त्यांनीं तापलेलें लोखंड त्याच्या अंगावर फेंकिलें,

*त्याचें वाहन, विषप्राशन व गंगाधारण.*

---

१ शिवाचा गळा काळा होण्याचें आणखी एक कारण महाभारतांत असें सांगितलें आहे कीं, दक्षयज्ञाच्या प्रकरणांत त्याचें व नारायणाचें युद्ध चाललें असतां नारायणानें त्याच्या गळ्यास अशी मिठी मारिली कीं तेणेंकरून त्याचा कंठ काळा पडला. ( महाभा० शांतिपर्व; मोक्षधर्म, अ० १२९.)

तेंही त्यानें हातांत घेऊन ठेविलें. एकदां गय नामक एक असुर मुनींच्या मागें लागला असतां ते काशींत शिवालयांत जाऊन लपले. तेव्हां शिवानें त्या असुराचा नाश करून त्याचें शरीर फाडून त्याचें कातडें आपल्या खांद्यावर वस्त्राप्रमाणें घेतलें. शिवाचा परम विश्वासू व जवळचा सेवक नंदी आहे. त्याशिवाय संभ्रम, विभ्रम, शाख, विशाख असे बहुत गण त्याच्या सेवेंत असतात.

त्याचे पुत्र.

शिवास गणपति व कार्तिकेय ( स्कंद ) असे दोन पुत्र आहेत. ("उमा हें प्रकरण पाहा.)

शिवाचें त्याच्या बायकोशीं वारंवार भांडण होत असे, त्याचा मासला खालीं दिला आहे:—

शिवपार्वतीचें भांडण.

"पार्वतीला शिव ह्मणतो, हे सूक्ष्मांगि पार्वती, जशी शुद्ध नागीण शुभ्र चंदनवृक्षावर शोभते तशी तूं माझ्या शुभ्र अंगावर कृष्णवर्ण कांतीनें युक्त अशी दिसतेस. असें भाषण ऐकून क्रोधेंकरून लाल जिचे नेत्र आणि भोंवया वक्र आहेत ज्या मुखाचे ठायीं अशी पार्वती आपला कंठ मोकळा करून शिवाशीं भाषण करून बोलती झाली कीं, हे चंद्रशेखर शिवा, सर्व लोक स्वकर्मानें प्राप्त झालेल्या मूर्खत्वामुळें परभव पावतो, आणि अर्थातच्च अवश्य नाश पावतो. मीं पूर्वी बहुतकालपर्यंत मोठमोठीं तपें करून तूं पति प्राप्त होण्याविषयीं प्रार्थना केली असून तुह्मांपासून माझा पदोपदीं विनाकारण निश्चयेंकरून असा अपमान होत आहे. हे शंकरा, मी कुटिल व विषमही नाहीं. आणि दोषाकर जो चंद्र त्याच्या संबंधानें तूं मात्र विषयुक्त अशा प्रसिद्धीस प्राप्त

झाला आहेस. आणि आपले दोष मजवर स्थापून माझी निंदा करून माझे मस्तकीं शूळ उत्पन्न करितोस. तूं महाकाळ ( मोठा कृष्णवर्ण ) या नांवानें प्रसिद्ध असून मला काळी ह्मणतोस? तर आतां मी तपानें देहत्याग करून हिमालयाकडे जाईन, कारण अशा वंचकाच्या ( ठकाच्या ) योगानें पराभव पावून जिवंत राहण्यांत मला कांहींएक कर्तव्य नाहीं. **शिव** ह्मणतो—हे पार्वती, तूं खरी हिमालयपर्वताची कन्या आहेस. मी तुझी निंदा करणारा नव्हे, तुझी भक्ति पाहून त्याच बुद्धीनें म्यां तुझें पाणिग्रहण केलें. जर तुला राग आला तर हे भित्रे, मी पुनः तुला विनोदाचें भाषण करणार नाहीं; हे सुंदर हास्यवदने, आतां कोपाचा त्याग कर. मी तुला मस्तकानें नम्र झालों, म्यां तुला हातही जोडले. आणि आतां तुझ्याशीं खरें बोलेन........तेव्हां ती पार्वती शिवानें धरलेलें आपलें वस्त्र ओढून केश अस्ताव्यस्त झालें असतां तशीच वेगानें जाण्याची इच्छा करूं लागली. **शिव**—हे प्रिये, तूं सर्व अंगांनीं आपल्या पित्यासारखीच कन्या सत्य आहेस...............अतिकठोर हृदयापेक्षांही तुझें हृदय अत्यंत कठिण आहे, यामुळेंच तूं पूर्वींही आह्मांपासून बहुवार वनांत गेलीस............**पार्वती**—इतर गुणीजनांस दोष देऊन व्यर्थ त्यांची निंदा करूं नको. तुलाच दुष्टांच्या संबंधानें हे सर्व दोष प्राप्त झाले आहेत. ते असे कीं सर्पापासून तुला अधिक कुटिलत्व प्राप्त झालें आहे. भस्माच्या योगानें लोकांत विश्वास दाखवितोस. आणि चंद्रामुळें तुझ्या अंतःकरणास कालुष्य ( मलीनता ) व नंदीच्या योगानें मनास दुर्बोधत्व प्राप्त झालें आहे. असो, तुझ्याबरोबर फार बोलून उपयोग काय आहे? तस्मात् आतां

ह्या वाचेनें श्रम करणें पुरे; स्मशानांत वास करण्यानें तूं निर्भय झाला आहेस. नग्नपणामुळें तुला लज्जा नाहीं; नरकपाल धारण करण्यामुळें तुला निर्दयत्व प्राप्त होऊन तुझ्या तर मनांतील दया चिरकाल गेली आहेः—

तया बहु किमुक्तेन अलंवाचा श्रमेण ते ॥
स्मशानवासान्निर्भीत्वं नग्नत्वान्न तव त्रपा ।
निर्घृणत्वं कपालित्वाद्दया ते विगता चिरं ॥

"असें भाषण करून पार्वती त्या मंदिरांतून चालली असतां त्या कालीं शिवगणांनीं किलकिल शब्द केला..... पार्वतीनें जातेसमयीं वीरकनामक एका गणास असें सांगितलें कीं, मी निंद्य नसून तूं काळी आहेस अशी शिवानें माझी निंदा केली; यास्तव ज्या तपानें गौरवर्ण मला प्राप्त होईल तें तप मी अरण्यांत जाऊन करीन. आणि हा महादेव अत्यंत स्त्रीलंपट आहे ह्मणून मी वनांत गेलें असतां तूं निरंतर छिद्रावर लक्ष ठेऊन द्वाराचें रक्षण करः—

एष स्त्रीलंपटो देवो यातायां मय्यनंतरम् ।
द्वाररक्षा त्वया कार्या नित्यं रंध्रान्ववेक्षिणा ॥

"तें असें कीं, ज्या रीतीनें कोणीही स्त्री एथें शंकराजवळ येणार नाहीं अशा रीतीनें रक्षण कर, आणि एथें परस्त्रिया तुझ्या दृष्टीस पडल्या तर तूं मला तें वर्तमान कळीव." (म० पु० अ० १५४. १–३२.)

शिवाच्या पराक्रमांपैकीं कित्येक येणेंप्रमाणें आहेत. त्यानें त्रिपुर, अंधक, रुरु इ० दैत्य मारिले.

शिवाचे पराक्रम.

त्रिपुरासुराचीं तीन गांवें घेण्याकरितां पृथ्वीचा रथ, ब्रह्मदेवास सारथी व विष्णूस बाण केला,

व पुष्य नक्षत्राचा योग साधून त्यांचा नाश केला ( भार० द्रो० प०). एका दैत्यास मारण्याकरितां त्याला पार्वतीच्या पासून पुत्र होण्याची आवश्यकता होती ह्मणून तो योग-ध्यानांत निमग्न असतां मदनानें (कामदेवानें) त्याची चेष्टा केली, तेव्हां त्याला राग येऊन त्यानें आपला तृतीय नेत्र उघडून कामाला जाळून भस्म केलें. यावरून त्याला मद-नांतक असें नांव पडलें. त्याचा सासरा दक्षप्रजापति यानें त्याला यज्ञास बोलाविलें नाहीं ह्मणून त्यानें त्याचें शिर तोडून त्याच्या स्थानीं मेंढयाचें मुंडकें बसविलें. याच कार-णामुळें शिवदर्शनास जाणारे त्याच्या देवळांत गेल्याबरोबर बकरूं किंवा मेंढरूं ओरडल्यासारिखा शब्द करितात. तसेंच ब्रह्मदेवानें त्याचा एकदां अपमान केल्यावरून त्यानें त्याच्या पांच शिरांपैकीं एक छेदून टाकिलें.

त्याचा तमो-गुण; रुद्राक्ष.

शिव हा तमोगुणी असून प्रत्येक कल्पाच्या शेवटीं स-कल जीवांचा संहार करितो. एका कल्पांत त्यानें ब्रह्मा, विष्णु व सर्व देव यांचा सं-हार करून त्यांचे मुंडक्यांच्या माळा करून आपल्या गळ्यांत घातल्या आणि त्यांच्या अस्थींचें भस्म अं-गास चर्चिलें; यावरून त्याच्या पूजेंत भस्माचें मोठें माहात्म्य आहे. रुद्राक्षनामक मणि याला प्रिय आहेत; त्यांची उत्पत्ति अशी आहे कीं, तो त्रिपुराचा नाश करायास जात असतां मार्गांत रागानें त्याच्या डोळ्यांतून अश्रू पडले, त्यांचे हे मणि झाले.

शिव कैलासीं राहतो. कैलास हिमालयाच्या उत्तरेस मानससरोवराजवळ आहे. तेथें नंदिकेश्वर व दुसरे त्याचे गण आहेत. देवांचा भांडारी कुबेर हाही तेथेंच राहातो. शिवभक्त मरणानंतर कैलासास जाण्याची इच्छा बाळगितात.

कैलास व नंदी.

विष्णूच्या अवतारांप्रमाणें शिवाचे यथाक्रम व बहुत अवतार नाहींत; वीरभद्र, अष्टभैरव, व रुद्र हे त्याचे अवतारांपैकीं मानिलेले आहेत.

त्याचे अवतार.

विष्णूप्रमाणें शिवाला सहस्र नामें असून वर ८ जास्ती आहेत; त्यांत शंभु, शंकर, ईश्वर, हर, रुद्र, महादेव हीं प्रख्यात आहेत.

त्याचीं सहस्र नामें.

शिवालयीं शिवदर्शनास जाणारे लोक बहुधा जो श्लोक ह्मणतात तो येणेंप्रमाणें:—

शिवदर्शनाचा श्लोक.

प्रातःकाले शिवं दृष्ट्वा निशिपापं विनश्यति ।
आजन्मकृतं माध्यान्हे सायान्हे सप्तजन्मनि ॥
मेरुकांचनदत्तानां गवां कोटिशतैरपि ॥
पंचकोटितुरंगाणां तत्फलं शिवदर्शनम् ॥

शिवाची भक्ति लिंगाच्या द्वारें करितात. त्याची बायको पार्वती हिलाही त्याच्या बरोबर पूजितात, ती त्याची शक्ति आहे; ह्या उभयतांची जी एकत्र पूजा करितात ती लिंग व योनि ह्यांची करितात; मनुष्याकृतीची व वर वर्णिलेल्या शिवरूपाची पूजा करीत नाहींत. लिंगाचें माहात्म्य पुराणांत व भारतांत फार

लिंग व शक्तिउपासना.

वर्णिलें आहे. अठरा पुराणांपैकीं शैवमताचे एका पुराणास लिंगपु० असें नांव आहे.

भारतांत (अनुशासनपर्व अ० १४) उपमन्युनामक ऋषि असें ह्मणतो कीं:—

लिंगमाहात्म्य.

" महादेव दुसऱ्या कोणत्या हेतूस्तव सर्व कारणांचें कारण झाला आहे? देव दुसऱ्या कोणाचेही लिंगाची पूजा करितात असें आह्मीं ऐकिलें नाहीं. महादेव खेरीजकरून दुसऱ्या कोणाचें लिंग देवांनीं पूजिलें असलें तर सांगा? यास्तव ज्याचें लिंग ब्रह्मा, विष्णु व इंद्रादि देव नित्य पूजितात तो श्रेष्ठ होय. ज्या अर्थी लेंकरांस ( ब्रह्माचें ) पद्म, ( विष्णूचें ) चक्र, अथवा ( इंद्राचें ) वज्र यांतून कशाचें चिन्ह नाहीं, परंतु लिंग व भग ( पुरुषाचीं व स्त्रीचीं जननेंद्रियें ) आहेत, त्या अर्थी महादेवापासून संतति होते असें समजावें. सर्व स्त्रियांच्या उत्पत्तीचें कारण देवी ( पार्वती ) आहे, आणि सर्व पुरुष हराच्या ( महादेवाच्या ) चिन्हानें अंकित आहेत, जो कोणी महादेवाखेरीज दुसरें कारण आहे असें ह्मणतो, किंवा त्रिभुवनांत एक तरी स्त्री देवीच्या चिन्हावांचून आहे असें ह्मणतो, तो मूर्ख बाहेर हांकून लाविला जावो; प्रत्येक पुरुष ईशान आहे, आणि प्रत्येक स्त्री उमा आहे. कारण हें चराचर जग ह्या दोन शरीरांनीं व्याप्त आहे."

वरील उताऱ्याचें संस्कृत मूल " ज्या अर्थी लेंकरांस " ह्या वाक्यापासून शेवटपर्यंत येणेंप्रमाणें आहे:—

न पद्मांका न चक्रांका न वज्रांका यतः प्रजाः ।
लिंगांका च भगांका च तस्मान्माहेश्वरी प्रजा ॥

देव्याः कारणरूपभावजनिताः सर्वां भगांकाः स्त्रियो ।
लिंगेनापि हरस्य सर्वंपुरुषाः प्रत्यक्षचिन्हीकृताः ॥
योऽन्यत्कारणमीश्वरात्प्रवदते देव्या च यन्नांकितं ।
त्रैलोक्ये सचराचरे स तु पुमान्बाह्यो भवेद्दुर्मतिः ॥
पुल्लिंगं सर्वमीशानं स्त्रीलिंगं विद्धि चाप्युमाम् ।
द्वाभ्यां तनुभ्यां व्याप्तं हि चराचरमिदं जगत् ॥ ३३–३५

शिवभक्तीचा प्रसार.

हिंदुस्थानांत शिवाचीं मुख्य व प्रसिद्ध देवालयें एक हजार आठ आहेत असा प्रो. सर मा. विल्यम्‌स यांच्या ग्रंथांत लेख आढळतो.

---

## प्रकरण ४.
## त्रिमूर्तींचें परस्परांशीं वर्त्तन.
### (१) दक्षयज्ञ.

शिवाचा दक्षप्रजापति नामक सासरा होता. हा दक्ष ब्रह्मदेवाच्या मानस पुत्रांपैकीं असून सर्व प्रजापतींचा अधिपति होता. यानें एक वेळ अश्वमेध केला, तेव्हां त्याच्या उत्साहाला सर्व देव चालले असतां पार्वतीनें कैलासावरून पाहून शिवास विचारिलें कीं, आपण यज्ञास कां जात नाहीं? शिव ह्मणाला, मला यज्ञभाग देऊं नये अशी पूर्वींपासून देवांची चाल आहे. प्राचीन व्यवस्थेप्रमाणें देव यथान्याय (धर्मतः) मला यज्ञविभाग देत नाहींत. हें ऐकून पार्वतीला फारच दुःख वाटलें. तें पाहून शिवानें आपल्या गणांसुद्धां जाऊन दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस केला. तेव्हां तो यज्ञ मृगरूपानें आकाशमार्गीं गेला त्याच्या मागें शिव लागला असतां त्याच्या कपाळापासून घामाचा थेंब

पृथ्वीवर पडला, त्यापासून अग्नि उत्पन्न झाला, व त्या अग्नीपासून ज्वर ( ताप ) उत्पन्न झाला, त्यानें तो यज्ञ जाळला व सर्व देवांस पळविलें. हें पाहून ब्रह्मदेवानें सर्व देव यापुढें तुला यज्ञविभाग देतील असें वचन शिवाला दिलें, आणि ज्वराला पृथ्वीवर सोडावें असें त्यापासून मागून घेतलें. याप्रमाणें शिवाला यज्ञभाग मिळूं लागला, व ज्वर ( ताप ) लोकांत विख्यात झाला, व तोच आतां सर्वांस पीडा करीत आहे. ही कथा महाभारत, शांतिपर्व, अ० २८४ यांत आहे. तींत शिव इतर देवांच्या ठरावाविषयीं जें बोलला त्याचें मूळ येणेंप्रमाणें आहे:—

सुरैरेव महाभागे पूर्वमेतदनुष्ठितम् ।
यज्ञेषु सर्वेषु मम न भाग उपकल्पितः ॥
पूर्वोपायोपपन्नेन मार्गेण वरवर्णिनि ।
न मे सुराः प्रयच्छंति भागं यज्ञस्य धर्मतः ॥ ( १७ )

ब्रह्मदेवानें शिवाची जी समजूत केली तिचें मूळः—

भवतोऽपि सुराः सर्वे भागं दास्यंति वै प्रभो ।
ज्वरो नामैष धर्मज्ञ लोकेषु प्रचरिष्यति ॥
इत्युक्तो ब्रह्मणा देवो भागे चापि प्रकल्पिते ।
भगवंतं तथेत्याह ब्रह्माणममितौजसम् ।
परां च प्रीतिमगमदुत्स्मयंश्च पिनाकधृक् ।
अवाप च तदा भागं यथोक्तं ब्रह्मणा भवः ॥

ह्या कथेंत दोन गोष्टींकडे लक्ष्य द्यावें. एक ही कीं, "ब्रह्मरूप व देवाधिदेव" जो शिव त्याला पूर्वीपासून यज्ञभाग मिळत नव्हता, व तो ब्रह्मदेवाच्या मध्यस्थीनें मिळूं लागला. दुसरी गोष्ट ही कीं आतां लोकांस जो ताप लागतो त्याची उत्पत्ति शिवापासून आहे, व ब्रह्मदेवाच्या सूच-

नेनें तो पृथ्वींत संचार करीत आहे. भागवतपुराणांत हा यज्ञभाग विष्णूनें शिवाला देवविला असें सांगितलें आहे. ( भाग० ४. ७. )

**( २ ) ब्रह्मा विष्णु यांचें भांडण.**

एकदां विष्णु व ब्रह्मा यांचें श्रेष्ठत्वाविषयीं मोठें भांडण लागलें असतां, तें मिटवून उभयतांची समजूत करण्याकरितां त्याच्या पुढें एक तेजोमय लिंग उत्पन्न झालें. त्याच्या सर्वभागीं सहस्रावधि ज्वालांची माला होती, व तें प्रलयकाळच्या सहस्र अग्नींसम होतें; त्याला क्षय व वृद्धि नव्हती आणि आदिअंतही नव्हता. त्यास पाहून विष्णु व ब्रह्मा हे उभयतां मोहित झाले. विष्णु ह्मणाला कीं, आपण हा अग्नि कोठून निघतो हें ह्या अनुपम स्तंभाच्या खालीं जाऊन पाहूं. मग विष्णु वराहरूप व ब्रह्मा हंसरूप होऊन सहस्र वर्षेंपर्यंत त्या लिंगाचें मूळ पहावयास गेले. पण त्यांस त्याचा शोध लागला नाहीं. शेवटीं ते उभयतां थकून दमून वर आले. आणि परमेश्वरा ( शिवा ) पुढें साष्टांग नमस्कार करून ह्मणाले, हें काय आहे ? नंतर ओम् ओम् असा स्पष्ट व दीर्घकालस्थित शब्द त्यांस ऐकूं आला. तो शब्द कशाचा असेल असा ते विचार करीत उभे असतां त्यांनीं त्या लिंगाच्या उजव्या भागीं अकार हें अक्षर पाहिलें, त्याच्या मागून उकार पाहिला; मध्यें मकार पाहिला; आणि त्या नादापासून ओम् हा ध्वनि निघत होता.

ही कथा लिंगापुराणांत ( अ० १ ) आहे.

**( ३ ) रुद्र व नारायण यांचें युद्ध.**

रुद्र ( शिव ) व नारायण यांचें एकदां युद्ध लागलें

होतें त्याची कथा महाभारतांत ( शांतिपर्व, मोक्षधर्म, अ० १६९) सांगितली आहे. त्या वेळीं देव व ऋषि यांसहित ब्रह्मदेव येऊन शंकराला ह्मणाला कीं, "नारायणाच्या प्रसादापासून मी झालों, तूं त्याच्या क्रोधापासून झालास तेव्हां सर्व देवांसहित सर्वांनीं नारायणास शरण जावें, मग शंकरानें क्रोध टाकून तो नारायणास शरण गेला."

त्याच पर्वांत दुसऱ्या ठिकाणीं कृष्ण ह्मणतो कीं, "विष्णु आपणाशिवाय कोणाची भक्ति करीत नाहीं. मीच रुद्ररूप आहें, ह्या अर्थानें मात्र मी रुद्राची उपासना करितों."

**( ४ ) शैवमतास ब्राह्मणाचा शाप.**

भृगुऋषीनें विष्णूस लाथ मारिली हें वर सांगितलेंच आहे ( **विष्णु** पाहा ). ह्याच ऋषीनें दक्षयज्ञांत शैवमतास शाप दिला, तो येणेंप्रमाणें:—

"जे शिवव्रत धारण करणारे व त्यास जे अनुसरून वर्तणारे ते सच्छास्त्रविरोधी असे पाखंडी होवोत. आणि जटा, भस्म, रुद्राक्ष धारण करणारे ते पवित्राचारहित मूढबुद्धि ज्यांत गुड, पिष्ठ व मधु यांपासून झालेला सुरा व ताडादि वृक्षांपासून झालेलें मद्य हें जीमध्यें मुख्य, पूज्य व ग्राह्य आहे अशा शिवदीक्षेंत गमन करून भ्रष्ट होवोत. तसेंच वर्णाश्रमाचारानें वर्तणाऱ्या मनुष्यांस मर्यादारूप जो वेद व त्या मर्यादेनें आचरण करणारे ब्राह्मण यांची तुम्ही यस्मात् निंदा करीत आहां तस्मात् तुझी पाखंड मार्गाश्रय करणारे झालां. त्या वेदमर्यादामार्गाचें लक्षण असें कीं, ज्यास जनार्दन भगवान् मूलकारण असल्यावरून पूर्वींच्या ऋषींनीं ज्याचा आश्रय केला, यास्तव हाच वेदमर्यादारूप

मार्ग सर्वांस कल्याणकारक व अनादि आहे. असा सज्जनांचा सनातन व शुद्ध जो परमश्रेष्ठ वेदमार्ग त्याची तुह्मीं निंदा केली यास्तव ज्यांत तामसजनांचा अधिपति रुद्र हें तुमचें दैवत आहे, अशा पाखंडमार्गांत प्रवेश करा." ( भागवत पु० स्कं० ४. अ० २. श्लो० २८–३१. )

याचें मूळः—

भवव्रतधरा ये च ये च तान्समनुव्रताः।
पाखंडिनस्ते भवंतु सच्छास्त्रपरिपंथिनः॥
नष्टशौचा मूढधियो जटाभस्मास्थिधारिणः।
विशंतु शिवदीक्षायां यत्र दैवं सुरासवम्॥
ब्रह्म च ब्राह्मणांश्चैव यद्यूयं परिनिंदथ।
सेतुं विधारणं पुंसामतः पाखंडमाश्रिताः॥
एष एवहि लोकानां शिवः पंथाः सनातनः।
यं पूर्वे चानुसंतस्थुर्यत्प्रमाणं जनार्दनः॥
तद्ब्रह्म परमं शुद्धं सतां वर्त्म सनातनम्।
विगर्ह्य यात पाषंडं दैवं वो यत्र भूतराट्॥

---

## प्रकरण ९.—दशावतारवर्णन.

### उपोद्घात.

पुराणांत वर्णिलेले देव व देवी यांनीं अनेक काळीं व अनेक कारणांस्तव पृथ्वीवर अवतार धारण केले असें सांगितलें आहे. त्या सर्वांत विष्णूचे अवतार पुष्कळ असून प्रमुख व प्रसिद्ध आहेत. भागवतपुराणांत त्याचे २२ अवतार सांगितले आहेत, आणि असें ह्मटलें आहे कीं, "ज्याप्रमाणें अपार सरोवरापासून ओढे वाहतात त्याप्रमाणें वि-

ष्णूचे अवतार असंख्य आहेत. ऋषि, मनु, देव, मनुपुत्र, प्रजापति हे सर्व त्याचे अंश होत":—

अवताराह्यसंख्येया हरेः सत्वनिधेर्द्विजाः ।
यथाविदासिनः कुल्याः सरसः स्युः सहस्रशः ॥
ऋषयो मनवो देवा मनुपुत्रा महौजसः ।
कलाः सर्वे हरेरेव सप्रजापतयस्तथा ॥ ( भा.१.३.२६,२७ )

आणि ह्या अनेक अवतारांविषयीं ह्या पुराणाचें असें मत आहे कीं, केवळ राक्षसांस मारण्याकरितांच विष्णूनें अवतार घेतले असें नाहीं तर मनुष्यांस ज्ञानोपदेश करण्यासाठींही तो अवतीर्ण झाला:—

मर्त्यावतारस्त्विह मर्त्यशिक्षणं रक्षोवधायैव न केवलं विभोः ।
( भा. ५. १९. ५. )

दहा अवतारांखेरीज जे दुसरे अवतार भागवतांत सांगितले आहेत ते येणेंप्रमाणें:—पुरुष, नारद, नर आणि नारायण, कपिल, दत्तात्रेय, यज्ञ, ऋषभ, पृथु, धन्वंतरी, व वेदव्यास. तथापि इतर ग्रंथांत त्याचे मुख्य दाहा अवतार प्रसिद्ध आहेत, व लोकांतही दहा अवतारांच्या कथांची विशेष माहिती आहे.

अवतारांचीं कारणें.

गीतेंत कृष्ण ह्मणतो कीं, "जेव्हां जेव्हां धर्मास ग्लानि येते तेव्हां मी युगायुगाच्या ठायीं जन्म घेतों आणि साधूंचें रक्षण करून व दुष्टांचा नाश करून धर्मसंस्थापना करितों."

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥
परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ( गीता. ४. ७, ८ ).

ही धर्मसंस्थापना उपदेशाच्या, सुशिक्षणाच्या किंवा सुवर्तनरूप उदाहरणाच्या योगेंकरून करायाची नव्हती, तर साधूंचें रक्षण व दुष्टांचा नाश करून करायाची होती.

मत्स्यपुराणांत सांगितलें आहे कीं, युगयुग धर्म फिरला असतां तशा अव्यवस्थित काळीं भूमीवर विष्णु अवतार घेतो. देव आणि असुर यांच्या कलहांचे प्रसंगीं तो अवतार घेतो. ( म० पु० अ० ४७, श्लो० ३२, ३४. )

विष्णूच्या बहुतेक अवतारांचें कारण भृगु, शुक्र इ० ऋषींचा त्यास शाप होय. वामन अवतारांत तर तो धर्मसंस्थापनेकरितां आला नव्हता, पण कोणी एका धार्मिक राजाचा नाश करायास आला होता.

अवतार घेण्याविषयीं पृथ्वी व देव यांची विष्णूस विनंती.

पृथ्वीवर दैत्य दानव माजून गोब्राह्मणांस पीडा करूं लागले ह्मणजे पृथ्वीनें गायीच्या रूपानें ब्रह्मदेवापाशीं जावें; ब्रह्मदेवानें तिला घेऊन विष्णूपाशीं जावें; मग मी अवतार घेऊन भूमिभार उतरीन असें वचन देऊन विष्णूनें त्यांस माघारें लावावें. तसेंच कित्येक प्रसंगीं ब्रह्मदेवप्रमुख सर्व देव विष्णूला शरण जात. नंतर विष्णु त्यांस दर्शन देऊन अथवा अशरीरवाणीनें अवतीर्ण होण्याचें वचन देत असे. ( भाग. १० स्कं. वि. पु. अं. ५ अ. १ पाहा. )

कृष्णावताराच्या आरंभीं पृथ्वी व सर्व देव ब्रह्मदेवाला प्रमुख करून क्षीरसागराच्या उत्तर तीरीं गेले. तेथें ब्रह्मदेवानें विष्णूची स्तुति केल्यावर विष्णु त्याला ह्मणाला, "तुला व ह्या देवांस काय पाहिजे तें सांग, बोलायाला भिऊं नको, तुझें काम खचीत होईल."

भो भो ब्रह्मंस्त्वया मत्तः सह देवैर्यदिष्यते ।
तदुच्यतामशेषं तु सिद्धमेवावधार्यताम् ॥ वि. पु. अं. ५. अ. १. ५५

"तेव्हां ब्रह्मदेव पुनः स्तुति करून ह्मणतो, हे भगवन् आह्मांवर दया कर. पाहा, ही पृथ्वी असुरांनीं पीडिली आहे, आणि तिच्या पर्वतांचे पाये कंपायमान झाले आहेत. ही आपला भार उतरावा ह्मणून तुला शरण आली आहे. पाहा, मी, इंद्र, वरुण, यम, इ० सर्व देव तुझ्या इच्छेप्रमाणें करायास आलों आहों. तूं आपल्या सेवकांस आज्ञा दे, आह्मी सिद्ध आहों."

आज्ञापयाज्ञां परिपालयंतस्तवैव तिष्ठाम सदास्तदोष ॥ (५८)

## १. मत्स्य.

ह्या अवतारीं विष्णु मासा झाला, त्याचीं दोन कारणें सांगतात; ह्मणजे एकदां ब्रह्मदेव निद्रिस्त असतां हयग्रीव नामक कोणी दैत्यानें वेद हरण केले, ते परत आणण्याकरितां विष्णूनें अवतार घेतला. (भा. स्कं. ८. अ. २४.) ह्या अवताराचा पूर्वसंबंध मनुराजास जलप्रलयाच्या काळीं जो मत्स्य प्रगट झाला होता त्याच्याशींही लावतात. (मत्स्यपु. अ. १.)

## २. कूर्म.

जलप्रलयांत कित्येक वस्तु समुद्रांत बुडालेल्या होत्या त्या वर काढण्याकरितां देवदानवांनीं मिळून समुद्रमंथन केलें. त्यासमयीं विष्णु कांसव होऊन समुद्राच्या मध्यभागीं राहिला. त्यावर देवांनीं मंदर पर्वत ठेवून त्या सभोंवतीं वासुकी सर्प वेष्टिला, आणि जशी दह्याच्या हांडींत रवि फिरवितात त्याप्रमाणें समुद्राचें मंथन केलें; तेव्हां त्यांतून अमृत, विष, मद्य, लक्ष्मी,

कौस्तुभ, ऐरावत, कामधेनु शंख, अप्सरा, चंद्र, इ० चौदा रत्नें वर आलीं. ( भा. स्कं. ८ अ. ८. )

### ३. वराह.

हिरण्याक्ष नामक एक दैत्य ब्रह्मदेवाच्या नाकांतून उत्पन्न झाला होता, त्यानें प्रबल होऊन पृथ्वी पाताळीं घातली. तेव्हां विष्णूनें वराह ( डुकराचा ) अवतार घेऊन समुद्रांत एक सहस्र वर्षें त्याशीं युद्ध केलें व पृथ्वी वर आणिली. ( भा. स्कं. ३. अ. १२ ) तैत्तिरीय ब्राह्मणांत ह्या कथेचें मूळ मिळतें तें असें कीं, "सर्व सृष्टि प्रथम जलमय होती. प्रजापतीनें डुकर होऊन त्यांत बुडी मारिली. त्याला खालीं पृथ्वी सांपडली. तिचा एक तुकडा मोडून काढून तो वर आला. तो त्यानें पुष्कर पर्णावर पसरला. तो भूत ( वस्तु ) झाला; त्यावरून पृथ्वीला भूमि असें नांव पडलें." रामायणांत ब्रह्मदेवानें पाण्यांतून पृथ्वी वर काढली असें सांगितलें आहे. दैत्यानें चोरून नेलेले वेद पाण्यांतून वर आणण्याकरितां हा अवतार झाला अशीही कथा आहे. विष्णुपुराणांत तर दैत्याची गोष्ट मुळींच नाहीं. "ब्रह्मा एका कल्पाच्या शेवटीं जागृत होऊन पहातो तर पृथ्वी पाण्यांत बुडालेली आहे, तेव्हां तिला वर काढण्याच्या इच्छेनें त्यानें वराहरूप धारण केलें." ( वि. पु. अंश १. ४. )

ह्या डुकराचें वर्णन पुराणांतरीं येणेंप्रमाणें आहे:—"तो

वराहाचें रूप.

दहा योजनें रुंद होता, त्याचा रंग काळ्या ढगासारिखा होता. त्याची गर्जना मेघासारिखी होती. त्याच्या डोळ्यांतून विजेप्रमाणें अग्नि चम-

कत असे. तो सूर्याप्रमाणें तेजस्वी होता इ०." असा जो वराह तो पृथ्वीच्या उद्धारार्थ रसातळीं गेला. ॥ पृथिव्युद्धरणार्थाय प्रविवेश रसातलम् ॥ ( वायु. पु. )

### ४. नरसिंह.

हिरण्यकशिपु नामक दैत्यानें ब्रह्मदेवापासून असा वर मिळविला होता कीं, त्याला देव, मनुष्य किंवा पशु यांतून कोणाच्याही हातून मरण येऊं नये. यामुळें तो इतका पराक्रमी झाला कीं त्यानें तिन्ही लोक जिंकिले, व देवांचे यज्ञही हरण करूं लागला. त्याला प्रल्हादनामक पुत्र होता तो विष्णुउपासक होता. त्याचा त्यानें अनेक प्रकारें छळ केला. त्याला अग्नींत टाकिलें, समुद्रांत बुडविलें, विष प्यायाला दिलें, त्याजवर मोठमोठे पर्वत रचले; तरी तो मरेना, व विष्णूची भक्ति करणें सोडीना. याप्रमाणें त्याचा नाश करण्यासाठीं अनेक प्रयत्न करून थकला. पुढें असें झालें कीं, विष्णु सर्वव्यापी व सर्वसमर्थ आहे असें प्रल्हाद ह्मणत असे त्याची परीक्षा पाहण्याकरितां त्याच्या बापानें आपल्या महालांतील एका दगडी खांबांत विष्णु आहे काय असें पुत्रास विचारिलें. त्यानें होय, आहे, असें ह्मटल्यावर बापानें क्रोधयुक्त होऊन त्या खांबास लाथ मारिली, तेव्हां विष्णु नर व सिंह यांचें संयुक्तरूप धारण करून खांबांतून प्रगट झाला, आणि हिरण्यकशिपू

आपल्या नखांहीं फाडून टाकलें.[1] विष्णूनें प्रल्हादास वर माग ह्मणून सांगितल्यावर त्यानें आपल्या बापाच्या अपराधांची क्षमा करावी असें मागितलें. आणखी कांहीं माग असें विष्णूनें ह्मटलें, तेव्हां जें त्यानें मागितलें तें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. "तुजवरील माझा विश्वास क्षय न पावो." (तेषुतेष्वच्युता भक्तिरच्युतास्तु सदा त्वयि ॥ वि० पु० १. १८.) यांत ग्रंथकारानें च्युत आणि अच्युत ह्या शब्दांचा श्लेषालंकार केला आहे. देवीभा० स्कं० ४, अ०१६ व मत्स्यपु० यांतही ह्या अवताराची कथा आहे.

### ५. वामन.

हा त्रेतायुगांत झाला. याचें कारण असें होतें कीं, प्रल्हादाचा नातू बलि हा इंद्रपदप्राप्तीकरितां यज्ञ करीत असतां त्याला विघ्न आणण्यासाठीं अदितीच्या उदरीं जन्म घेऊन वामन बटुरूपानें ( ठेंगण्या विद्यार्थी ब्राह्मणाच्या रूपानें ) त्यापाशीं तीन पावलें भूमिदान मागायास आला. त्या समयीं बलिराजा त्याला असें ह्मणाला कीं, मजसारिख्या त्रिलोकाच्या प्रभूपाशीं इतकें हलकें दान मागावें हें योग्य नाहीं.

---

१ खांबांतून नरसिंह प्रगट झाल्याची कथा लोकांत फार प्रसिद्ध आहे, तरी ती भागवत पुराणाशिवाय दुसऱ्या पुराणांत फारच संक्षेपानें सांगितली आहे. ह्या अवताराची मूर्ति देवळांत क्वचित् दृष्टीस पडते. श्रावणमासांत नृसिंहजयंतीनामक सण येतो, त्या दिवशीं अळवाच्या पानावर किंवा कागदावर नरसिंहाचें चित्र काढून त्याची पूजा करितात. त्याला कोणी कोणी 'नरस्या' ह्मणतात. हा सण बहुतकरून बायकांचा आहे. दक्षिण महाराष्ट्रदेशांत नरसोबाची वाडी ह्मणून स्थान आहे तेथें नृसिंहाचें देवालय आहे.

तेव्हां वामनानें त्याला असें उत्तर दिलें कीं, हे राजा, तूं यद्यपि जगत्पालक अप्रतिम दाता आहेस, तथापि मी यापेक्षां अन्य विषयाची इच्छा धरीत नाहीं. जो अजितेंद्रिय आहे त्याला त्रिलोकांतील सर्व विषय दिले तरी त्याची तृप्ति होत नाहीं. जो तीन पावलें भूमीनें तृप्त होत नाहीं त्याला सगळें द्वीप व सर्व खंडें दिलीं तरी तो तृप्त होणार नाहीं. यास्तव हे परम उदारा, मला केवळ तीन पाद भूमीची इच्छा आहे; माझा चरितार्थ चाले इतकें मिळालें तर बस आहे." (भाग. स्कं. ८. अ. ९.)

वामनाचें हें कपट बलीचा गुरु शुक्राचार्य ह्यानें जाणून भूमिदान न देण्याविषयीं राजास निषेधरूप बोध केला; परंतु बलीनें त्याचें न ऐकतां वामनाच्या हातावर भूमिदानाचें उदक सोडिलें[1]. तेव्हां वामनानें आपलें शरीर मोठें करून एका पावलांत पृथ्वी व दुसऱ्यांत आकाश व्यापून तिसरें पाऊल बलीच्या मस्तकावर (कोणी ह्मणतात त्याच्या शरीरावर) ठेवून त्याला पाताळीं घातलें. ही कथा रामायण, महाभारत, मत्स्यपुराण व भागवत यांत आहे. हिचें मूळ ऋग्वेदांत आहे. तेथें विष्णु ह्या सृष्टीवर चालून गेला, त्यानें आपलें पाऊल तीन ठिकाणीं ठेविलें, असें सांगितलें आहे,

---

१ हें उदक सोडण्याच्या संबंधानें अशी कथा सांगतात कीं बलिराजा भूमिदानाचें उदक सोडित असतां शुक्र सूक्ष्म देह धारण करून त्याच्या हातांतील झारीच्या तोंडाशीं जाऊन बसला, तेव्हां उदक बाहेर पडेना, ह्मणून वामनानें काडी घेऊन नळींत घातली, तेणेंकरून शुक्राचा एक नेत्र फुटला. याच कारणामुळें एकडोळ्या मनुष्यास शुक्राचार्य ह्मणतात; आणि शुक्राचा तारा पिचका दिसतो

व त्याला त्रिविक्रम ह्मटलें आहे ( ऋ. १. २२. १. ७. ). जुन्या भिंतीला गिलावा करून तिजवर हें चित्र काढलें आहे. बलीला जरी वामनानें पाताळीं घातलें तरी लोकांस त्याच्या राज्याची आवड होती असें दिसतें. बलिप्रातिपदेच्या दिवशीं घरांतील केरकचरा बाहेर टाकतेवेळीं थाळी वाजवून 'इडापिडा जावो, बलीचें राज्य येवो' असें ह्मणण्याची चाल अद्याप लोकांत आहे.

ह्या चार अवतारांस मत्स्यपुराणांत "दिव्य अवतार" ह्मटलें आहे, बाकीचे सहा "मनुष्य अवतार" होते.

### ६. परशुराम.

परशुराम हा जमदग्नि ऋषीचा पुत्र होता. त्याच्या मातेचें नांव रेणुका; ती क्षत्रिय वंशांतली होती. त्यानें मोठें तप केल्यावर शिवानें प्रसन्न होऊन त्याला एक कुऱ्हाड ( परशु ) बक्षीस दिली, ( महाभारत, शांतिपर्व. ) तिच्या योगानें तो मोठा पराक्रमी झाला. त्या वेळीं क्षत्रियांचें पृथ्वीवर मोठें प्राबल्य होतें. ते ब्राह्मणांवर फार जुलूम करीत. कार्तवीर्यनामक क्षत्रिय राजानें जमदग्नीची गाई हरण करून नेली, त्यावरून मोठा कलह वाढून परशुरामानें त्याचा वध केला; नंतर राजाच्या पुत्रांनीं जमदग्नीचा वध केला. तेव्हां परशुरामानें सर्व क्षत्रियांचा निःपात करण्याची प्रतिज्ञा करून सर्व भरतखंडांत एकवीस वेळ हिंडून तें निःक्षत्र करून टाकिलें. कित्येक क्षत्रियांचीं मुलें त्यांच्या मातांनीं ऋषींच्या आश्रमांत नेऊन सोडिलीं, त्यामुळें क्षत्रियांचा वंश पृथ्वीवर राहिला.

परशुरामानें क्षत्रियांच्या रक्तानें पांच डोह भरले, ते **रामऱ्हद** अशा नांवानें प्रसिद्ध झाले. त्या रक्तानें ऋचीकादि पितरांस तर्पणद्वारा तृप्त करून त्यानें संपूर्ण भारतवर्षीय भूमि कश्यपास दान केली, व आपण तप करीत स्वस्थ राहिला. तथापि अमुक स्थळीं क्षत्रिय आहे असें कळलें कीं, लागलाच जाऊन त्यास मारी. त्यावरून कश्यपानें त्यास सांगितलें कीं, मला दिलेल्या भूमींत तुला क्षत्रिय वधण्याचा अधिकार नसून तींत तुला राहणेंही अनुचित आहे. तेव्हां तो समुद्रापाशीं येऊन स्थळ मागूं लागला. त्यानें त्याला जो प्रांत दिला त्याचें नांव त्यानें शूर्पारक देश असें ठेविलें. ज्याला हल्लीं **कोंकण** ह्मणतात तोच हा देश होय, असें विद्वान् हिंदु ग्रंथकारांचें मत आहे.

रामऱ्हद व कोंकण.

एकदां परशुरामाच्या आईचें वर्तन त्याच्या बापास न आवडल्यामुळें त्यानें तिचा वध करायास आपल्या चौघां पुत्रांस सांगितलें,परंतु त्यांनीं त्याची आज्ञा मान्य केली नाहीं. मग ह्या पांचव्या पुत्रानें ह्मणजे परशुरामानें तिचा शिरच्छेद केला. नंतर त्याच्याच प्रार्थनेवरून जमदग्नीनें तिला पुनः जीवंत केलें.

रेणुकेचा वध.

परशुरामाची कथा रामायण ( बालकांड ) व भारत (द्रोण-आदि-शांति-वनपर्व ) ह्यांत आहे.

परशुराम हा जरी विष्णूचा अवतार होता तरी त्यानें जे क्षत्रिय मारिले त्यांच्या हत्येचें पाप त्याला लागलें असें महाभारताच्या अनुशासनपर्वांत स्पष्ट सांगितलें आहे. त्यानें ह्या पा-

क्षत्रहत्येचें पाप.

पाच्या परिहारार्थ सर्व दोषांपासून शुद्ध करणारा असा जो अश्वमेध तो केला, आणि ब्राह्मण व क्षत्रिय यांस पूजिलें, तरी त्याच्या मनाची शांति होईना. तेव्हां तो वेदसंपन्न ऋषि व देव यांप्रत जाऊन विचारूं लागला कीं, उग्रकर्मे ( घातकी कामें ) करून ज्याचें मन दूषित झालें त्यानें शुद्ध होण्याकरितां काय करावें. तेव्हां त्यांनीं ब्राह्मणांस बहुत दक्षिणा द्यावी असें सांगून त्याविषयीं ब्रह्मऋषींचा आणखी अभिप्राय घेण्याची त्याला मसलत दिली; मग तो वसिष्ठ, अगस्त्य व कश्यप यांपाशीं गेला. त्यांनीं त्याला ब्राह्मणांस गोदान, भूमिदान व विशेषेंकरून सुर्वणदान द्यायास सांगितलें. त्याप्रमाणें केल्याबरोबर विष्णूचा अवतार जो परशुराम, जो पृथ्वीचें रक्षण करायास आला होता त्याचें पाप लागलेंच जाऊन तो शुद्ध झाला:—

इत्युक्तः स वसिष्ठेन जामदग्न्यः प्रतापवान् ।
ददौ सुवर्णं विप्रेभ्यो व्यमुच्यत च किल्बिषात् ॥

ब्राह्मणांस सुर्वणदान केल्याचें हें महाफळ !

परशुरामाचा रामानें पराजय केला. परशुरामाला भार्गव असें दुसरें नांव आहे. तो महेंद्र पर्वतीं अद्याप तप करीत आहे असें लोक समजतात.

परशुराम हा विष्णूचा अवतार असतांही त्याची भक्ति रामकृष्णादिकांच्या भक्तीप्रमाणें वाढली नाहीं.

### ७. राम.

सूर्यवंशीं इक्ष्वाकु कुलांत अज नामक राजा होता, त्याचा पुत्र दशरथ, त्याचा पुत्र राम. रामाच्या मातेचें नांव कौसल्या. दशरथास सुमित्रा

रामाची वंशावली.

आणि कैकयी अशा दुसऱ्या स्त्रिया होत्या, त्यांपासून लक्ष्मण, शत्रुघ्न व भरत असे तीन पुत्र होते.

रामचरित्र.

रामाची सविस्तर कथा रामायणांत आहे. तिचा सारांश असा आहे कीं, रामाचें लग्न जनकराजाची कन्या जानकी किंवा सीता हिच्याशीं लागलें. दशरथराजाची रामावर अत्यंत प्रीति असे. "रामचंद्र सर्व धर्मवेत्ता, बृहस्पतीसारिखा बुद्धिमान्, असा होता." ( महाभा. व. प. अ. २७७.) त्याला राज्याभिषेक करण्याचा दशरथानें संकल्प केला असतां कैकयीनें मध्यें विघ्न आणून त्याला चौदा वर्षें वनवासांत पाठविलें. त्याच्या समागमें सीता व लक्ष्मण हीं गेलीं. रामानें हा वनवासाचा बहुतेक काळ दंडकारण्यांत घालविला.

सीतेचें पातिव्रत्य.

"रामाबरोबर सीता होती. राम जीं फलमूलें अथवा मृगमांस भक्षण करी तें तिनेंही करावें. तिनें रामाला अरण्यांत असतां कधीं दुःख दिलें नाहीं. मृदु वचनेंकरून त्याच्या अंतःकरणास संतोष करून वागे. हिला रावणानें हरण केल्यावर अशोकवनांत ठेविलें होतें. तिला वश करण्याकरितां रावणानें ज्या राक्षसी ठेविल्या होत्या त्यांनीं सामोपचार व भीति, इ० बहुत प्रकार करून पाहिले, परंतु ही त्या सर्वांची अवगणना करून राहिली. एकदां राक्षसींनीं हिला इतकी भीति दाखवून त्रास दिला कीं, त्या दिवशीं हिनें गळफांस घेऊन प्राणत्याग करावा असा निश्चय केला. परंतु तेथें मारुति जाऊन पोंचला होता, त्यानें गुप्तरूपानें तिची अवस्था अवलोकन करून सखेदांतःकरण होत्साता तिला

प्रत्यक्ष झाला, व रामाकडून तुझ्या शुद्धीकरितां मी आलों आहें असें सांगून रामनामांकित मुद्रा तिच्या पुढें ठेविली. नंतर परस्परांचें भाषण होऊन त्यानें हिला आश्वासन दिलें कीं, तूं कांहीं चिंता करूं नको, मी एथून गेलों कीं राम लवकरच येऊन रावणाचा वध करून तुला अयोध्येस घेऊन जाईल."

सीताहरणाचें कारण.

सीतेला रावणानें लंकेंत घेऊन जाण्याचें कारण असें झालें कीं, राम दंडकारण्यांत असतां त्यानें तेथील संपूर्ण राक्षसांचा नाश करून तें ब्राह्मणांस राहण्याकरितां निर्भय केलें. त्या नाशांत त्यानें रावणाचे खर व दूषण नामक दोघे बंधु मारिले व त्यांची बहीण शूर्पनखा इचें रूप लक्ष्मणानें भग्न केलें, ह्मणजे तिचे स्तन व नाक छेदिलें; ह्याचा सूड उगविण्याकरितां रावणानें सीतेला धरून लंकेस नेलें. तें असें कीं राम पंचवटींत असतां मारीच राक्षस सुवर्णरूप असा मृगवेश धारण करून रावणाच्या सांगण्यावरून तेथें आला. त्या वेळीं सीतेनें याच्या चर्माची मला कंचुकी ( चोळी ) असावी अशी इच्छा रामास दर्शविली, ह्मणून राम त्याच्या मागें गेला, तसाच लक्ष्मणही मागून हिनेंच पाठविला. त्यामुळें रावणास सीतेला धरून नेण्याची संधि सांपडली. त्यानें भिक्षुकाचें रूप धरून पर्णकुटींत एकटी राहिलेली जी सीता तिला आपल्या खांद्यावर बसवून नेलें.

सीताहरणाचें दुसरें कारण हरदास लोक कथेंत असें सांगतात कीं, सीतेच्या लग्नाच्या वेळीं तिच्या बापानें आपल्या जवळच्या एका धनुष्याला जो कोणी गुण चढवील

त्याला ती मिळेल असा पण लाविला होता. त्या समयीं जनकाच्या सभेस बहुत राजे आले होते. त्यांत रावणही होता. त्यानें तें धनुष्य उचलल्याबरोबर तो खालीं पडला व त्याच्या उरावर तें बसलें. मग रामचंद्रानें आपल्या पायानें तें उचलून दूर केलें. ह्या अपमानाचा सूड उगविण्याकरितां रावणानें सीता नेली. ही कथा रामायणांत किंवा भारतांतील रामोपाख्यानांत नाहीं.

रावण.

" रावण हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र पुलस्त्यऋषि याचा पौत्र ( नातू ) व विश्रवाऋषीचा पुत्र होता. ह्याला दहा शिरें व वीस भुजा होत्या. याचें मुळचें नांव दशग्रीव; पुढें रावण पडलें. याच्या आईचें नांव कैकसी व स्त्रीचें नांव मंदोदरी असें होतें. रावणानें दशसहस्र वर्षें तप करून आपलीं नऊ शिरें ब्रह्मदेवास अर्पिलीं, आणि दहावें अर्पिणार तों ब्रह्मदेवानें त्याला अमरत्वाचा वर दिला. तो असा कीं, देव, दैत्य, दानव, नाग, यक्ष इ० कोणाच्या हातून त्याला मृत्यु नसावा. मनुष्य तर त्याला तृणवत् भासत असे, ह्मणून त्यानें मनुष्यापासून मरण नसावें असें मागितलें नाहीं. हा पुढें लंकेचा राजा झाला. एकदां हा कैलासास गेला होता तेथें नंदीचें वानरासारिखें रूप पाहून याला हंसूं आलें, त्यावरून नंदीनें यास शाप दिला कीं, तुझा नाश वानरच करितील. मग हा क्रुद्ध होऊन कैलासपर्वत उचलण्यास यत्न करूं लागला, तेव्हां महादेवानें तो पर्वत दाबिला. तेणेंकरून रावणाचे हात खालीं सांपडून तो रडूं लागला. शेवटीं शिवाचें स्तवन केल्यावर त्यास चंद्रहास नांवाचा खड्ग देऊन त्याची मुक्तता केली. राव-

णानें पुष्कळ देव, दानव व गंधर्व यांच्या सुंदर कन्या धरून आणून लंकेंत ठेविल्या होत्या. हा शिवभक्त होता. याची वेदांमध्यें चांगली गति होती. यानें वेदांचे अध्य। यांप्रमाणें खंड बांधले आहेत. याशिवाय ब्राह्मण जीं वेदांचीं पदें ह्मणतात तीं यानेंच करून ठेविलीं. अध्याय-नाच्या दृढीकरणार्थ क्रम, घन, जटा ह्यानेंच कल्पिल्या." ( भा. व. प्रा. ऐ. कोशावरून संक्षेप. )

बिभीषण.

रावणाचे बिभीषण व कुंभकर्ण असे दोघे बंधु होते. बिभीषणानेंही तप करून वर मिळविला, पण तो रावणाच्या वरासारिखा नव्हता. त्यांचें मागणें असें होतें कीं, "मी परम आपत्तीस प्राप्त झालों असतांही माझी बुद्धि धर्माच्या जागीं ( टीकेंत, नारायणाच्या जागीं ) असावी व मला गुरूपदेशावांचून ब्रह्मविद्या स्फुरद्रूप व्हावी. आणि ज्या आश्रमामध्यें मला जी जी बुद्धि उत्पन्न होईल ती बुद्धि धर्मिष्ठ व्हावी." असा वर देऊन अप्रार्थितही ( मागितल्या-वांचून ) अमरत्व ब्रह्मदेवापासून त्याला मिळालें. ( वा. रा. उत्तरकांड, अ. १०. )

कुंभकर्ण.

कुंभकर्णानेंही तप केलें. त्याला ब्रह्मदेव वर देऊं लागला तेव्हां सर्व देव आडवे येऊन ह्मणाले कीं, ह्याला वर देऊं नये, यानें सात अप्सरा व महेंद्राचे दहा सेवक भक्षिले. तसेच ह्यानें अनेक ऋषि व मनुष्य भक्षिले. ह्याला वर दिला तर हा त्रिभुवन भक्षण करील. तर याला कपटेंकरून मोह ह्मणजे अज्ञान द्यावें. तेव्हां ब्रह्मदेवानें आपली कन्या सरस्वती किंवा वाचा ( वाणी ) हिला त्याच्या मुखांत प्रवेश करायास सांगितलें;

त्याप्रमाणें तिनें केल्यावर ब्रह्मदेवानें त्याला वर मागायास सांगितलें. तेव्हां तो बोलला कीं, अनेक वर्षें निद्रा घेणें मला इच्छित आहे. असें ह्मणतांच ब्रह्मदेव "तसेंच असो" असें ह्मणून निघून गेला, आणि सरस्वतीनें त्याला सोडून दिल्यावर तो स्वकीय बुद्धीप्रत प्राप्त झाला. मग मनांत दुःखित होऊन अशा रीतीचें काय माझ्या मुखांतून निघालें असा विचार करूं लागला. नंतर देवांनीं मला फसविलें असें समजून स्वस्थानीं परत गेला. ( वा. रा. उत्तरकांड अ. १० संक्षेप. )

त्याच्या तपाचें कारण, काळ व क्रिया.

रावणानें जें तप केलें तें पुण्य किंवा स्वर्गप्राप्तीकरितां ह्मणून नव्हतें, तर आपला बंधु वैश्रवण याच्यासारिखें आपणास ऐश्वर्य प्राप्त व्हावें ह्या हेतूस्तव मातेच्या सूचनेवरून तो तपास प्रवृत्त झाला. हें तप त्यानें बांधवांसह, गोकर्णक्षेत्रीं केलें. त्याच्या व कुंभकर्णाच्या तपाचा काळ दहा हजार वर्षांचा होता. बिभीषणानें पांच हजार वर्षें तप केलें. रावण निराहारी असे. कुंभकर्ण उष्णकाळीं पंचाग्नींत उभा राही, पावसाळ्यांत मेघोदकानें भिजत असे, व हिंवाळ्यांत पाण्यांत उभा राही. बिभीषणानें एका पायावर उभें राहून तप केलें.

सीताशुद्धि, अंगदशिष्टाई, रामसेना व युद्ध.

रामानें सीतेकरितां बहुत शोक केला; तिच्या शोधार्थ मारुतिनामक एक वानर लंकेंत पाठविला, तेथें त्याला तिचा शोध लागल्यावर त्यानें परत येऊन रामाला वर्त्तमान सांगितलें. मारुतीच्या ह्या कामगिरीस **सीताशुद्धि** ह्मणतात. नंतर रामानें मोठें वानरसैन्य मिळवून लंकेवर स्वारी केली. युद्धास

आरंभ होण्यापूर्वीं साम करण्यासाठीं अंगदनामक वानर रामाकडून रावणाकडे गेला; परंतु त्याच्या हितोपदेशाचा रावणानें अनादर केला. अंगदाच्या मध्यस्थीला **अंगदशिष्टाई** ह्मणतात. रामाचें व रावणाचें युद्ध बरेच दिवस मोठ्या निकरानें झालें; शेवटीं रावणाला रामानें मारिलें, आणि सीतेला सोडवून आणिलें. रामसेनेंत नीलनामक वानर सेनापति होता; सुग्रीव, हनुमंत इ० वीर होते. अस्वलही शिपाई होते, त्यांचा सरदार जांबुवंत होता. रावणाचा भाऊ बिभीषण हा युद्धारंभींच रामास येऊन मिळाला. त्याचा दुसरा भाऊ कुंभकर्ण व पुत्र इंद्रजित हे युद्धांत मरण पावले.

इंद्रजिताची कांता सुलोचना हिनें आपल्या पतीबरोबर सहगमन केलें याविषयीं मराठींत एक सुरेख लावणी आहे, परंतु ही गोष्ट त्या काळीं झाल्याचा पुरावा नाहीं. तो वैदिक काल होता व सती जाण्याची चाल आर्य लोकांत अद्याप शिरली होती असें ह्मणवत नाहीं. रावणस्त्री मंदोदरी ही सुलाचनेप्रमाणें लावणींत ह्मटल्याप्रमाणें "यशाची गुठी उभावून गेली नाहीं."

कुंभकर्णाला जरी अनेक वर्षांच्या निद्रेचा वर होता तरी तो वर्षांतून सहा महिने झोंप घेत असे. त्याच्याकरितां रावणानें एक योजन रुंद व दोन योजनें लांब असें मंदीर बांधलें होतें. त्याला युद्धप्रसंगीं उठविण्यास रावणानें जे उपाय केले ते येणेंमाणें होते.—"त्याच्या मंदिरद्वाराशीं मृग, महिष, वराह इ० पशूंचे समुदाय उभे केले. अन्नाच्या राशि सिद्ध करून रुधिराचे कुंभ भरून ठेविले. अनेक प्रकारचीं पुष्पें, चंदन

कुंभकर्णी निद्रा.

तसींच सुवासिक तैलें यांची व्यवस्था ठेवून नंतर आंत राक्षसांस पाठविलें; ते याच्या श्वासानें उडून मागें पडूं लागले. शेवटीं त्यांनीं त्यास हलविणें, शंख, भेरी इ०चे शब्द करणें, असे प्रयत्न करून पाहिले. मग त्याच्या शरीरावर गजपशूंचा समुदाय चालविला, कानांत जलकुंभ ओतले. तेव्हां हा जागा झाला. मग त्यानें स्नान व भोजन करून दोन सहस्र मद्याचे घट प्राशन केले !! "

बिभीषणास लंकेचें राज्य मिळतें.

रामानें रावणास वधिल्यावर त्याच्या जागीं बिभीषणास राज्यपदावर बसविलें. बिभीषण चिरंजीव असून तो अद्याप लंकेंत राज्य करीत आहे असें हिंदुलोक मानितात.

रावणवधाचें पातक.

रामास रावण मारल्याचें ब्रह्महत्यारूप पातक लागलें, कारण रावण पुलस्त्य ऋषीचा नातू होता. हें पातक जाण्याकरितां त्याला अश्वमेध करावा लागला !

रामराज्याचा काल.

राम अयोध्येस परत येऊन राज्य करिता झाला. रामावताराचा एकंदर काल "दहा सहस्र व दहा शतकें" इतका होता; तो ब्रह्मदेवानें नेमला होता. तो समाप्त झाल्यावर ब्रह्मदेवानेंच त्याला ब्रह्मलोकास येण्याविषयीं बोलावणें पाठविलें. नंतर तो आपल्या दोघां पुत्रांस राज्यावर स्थापून आपण ब्रह्मलोकीं गेला. त्याच्या सहवर्तमान सर्व अयोध्यानगरी, भूत, प्रेतें, पिशाच, पशु, पक्षी हेही स्वर्गास गेले. ( रामायण, उत्तरकांड अ. १०४ ).

राम मोठा पित्राज्ञापालक, एकवचनी व एकपत्नी होता.

रामाचें गुण-वर्तन.

त्याच्या हातून कित्येक अनुचित कर्मेंही घडलीं. त्यांपैकीं एक असें होतें कीं, तो अरण्यांत वास करीत असतां वाली व सुग्रीव हे दोघे बंधु राज्यासाठीं आपसांत भांडत होते; त्यांतून सुग्रीवाशीं रामानें सख्य करून वृक्षाच्या आड लपून वालीस मारिलें, व सुग्रीवास राज्यपदावर बसविलें. तसेंच त्यानें आपली साध्वी स्त्री सीता हिचा ती रावणाच्या घरीं बहुत काळ राहिली एवढ्या जनापवादामुळें ती गरोदर असतां त्याग केला. त्या समयीं त्यानें जें भाषण केलें तें येणेंप्रमाणें:—

सीतात्याग.

"ज्या मला तुझ्या आचाराविषयीं संशय आहे अशी माझ्या सन्मुख स्थित जी तूं ती नेत्ररोग्यास दीपाप्रमाणें अत्यंत प्रतिकूल आहेस. तस्मात् हे जनककन्ये, तूं ह्या दशदिशांप्रत यथेच्छ जा, आज मी तुला निरोप देतों. कारण मला कांहीं तुझें प्रयोजन नाहीं, व कोणता कुलीन व त्यांतूनही तेजस्वी असा पुरुष, परक्याच्या गृहीं राहिलेल्या स्त्रियेस बहुत दिवसांच्या मित्रपणाच्या लोभमूलक जी ग्रहणेच्छा तद्युक्त अंतःकरणेंकरून तरी स्वीकारील? कोणी स्वीकारणार नाहीं. रावणाच्या मांडीवर तूं क्लेशयुक्त झाली असून पुनः ज्या तूं रावणाच्या दुष्ट कामदृष्टीनें अवलोकित केली अशा तुजप्रत मी महत्कुलव्यपदेश करीत होत्साता कसा ग्रहण करीन?" ( युद्धकांड, अ. ११७. ) पुढें अशी कथा आहे कीं, सीतेनें अग्निप्रवेश केला, आणि अग्नीनें तिला सजीव

बाहेर काढून रामाच्या मांडीवर बसविली, व रामानेंही ती पतिव्रता आहे असें जाणून तिचा अंगीकार केला. रामाला लव आणि कुश असे दोन पुत्र होते.

दुसरी कथा अशी आहे कीं, वाल्मीकीनें सीतेला रामापुढें बोलावून भूमीला तिचें निर्दोषत्व स्थापण्यास शपथ घातली, तेव्हां भूमीनें दुभागून तिला आपल्या पोटांत घेतलें.

तिसरी कथा ( भार० वनपर्व अ. २९१. ) अशी आहे कीं, रावणाचा वध झाल्यावर राम लंकेंत असतांच अविंध्यनामक राक्षसानें बिभीषणास पुढें करून सीतेस रामाच्या अग्रभागीं आणून तिचा स्वीकार करावा अशी विनंती केली, तेव्हां राम सीतेला ह्मणाला, "तूं आतां लंकेस माघारी जा. तुझें ग्रहण मी करीत नाहीं. माझा त्याग करून आजपर्यंत राक्षसगृहीं निर्दोष कशी राहशील? त्या दुरात्म्याच्या घरीं तुजसारिखें स्त्रीरत्न गेलें असतां उपभुक्त झाल्यावांचून राहणारच नाहीं. तुझ्यावर जारत्वशंका माझी झाली. आतां तूं सुवृत्त ऐस अथवा दुर्वृत्त ऐस, परंतु आतां तुझें ग्रहण करण्यास मी इच्छित नाहीं." नंतर सीतेनें आपल्या निर्दोषत्वाविषयीं आणाशपथा वाहिल्यावर अंतरिक्षांत वाणी झाली कीं, "सीता निष्पाप आहे." ती ऐकून रामचंद्र सीतेसहवर्तमान अयोध्येस आला.

वालीचा वध.

वाली व सुग्रीव यांच्या युद्धांत रामानें वालीस मारण्याचें सुग्रिवास वचन दिलें असतां तें पूर्ण केलें नाहीं ह्मणून सुग्रीव त्याला दोष देऊं लागला, तेव्हां त्यास राम ह्मणाला कीं, तुह्मी उभयतां युद्ध करूं लागलां

तेव्हां तूं आणि वाली मला अगदीं सारखे दिसलां, ह्मणून मला शंका आली कीं, जर मी वाली समजून बाण सोडला आणि तो तुला लागला तर मित्राचा घात होईल, ह्मणून बाण सोडला नाहीं. यास्तव आतां मी तुला कांहीं चिन्ह करितों. मग रामानें गजपुष्पीनामक वल्ली सुग्रीवाच्या गळ्यांत खुणेकरितां बांधिली. ( किष्किंधाकांड. अ. १३. ) ईश्वरी अवताराच्या ठायीं सर्वज्ञता असली पाहिजे. रामाला जे ईश्वरी अवतार मानितात त्यांनीं ह्या त्याच्या गुणाभावाचा विचार करावा.

सेतुबंधन.

रामानें लंकेस जाण्याकरितां जो समुद्रावर सेतु ( पूल ) बांधला त्याचे पाषाण पाण्यावर तारिले अशी हिंदु लोकांची समजूत आहे, परंतु तिला रामायणांत आधार नाहीं. सेतु बांधण्याचें काम रामानें नलाकडे सोपविलें होतें, व त्याच्या आज्ञेनें हजारों वानरांनीं वृक्ष ओढून आणून समुद्रांत टाकिले. तसेंच त्यांनीं पाषाण व पर्वत यंत्रांनीं वाहून आणिले. ते पाषाण समुद्रांत टाकतांना त्याचें जल आकाशापर्यंत उडालें. सर्व सेतु पांच दिवसांत शंभर योजनें बांधला, अशी कथा आहे. ( वा. रा. युद्धकांड, अ. २२. ) हा पूल बांधण्याकरितां वानरांनीं हिमालयपर्वतांतून मोठमोठे पाषाण आणिले; त्यांतून कित्येक त्यांनीं मार्गांत टाकिले ते अद्याप तसेच पडले आहेत असें हिंदुलोक समजतात. मथुरेजवळ गोवर्धननामक जी टेंकडी आहे ती ह्या वानरांच्या हातून पडलेल्या पाषाणांपैकीं आहे !

त्याचें दौर्बल्य.

राम किती दुर्बल होता हें इंद्रजितानें त्याला व लक्ष्मणाला युद्धांत नागपाशानें बद्ध केलें ह्या गोष्टीवरून दिसून येतें. ह्या पाशांत राम लक्ष्मण मूर्च्छित होऊन पडले. तेव्हां सर्व देवांनीं घाबरें होऊन वायूला रामाकडे पाठवून तूं विष्णु आहेस; तूं आपलें जें वाहन गरुड त्याचें स्मरण कर ह्मणजे तो तुला सोडवील असें त्याला सुचविलें. गरुड येऊन त्याच्या समोर उभा राहतांच त्याच्या वासानें सर्व नाग सर्प पळून गेले, आणि ही अवतारी बांधवांची जोडी पाशमुक्त झाली.

अगस्त्यऋषि रामास शत्रु जिंकण्याचा मंत्रोपदेश करितो.

आणखी एक कथा अशी आहे कीं, ( वा. रा. युद्धकांड. अ० १०६. ) रावणाशीं दीर्घकाळ युद्ध करून त्रस्त झालेला राम शत्रस कसें जिंकावें अशा चिंतेनें युक्त व रावणापुढें धनुष्यास टेंकून स्थित असतां युद्ध अवलोकनार्थ देवतांसहवर्तमान आलेला अगस्त्य ऋषि रामाजवळ येऊन सूर्योदयसमयीं असें वचन बोलला:—“हे मुला रामा, ज्या स्तोत्रेंकरून सर्व शत्रूंस तूं जिंकिशील असें जें आदित्यहृदय स्तोत्र त्याचा जप कर.” राम ईश्वरी अवतार आहे व स्वपराक्रमानें शत्रूस जिंकण्यास समर्थ आहे असें जर कवीला वाटलें असतें तर त्यानें हें मंत्रजपाचें प्रकरण त्याच्या चरित्रांत घातलें नसतें.

महाभारतांत ( वनपर्व, रामोपाख्यान ) रामाची कथा आहे. धर्मराजाच्या वेळीं वाल्मीक रामायण उपलब्ध नव्हतें, किंवा धर्मास रामासारिख्या अवतारी पुरुषाची कथा ठाऊक नव्हती अशी शंका मनांत येण्याजोगा प्रश्न धर्मराजानें मार्कंडेय ऋषीस केला तो असाः—"राम कोणाचे कुलांत उत्पन्न झाला? त्याचें वीर्य काय? रावण कोणाचा पुत्र व त्याशीं वैर कशाकरितां झालें?" रामोपाख्यानांतील मुख्य विषय रामायणांतील कथेप्रमाणेंच आहे, तरी त्यांत कित्येक गोष्टी वेगळ्या आहेत; त्यांत विशेष ही आहे कीं, राम परमात्म्याचा अवतार व ब्रह्मरूप होता असें दर्शविलें नाहीं. त्याचें अवतारधारण विष्णूच्या इच्छनें झालें नाहीं, तर ब्रह्मदेवानें त्याला भूमीवर पाठविलें, व त्याच्या अवतारासंबंधी सर्व गोष्टींची पूर्वव्यवस्था त्यानेंच केली; ह्मणजे इंद्रादि देवांस वानरांच्या रूपानें पृथ्वीवर जन्मून विष्णूस सहाय करायास आज्ञापिलें. त्यानेंच दुंदुभी नामक गांधर्वीस पृथ्वीवर मंथरा नामें करून दासीच्या जन्मास जाण्यास सांगितलें. तिनें भरताला राज्यासनावर बसविण्यासाठीं दशरथास वारसा सांगण्याची कैकईस भर दिली; कारण सिता लंकेंत गेल्याशिवाय रावणाचा वध व्हावयाचा नव्हता. रामचंद्रानें रावणाचा वध केल्यानंतर त्यास ब्रह्मदेवानें दर्शन देऊन वर मागण्यास सांगितलें. तेव्हां त्यानें तीन वर मागितले ते असेः—धर्माच्या ठायीं स्थिति, शत्रूपासून अपराजय व राक्षसांनीं मारलेले वानरांचें पुनरुज्जीवन. ( वनपर्व. अ. २९१.) कवीच्या मनांत रामचंद्र परब्रह्म व ईश्वरी अवतार होता

भारतांतील रामोपाख्यान.

असें असतें, तर त्याला ब्रह्मदेवापाशीं असे वर मागायास त्यानें लाविलें नसतें.

राम निजधामास जाते वेळीं त्याच्या बरोबर अयोध्या नगरीचे लोक गेले, त्यांस ब्रह्मलोकीं जागा द्यावी अशी रामानें ब्रह्मदेवाची विनंती केली. तसेंच रामायणांत कुंभकर्णाला जी दीर्घ निद्रा होती ती ब्रह्मदेवाच्या शापानें प्राप्त झाली असें सांगितलें आहे; परंतु भारतांत हा झोंपाळूपणा त्याला त्या देवाचा वर होता असें ह्मटलें आहे. रावणाचा नाश कसा करावा याविषयीं मसलत करण्यासाठीं देवांची सभा भरली होती तेव्हां ब्रह्मदेवानें असें भाषण केलें कीं, "रावणाला देव, दैत्य व राक्षस यांच्या हातून मरण येऊं नये असा मीं वर दिला आहे. तर हे देव हो त्याला, मनुष्य व वानर यांचें मात्र भय आहे. यास्तव हरि (विष्णु) मनुष्य होवो, व तुह्मी माकडें व्हा."

रामाची लिंगउपासना; रामेश्वर.

राम लिंगउपासक होता, त्यानें जो सेतु बांधला त्याच्या आरंभीं त्यानें शिवलिंगाची स्थापना केली, त्यावरून त्याला **सेतुबंध रामेश्वर** असें नांव पडलें, आणि रामानेंही त्याला स्वतां **रामेश्वर** असें नांव दिलें. (अध्यात्मरामायण.) ह्या पदाचे दोन अर्थ करितात, ह्मणजे रामाचा ईश्वर किंवा प्रभु; अथवा ज्याचा प्रभु राम तो देव. परंतु रामानें जें ह्या लिंगस्थापनेच्या वेळीं भाषष केलें त्यावरून पहिला अर्थ खरा दिसतो. तें भाषण असें:— "मनुष्यजातींत जो जन्मास येतो तो प्रत्येक रामेश्वराचे दर्शनास येवो, तो गंगेचें पाणी आणून लिंगाला अभिषेक करो. ह्या अभिषेकानें सर्व महा-

पातकांचा आणि ब्रह्महत्येचा देखील दोष परिहार होईल. तो देवाप्रमाणें शुद्ध होईल, आणि मरणकाळीं स्वर्गी जाईल."

### ८. कृष्ण.

रावणवधार्थ जसा रामावतार झाला तसा त्याच्या मागून कंसवधार्थ कृष्णावतार झाला. कृष्णाचा जन्म कंसाची राजधानी मथुरा एथें झाला. कंस त्याचा मामा असून त्याला ह्याच्या हातून आपला वध होईल असें भविष्य कळलें होतें, ह्मणून त्यानें आपली बहीण देवकी व तिचा नवरा वसुदेव यांस बंदिशाळेंत ठेविलें. तेथें त्यांस सात लेंकरें झालीं, तीं सर्व कंसानें मारिलीं.

कृष्णजन्म व त्याचें गोकुळास गमन.

शेवटीं आठवा कृष्ण झाला. तो जन्मतांच वसुदेवानें त्याला यमुनेच्या पलीकडील गोकुळ नामक गांवीं नेऊन नंद व यशोदा यांच्या घरीं ठेविलें व त्यांस न कळतां त्यांची त्याच दिवशीं झालेली तान्ही मुलगी घेऊन तो परत बंदिशाळेंत आला. कंसाला देवकी प्रसूत झाल्याचें कळल्यावर तो पूर्वक्रमाप्रमाणें बंदिशाळेंत जाऊन तिच्यापासून लेंकरूं घेऊन शिळेवर आपटणार होता, इतक्यांत तें त्याच्या हातांतून निघून स्वर्गांत गेलें आणि आकाशवाणी झाली कीं, " हे कंसा, तुझा वैरी जन्मला आहे, आणि आतां तूं जीवंत राहणार नाहींस."

कृष्णाचे बाळपणींचे चमत्कार.

कृष्णाच्या चमत्कारिक कथा अशा आहेत कीं, तो जन्मतांच त्याच्या आंगावर विष्णूचीं चिन्हें दिसलीं, ह्मणजे तो चतुर्भुज झाला. तेव्हां देवकीनें त्याची विनंती केली कीं, " हे देवाधिदेवा, हें रूप सोड, नाहीं तर कंस तुला ओळखील."

मग तो लहान बाळ झाला. वसुदेव त्याला गोकुळीं घेऊन जात असतां मार्गांत त्याजवर पर्जन्यवृष्टि होऊं लागली, तिजपासून संरक्षण करायास शेषानें आपली फणा त्याजवर पसरली, व यमुनेचें पाणी जरी खोल होतें तरी तें गुडध्याच्या वर चढलें नाहीं ( वि. पु. अं. ५. अ. ३. ). दुसरी कथा अशी आहे कीं, यमुनेच्या मनांत बालकृष्णाच्या चरणांस स्पर्श करायाचा होता, ह्मणून ती वर वर चढत वसुदेवाच्या नाकापर्यंत आली, तेव्हां कृष्णानें आपल्या पायाची करंगळी जलांत बुडवितांच ती खालीं गेली.

त्याचे बाळपणींचे शत्रू.

इकडे कंसानें अत्यंत क्रोधायमान होऊन गोकुळींचे सर्व बाळक मारण्याविषयीं आज्ञा केली. त्यानें पूतना नामक एक राक्षसी पाठविली, तिनें आपल्या स्तनांत विष भरून गोकुळांतील पुष्कळ मुलें दूध पाजून मारिलीं. शेवटीं कृष्णाला जेव्हां तिनें स्तन दिलें, तेव्हां त्यानें तिचा प्राणांत होईपर्यंत तें चोखून तिचा वध केला. बाळपणीं कृष्ण गोकुळांत नंदाच्या गाई रानांत घेऊन जाई. ( नंद गवळी होता. ) त्याला मारण्याकरितां कंसानें बकासुर, अघासुर, वत्सासुर असे अनेक दैत्य पाठविले. बकासुर बक पक्ष्याचें रूप धरून आला होता, त्यानें कृष्ण खेळत असतां त्याला गिळलें, पण तेणेंकरून त्याच्या अंगाचा दाह होऊन त्याला ओकून बाहेर टाकावें लागलें. मग कृष्णानें त्याचें तोंड चिरून त्याला मारिलें. अघासुरानें आपलें मुख इतकें पसरलें कीं तें एक गुहाच आहे असें जाणून त्यांत गोप गाई चरायास गेले. हें त्यांचें संकट पाहून कृष्णानें आंत शिरून मोठा देह धारण करून तें मुख फाडून टाकलें. वत्सासुर हा वासराच्या

रूपानें गोठ्यांत शिरला, त्याला कृष्णानें कवठीच्या झाडावर आपटून ठार केलें.

त्याच्या बाळपणींच्या खोड्या

कृष्ण बाळपणीं बहुत खोड्या करीत असे. त्यानें गवळणीचें दहीं, दूध, लोणी, चोरावें; त्यांच्या मडक्यांत विंचु, सरड, साप भरावे; त्या आपल्या पतीसह निजल्या असतां उभयतांच्या वेणी दाढीस ब्रह्मगांठी द्याव्या. ह्या खोड्यांचीं गाऱ्हाणीं जेव्हां यशोदेकडे जात तेव्हां तिनें त्याला दाव्यानें बांधावें, यावरून त्याचें दामोदर असें नांव पडलें. त्याला चांगलें गुण लागावे ह्मणून त्याची आई गणपतीला नवस करीत असे. इ० ( हरिविजय—प्राकृतग्रंथ. )

कृष्णाच्या क्रीडा.

कृष्ण गोकुळांत असतां गोपीसंगतीं अनेक क्रीडा करीत असे. एकदां त्या यमुनेंत स्नान करीत असतां तो त्यांचीं वस्त्रें चोरून कदंब वृक्षावर चढून बसला. एकदां त्यानें त्यांस नावेंत बसवून यमुनेंत जलक्रीडा करायास नेलें, तेव्हां नाव फुटून आंत पाणी येऊं लागलें असतां त्यानें त्यांस अंगांतील चोळ्या काढून त्यांचे बोळे लावायास सांगितलें. त्यानें एक वेळ त्यांच्या संगतीं रासक्रीडा केली, तींत तो अनेक कृष्णांचीं रूपें धरून दोन दोन गोपींच्या मध्यें एक एक कृष्ण होऊन त्यांसंगतीं नाचला.

कालियामर्दन.

यमुनेच्या डोहांत कालिय नामक एक मोठा विषारी सर्प राहत असे, त्या डोहाचें कृष्णाचे गोप गायींसहवर्तमान एकदां पाणी पिऊन मरण पावले, तेव्हां कृष्णानें डोहांत उडी टाकून कालियाशीं युद्ध

केलें. त्या सर्पानें त्याचें सर्वांग वेष्टिलें असतां ह्यानें त्याच्या फणेवर पाय देऊन नृत्य केलें, मग त्याच्या स्त्रिया कृष्णाला शरण आल्यावर त्यानें त्याला जीवदान दिलें, व यमुनाडोह सोडून जाण्यास सांगितलें. ह्या कृत्याला **कालियामर्दन** ह्मणतात.

गोवर्धनयज्ञ.

गोकुळांत नंद व गवळी प्रतिवर्षी इंद्रास यज्ञ करीत असत, परंतु कृष्णानें तो यज्ञ बंद करून गोवर्धनयाग चालू केला, व आपण गोवर्धन पर्वतावर बसून मद्यमांसादिकांचें अर्पण भक्षण करिता झाला. हें पाहून इंद्रास मोठा राग येऊन त्यानें अतिवृष्टि केली. तेव्हां कृष्णानें तो पर्वत आपल्या उजव्या हाताच्या करंगळीवर उचलून गवळ्यांचें रक्षण केलें. यावरून त्याला त्याचे भक्त गोवर्धनधारी असें ह्मणतात. ( गोवर्धन उचलल्यापेक्षां पर्जन्य बंद केला असता तर त्यांत त्याची दैवी शक्ति दिसून आली असती. राक्षस व रामाचे वानर हेही डोंगर उचलत असत अशा कथा आहेत. )

कंसवध

पुढें कृष्णानें मथुरेस जाऊन आपला मामा कंस यास मारून त्याचा बाप उग्रसेन याला राज्यावर स्थापिलें.

बलराम.

कृष्णाचा बलराम नांवाचा बंधु होता; तो नांगर, मुसळ ह्या आयुधांनीं युद्ध करी. त्यानें आपली बहीण सुभद्रा ही दुर्योधनास देण्याचें योजिलें असतां कृष्णानें अर्जुनास गोसाव्याचें रूप देऊन तिला त्याची सेवा करायास पाठवून त्याच्या बरोबर पळविली, व तिचें त्याशीं लग्न लावून दिलें. बलराम पराकाष्ठेचा रागीट व मद्यपी होता. तसेंच त्याला जुगाराचेंही

व्यसन होतें. ह्याला कोणी शेषाचा अवतार ह्मणतात, कोणी विष्णूच्या एका केशाचा अवतार समजतात, कोणी रामाच्या मागून झालेला जो आठवा अवतार तोच बलराम ह्मणतात. यानें एकदां ब्रह्महत्या केली, तिच्या प्रायश्चित्तार्थ त्याला पृथ्वीप्रदक्षिणा करावी लागली.

कृष्णाच्या स्त्रिया.

कृष्णाच्या मुख्य आठ स्त्रिया होत्या, शिवाय ज्यांस त्यानें नरकासुराच्या बंदींतून सोडविल्या अशा सोळा सहस्र होत्या. त्याच्या पट्टराणीचें नांव रुक्मिणी; ही प्रथम वसुदेवाचा भाचा शिशुपाल यास वाग्दत्त केली होती; ती आपल्या लग्नाच्या दिवशीं दुर्गेची पूजा करायास नगराबाहेरील देवळांत गेली असतां कृष्णानें तिला जबरीनें आपल्या रथांत घालून नेवून तिच्याशीं लग्न लाविलें. (हा धर्मशास्त्राप्रमाणें राक्षसविवाह होता.)

जरासंध; कृष्णाचें द्वारकेस पलायन.

कंसाचा वध झाल्यावर त्याचा सासरा मागधदेशाचा राजा जरासंध ह्यानें आपल्या जामाताचा सूड उगविण्याकरितां मोठें सैन्य जमवून मथुरेवर स्वारी केली. तेव्हां उग्रसेन, कृष्ण आणि मथुरा वृंदावन एथील सर्व लोक पळून पश्चिम हिंदुस्थानांत समुद्रतीरीं द्वारका नामक गांवीं जाऊन राहिले.

कृष्णाचें वर्तन.

याप्रमाणें कृष्णचरित्राच्या पूर्वार्धाचा संक्षेप आहे. त्यांत ईश्वरी अवताराचीं कांहीं लक्षणें दिसून येत नाहींत; इतकेंच नाहीं, तर मनुष्याच्या नीतीला देखील शोभण्यासारिखें त्याचें वर्तन होतें, असेंही ह्मणवत नाहीं. तें फार हलकट, विषया-

सक्त, अविचाराचें व जुलमाचें होतें. परंतु त्याच्या चरित्राच्या उत्तरार्धांत तो पोक्त व विचारशील, राजकारस्थानी, मसलती, कलह लागलेल्या पक्षांत मध्यस्थी करणारा, दुःखितांचें सांत्वन करणारा, शूर, मित्रबुद्धीचा असा दिसून येतो. यावरून कित्येक अशी कल्पना करितात कीं, महाभारत व हरिवंश ह्या दोन ग्रंथांत कृष्ण या नांवाच्या दोन निरनिराळ्या पुरुषांचें चरित्र आहे, अथवा निरनिराळ्या ग्रंथकारांनीं आपापल्या स्वभावास व लोकरुचीस व युगमाहात्म्यास अनुसरून लिहिलें आहे.

ह्या दुसऱ्या वर्णनांत देखील कृष्णाचें वर्तन निर्दोष होतें असें दिसत नाहीं. त्याचें अर्जुनावर परम प्रेम होतें, परंतु तें पक्षपाताचें होतें. भीमाचें व त्याचें पटत नसे. त्याचा भाऊ बळराम याचेंही त्याचें जमत नसे. शत्रुपक्षाकडील लोकांशीं तर तो कपटानें वर्तला; इतकेंच नव्हे, तर क्रौर्यानेंही वर्तला. युद्धांत दुर्योधन हतवीर्य होऊन पाण्यांत लपला असतां त्यास बाहेर आणण्याविषयीं भीमास त्यानें जी मसलत सांगितली, व युद्धसमयीं त्याच्या मांडीवर गदा मारण्यास जी सूचना केली ती त्याच्या गुणांला कलंक लावण्याजोगी होती. भीमानें दुःशासनास मारल्यावर त्याचा ऊर चिरून रक्त प्राशन केलें, ह्या अघोर कर्माबदल कृष्णानें त्याचा निषेध केला नाहीं. युद्ध संपल्यावर सर्व पांडव धृतराष्ट्रास भेटायास गेले, तेव्हां कृष्णानें भीमास त्याला न भेटवितां एक लोखंडाचा पुतळा त्याच्या पुढें उभा करून हा भीम आहे असें सांगितलें; कारण भीमानें दुर्योधन वगैरे बहुत कौरवांस मारिलें होतें, ह्मणून त्यावर तो राग काढील असें त्यांस भय होतें; आणि तसेंच

झालें. त्या अंध धृतराष्ट्रानें त्या लोहमय भीमास असें कडकडून आलिंगन दिलें कीं त्याचा भुगा झाला !

कृष्णावर स्यमंतकमणि चोरल्याचा आळ आला होता. ह्या मण्याविषयीं असें लिहिलें आहे कीं, " तो ज्या ठिकाणीं असेल तेथें दुर्भिक्ष, रोग इ० नसावे व यानें प्रत्यहीं आठभार सुवर्ण प्रसवावें." हा मणि कृष्णाचा सासरा ( सत्यभामेचा बाप ) सत्राजित याचा होता. एकदां तो द्वारकेस कृष्णाला भेटायास आला असतां त्याचा भाचा प्रसेन हा तो मणि कंठी धारण करून अरण्यांत मृगयेस गेला, तेथें त्याला सिंहानें मारिलें नंतर जांबुवंत किंवा जांबवान नामें ( रामावतारांतील ) वानरानें त्या सिंहास मारून तो मणि आपल्या गुहेंत नेला. इतकें होण्यापूर्वी कृष्णानें तो मणि उग्रसेनाजवळ असणें योग्य आहे असें सत्राजितापाशीं भाषण केलें होतें. त्यावरून कृष्णावरच त्या मण्याचा आळ आला, तो जाण्याकरितां कृष्णानें महत्प्रयास करून जांबुवंताची गुहा शोधून काढली व त्याच्याशीं युद्ध करून मणि परत आणिला. परंतु असें करण्यास त्याला जांबुवंताशीं एकवीस दिवस झोंबी खेळावी लागली. गुहेच्या बाहेर यादव होते ते कृष्ण बाहेर येण्याची सात आठ दिवस वाट पाहून तो मरण पावला असें समजून परत द्वारकेस आले; आणि कृष्णाच्या नातलगांनीं त्याची उत्तरक्रिया केली. ह्या क्रियेंत श्राद्धाचें जें अन्नोदक त्याला अर्पिलें त्याच्या योगानें गुहेंत युद्ध करायला त्यास शक्ति मिळाली ! ( वि. पु. अं. ४. १४ ). शेवटीं जांबुवंत पराजित झाल्यावर त्यानें मण्याबराबर आपली जांबुवंती नामक कन्याही कृष्णाला दिली.

स्यमंतक मण्याची गोष्ट.

पुढें सत्राजिताच्या मरणानंतर स्यमंतकमणि कोणापाशीं असावा याविषयीं सत्यभामा, बळराम व कृष्ण यांजमध्यें वाद उत्पन्न झाला, तेव्हां कृष्णानें यादवांची शिष्टसभा मिळवून त्या सर्वांमध्यें शुद्धाचारी जो अक्रूर नामें होता त्याला त्यानें असें ह्मटलें कीं, "हा मणि सर्व राज्यास हितकारक होण्याकरितां जो मनुष्य ब्रह्मचर्यव्रत धारण करितो त्याजपाशीं असला पाहिजे. जर तो अपवित्र मनुष्यानें धारण केला तर तो त्याच्या मरणास कारण होईल. मला तर सोळा हजार बायका आहेत, ह्मणून मी तो ग्रहण करायास योग्य नाहीं. बलराम तर अतिशय मद्यपी व विषयलुब्ध आहे, त्याच्यानें इंद्रियदमन करवत नाहीं; यास्तव आह्मांविषयीं विचार करायालाच नको. तर हे उदार अक्रूरा, सर्व यादव, बलराम, सत्यभामा व मी मिळून तुला विनंती करितों कीं, हा मणि तूं संभाळ. तूंच तो ग्रहण करावयास योग्य आहेस":—

एतत्सर्वकालं शुचिना ब्रह्मचर्येण च ध्रियमाणमशेषराष्ट्रस्योपकारमशुचिना ध्रियमाणमाधारमेव हंति ॥ अतोऽहमस्य षोडशस्त्रीसहस्रपरिग्रहादसमर्थो धारणे ॥ कथं चैतत्सत्यभामा स्वीकरोत्वार्यबलभद्रेणापि मदिरापानाद्यशेषोपभोगपरित्यागः कथं कार्यः तदलं यदुलोकोऽयं बलभद्रोऽहं सत्या च त्वां दानपते प्रार्थयामः ॥ इ० ॥ (वि० पु० अं० ४. अ० १३. ६८—७०)

कृष्णावताराचा शेवट.

कृष्णावताराचा शेवट फार कष्ट झाला. पांडवांचें युद्ध समाप्त झाल्यावर कृष्ण द्वारकेस जाऊन आपल्या मरणापूर्वीं आपलें सर्व यादवकुल कोणत्या उपयानें नाश पावेल याचें चिंतन करूं लागला. त्यानें सर्व यादवांस शंखोद्धारतीर्थी

(कोणी ह्मणतात प्रभासास) पाठविलें. तेथें त्यांनीं अति-शय मद्यपान करून त्याच्या धुंदींत आपसांत मोठा कलह माजविला, आणि अल्पकाळांत एकमेकांचा जीव घेऊन ते सर्व क्षय पावले. बलरामास हें वर्तमान समजतांच त्यानें समुद्रांत जीव दिला. नंतर कृष्ण एका झाडाखालीं उजव्या मांडीवर डावा पाय ठेवून बसला असतां कोणी एका पार-ध्यानें तो मृग आहे असें समजून त्याला बाण मारिला, ते-णेंकरून तो मरण पावला. त्याचें वय मरण काळीं "१२५ वर्षांचे जवळ जवळ होतें." (भारत वर्षीय प्रा० ऐ० कोश) कृष्णाच्या मरणाचें वर्तमान ऐकून वसुदेव व देवकी यांनीं प्राण सोडिले. त्याच्या अष्टनायका त्याच्या समागमें सती गेल्या. आणि शेवटीं द्वारका समुद्रानें बुडविली. कृष्णावताराचें वर्णन भारत, हरिवंश, विष्णुपुराण, भागवत-पुराण, प्रेमसागर, इ० ग्रंथांत आहे.

मत्स्यपुराणांत (अ. ६९) असें सांगितलें आहे कीं, "यादवकुल शून्य झाल्यावर अर्जुन कृष्ण-पत्न्यांस हस्तिनापुरास घेऊन जात असतां मार्गांत चोरांनीं त्यास जिंकून कृष्णाच्या स्त्रिया हरण केल्या, व ते नीच त्यांचा उप-भोग करूं लागले." पुढें दाल्भ्य ऋषीनें त्यांस भेटून वेश्याध-र्मानें (?) राहून अनंग नामक व्रत आचरण्याविषयीं उ-पदेश केला. (ह्या व्रताविषयीं ह्या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत पाहावें.)

कृष्णाच्या वरकड स्त्रिया वेश्या झाल्या; अनंगव्रत.

जशी रामानें शिवाची भक्ति केली तशी कृष्णानेंही केली, असें महाभारतांत सांगितलें आहे.—

कृष्णाची शिवभक्ति.

पूर्णं वर्षसहस्रं तु तप्तवानेष माधवः
प्रसाद्य वरदं देवं चराचरगुरुं शिवं ( अनु. प. १४. ११. )

**अर्थ.** "माधवानें ( कृष्णानें ) पूर्ण हजार वर्षें तप करून शिव जो जगाचा गुरु त्याला प्रसन्न केलें."

कृष्णाचें वय त्याच्या मरणकालीं सुमारें सवाशें वर्षांचें असतां त्यानें एक हजार वर्षें तप कसें केलें असेल?

शिवानें प्रसन्न होऊन कृष्णाला पाशुपतास्त्र व दुसरीं आयुधें दिलीं. ( वनपर्व. ) ह्याच ग्रंथाच्या द्रोणपर्वांत कृष्ण अर्जुनाला जयद्रथास मारायाकरितां तेंच अस्त्र महादेवापाशीं मागायास उपदेश करितो; यावरून कृष्ण ( किंवा ग्रंथकर्त्ता ) आपणाला जें मिळालें होतें तें विसरला असें दिसतें. कृष्णार्जुनांनीं महादेवाचा स्तव करितांना त्याला "परब्रह्म," "चराचराचा स्रष्टा", ब्रह्मवेत्याची तृप्ति करणारा'' अशा पदांनीं स्तविलें आहे. कृष्ण त्याला "सर्व भूतांचा ( प्राणिमात्रांचा ) आदि, मध्य व अंत" ह्मणतो. त्यानें पुत्रप्राप्तीकरितां ह्याच देवाची आराधना केली. जेव्हां तो हस्तिनापुरास पांडवांची वकिली करण्याकरितां निघाला तेव्हां आतां जसे भोळे हिंदुलोक सुमुहूर्त पाहतात तसा त्यानेंही कार्तिक मासांत सुदिन पाहून आणि सूर्य व अग्नि यांची पूजा करून प्रवासास आरंभ केला.

कौरवपांडवांच्या युद्धांत धृतराष्ट्राचें सैन्य येतांना पाहून त्याच्या पराभवार्थ कृष्णानें अर्जुनाला दुर्गेची स्तुति करायास सांगितलें. हें स्तोत्र भारतांतील भीष्मपर्वांत आहे.

कृष्ण अर्जुनास दुर्गेची स्तुति करावयास सांगतो.

कृष्ण जरी भारतांत महादेवाला "सर्व देवांपेक्षां श्रेष्ठ" व "परब्रह्म" असें ह्मणतो, तरी कित्येक ठिकाणीं तो आणि आपण एक आहें असेंही ह्मणतो. असें असूनही बाणासुराच्या खटल्यांत कृष्ण व महादेव यांचें मोठें युद्ध झालें, व कृष्णानें महादेवावर जृंभण नामक अस्त्र फेंकून त्याला मूर्छित केलें, अशीही कथा आहे.

कृष्णानें अर्जुनास युद्धाच्या वेळीं तत्त्वज्ञानाची अठरा अध्याय गीता सांगितली, ती भारताच्या भीष्मपर्वांत आहे. ह्या गीतेंत जो संवाद आहे तो युद्धसमयीं खरोखर झाला नाहीं असें कित्येक हिंदु टीकाकारांचें देखील मत आहे. ग्रंथमाहात्म्य वाढावें ह्मणून कृष्णार्जुनांचीं नांवें त्यांत घातलीं आहेत; व हें गीताशास्त्र जशा इतर गोष्टी भारतांत पाठीमागून घुसडून दिल्या तसें बहुत काळानंतर घुसडून दिलेलें आहे. "असे पुष्कळ संवाद विद्यांचे स्तुत्यर्थ आहेत. उपनिषदांत जनक आणि याज्ञवल्क्य यांचा संवाद असाच आहे. तो खरोखरी झाला असें नाहीं तो केवळ ग्रंथाचे स्तुत्यर्य आहे. तसाच हाही गीतासंवाद गीताशास्त्राचे स्तुत्यर्थ आहे." (रघुनाथशास्त्रीकृत भाषा विवृत्तिसहित गीता. उपोद्घात.) भगवद्गीतेंतील अध्यात्मज्ञानाविषयीं मागें सांगितलेंच आहे.

भगवद्गीता.

ह्या गीतेविषयीं आह्मी ह्या पुस्तकांत ( खंड २ प्र.४ ) यांत सांगितलेंच आहे. एथें इतकेंच

अनुगीता.

सांगावेंसें वाटतें कीं, भगवद्गीतेचें तेज न्यून करावें ह्या हेतूनें ही दुसरी गीता कोणी ब्राह्मणानें महाभारतांत बहुत काळानंतर घुसडून दिली आहे. परंतु तिच्या कर्त्याचा हेतु फारसा सिद्धीस गेला असें दिसत नाहीं, महाराष्ट्रदेशांत तर हिची माहिती विशेष नाहीं. हिचें मराठींत भाषांतर झालें नाहीं, व मूळ संस्कृतही कोणी वेगळें काढून प्रसिद्ध केलें नाहीं. सुप्रसिद्ध विद्वान् जस्टिस तेलंग यांनीं मात्र तिचें इंग्लिश भाषांतर केलें, व तें Sacred Books of the East ह्या ग्रंथमालिकेंत त्यांच्या भ० गी० च्या भाषांतरासहित छापून प्रसिद्ध झालें आहे.

### ९ बुद्ध.

ह्या अवताराविषयीं विष्णुपुराणांत येणेंप्रमाणें सांगितलें आहे ( वि. पु. अं० ३. अ० १८. ):—

बौद्धावताराचें कारण; मायामोह.

" एकदां देव दैत्य यांच्या मध्यें युद्ध होऊन देवांचा पराजय झाला. तेव्हां देवांनीं विष्णूला शरण जाऊन दैत्यांचा नाश करण्यासाठीं प्रार्थना केली. मग विष्णूनें आपल्या अंगांतून मायामोह काढून देवांस दिला, आणि सांगितलें कीं, हा दैत्यांस वेदधर्माचा त्याग करायास लावील. कारण देव, दैत्य अथवा कोणीही जे वेदधर्माविरुद्ध वर्ततात ते नाश पावतात."

बौद्धाचें प्रगट होणें.

"पुढें हा मायामोह पृथ्वीवर नर्मदेच्या तीरीं दिगंबर ( नग्न ) रूपानें प्रगट झाला. त्याचें मस्तक मुंडलेलें होतें व हातांत मोराच्या पिसांचा कुंचा होता. तो दैत्यांस मृदुभाषणानें असें ह्मणाला:—

"हे दैत्यहो, तुह्मी किमर्थ हीं तपें करीत आहां! ऐहिक फल किंवा पारलौकिक फलप्राप्तीसाठीं हें करितां?" दैत्य ह्मणाले, परलोकीं फल लाभावें ह्मणून आह्मी तप करीत आहों. पण आपण हा प्रश्न आह्मांस कां विचारितां? मायामोह—'तुह्मांला जर मुक्ति पाहिजे तर माझें ऐका. मी जो धर्म तुह्मांला शिकवीन त्याचें आचरण केल्यानें तुह्मांला स्वर्गप्राप्ती होईल किंवा जन्ममरणापासून मुक्त होऊन अस्तित्वरहित व्हाल. जो धर्म मी शिकवीन तोच युक्तीचें (बुद्धीचें) गुप्त द्वार होय. त्याहून अन्य अथवा श्रेष्ठ धर्मच नाहीं. हे महाबलहो, अशा प्रकारचा महाधर्म जाणण्यास तुह्मी अर्हत (योग्य) आहां.' अशीं लाघवी भाषणें व दर्शनी तर्कवाद यांहींकरून मायामोहानें दैत्यांस वैदिकमार्गाचा त्याग करायास लाविलें. त्यानें त्यांस असें शिकविलें कीं, "धर्म व अधर्म यांच्यासाठीं (ही) एकच गोष्ट आहे. एकच वस्तु होऊं शकते व होऊं शकत नाहीं, एकच वस्तु मुक्तिदायक अथवा मुक्तिअदायक होऊं शकते. तीच परमार्थ होऊं शकते व शकत नाहीं. ती कार्य होऊं शकते, व अकार्य होऊं शकते. तीच प्रगट व अप्रगट आहे. ती दिगंबरांचा (नग्नांचा) धर्म व जे वस्त्र धारण करितात त्यांचाही धर्म आहे." अशा प्रकारच्या मायावी गुरूच्या पाठाकडून ते दैत्य स्वधर्म त्यजिते झाले, व परस्पर विरुद्ध मतें सारखींच सत्य आहेत असें मानूं लागले. आणि त्यानें तुह्मी अर्हत (ह्मणजे ह्या उपदेशास, अर्थात् खोटया उपदेशास) योग्य आहां असें ह्मटल्यावरून त्यांस अर्हत असें नांव पडलें.":—

अर्हथेमं महाधर्मं मायामोहेन ते यतः ।
प्रोक्तास्तमाश्रिता धर्ममार्हतास्तेन तेऽभवन् ॥

याप्रमाणें विष्णूनेंच लोकांस वेदमार्गापासून भ्रष्ट करायास हा अवतार घेतला असें स्पष्ट दिसतें. त्यानें वामन अवतार एका धार्मिक राजाच्या नाशार्थ घेतला, आणि हा बौद्धावतार "सनातन वेदधर्म" बुडवायास घेतला !

बौद्ध व जैन मताप्रमाणें बुद्धाची उत्पत्ति.

बौद्धमताप्रमाणें अनेक बुद्ध होऊन गेले, त्यांपैकीं एकाचें नांव शाक्यमुनी असें होतें; तो नेपाळ देशांतील कपिलवस्तु नामक ग्रामीं जन्मला. त्याचा बाप शुद्धोदन हा त्या देशाचा राजा होता. त्याच्या आईचें नांव मायादेवी होतें. तो क्षत्रिय जातीचा होता. शाक्य हें त्याच्या कुळाचें नांव होतें. त्याचीं दुसरीं नांवें बुद्ध आणि सिद्धार्थ अशीं होतीं. तो इ० स० पू० ५८८ वर्षें मगधदेशांत धर्मसुधारणेचें काम करूं लागला. तो इ० स० पू० ५४३ व्या वर्षी मरण पावला. त्याच्या पूर्वी २४ बुध झाले होते. शाक्यमुनी हा कल्पांतील शेवटला होता. **जैनमत.**—ह्याच बुधाला जैनलोकही विष्णूचा अवतार समजतात. त्यांच्या ग्रंथांत एक श्लोक असा आहे:—

पश्चाद्धर्मसुतो राजा पांडवानां भविष्यति ॥
वासुदेवमुखामात्यैः पालयन्नवनीं त्विषा ॥
तेषां शकस्य पर्याये प्रभविष्यति बुद्धराट् ॥
चतुर्भिः सह शिष्यैश्च ह्यवतीर्णो भवेत् ध्रुवम् ॥
विष्णोर्नंदावतारं तं वदिष्यंति बुधा जनाः ॥
तदा च भवदीयानां दुःखस्यांतो भविष्यति ॥

**अर्थः**—"पुढें युधिष्ठिर राजा होऊन कृष्णाच्या सहाय्यानें

पृथ्वीचें पालन करीत असतां त्याच्या शकांत चार शिष्यांसहवर्तमान बुद्ध प्रगट होईल व तो तुमच्या दुःखाचा नाश करील. लोकही त्यास विष्णूचा नववा अवतार असें ह्मणतील."

( जैनग्रंथांतील वरील ही माहिती "भरतखंडाचा अर्वाचीन कोश" ह्या ग्रंथावरून घेतली आहे.[1] )

बौद्धधर्म व त्याचा प्रसार.

बौद्धमताच्या प्रसाराविषयीं विष्णुपुराणांत आणखी असें सांगितलें आहे कीं दैत्य स्वतां बौद्ध मतानुसारी झाल्यावर त्यांनीं इतरांसही आपल्याप्रमाणें करण्याचा प्रयत्न केला, व बहुत लोक त्यांस अनुसरले. मायामोहानें रक्तांबर ( तांबडें वस्त्र ) परिधान करून लोकांस मधुराक्षरांनीं यज्ञार्थ पशुवध करण्याचा निषेध केला. " सर्व कांहीं विज्ञान मंत्र आहे, हें जगत् निराधार आहे, तें भ्रांतिज्ञानांत तत्पर आहे. (ह्म० खोटें ज्ञान मिळविण्याविषयीं उत्कंठित आहे.) आणि रागादिकांनीं दूषित होऊन भवसंकटांत भ्रमण करीत आहे." असें सांगून तो त्यांस " बुध्यध्वं " ( जाणा ) असें ह्मणाला, व त्यांनीं " बुध्यते " ( जाणलें ) असें प्रत्युत्तर केलें; याप्रमाणें हें पाखांड वाढत गेलें. लोक वेदांची निंदा करूं

१ बौद्ध व जैन धर्मांविषयीं जर्मन, फ्रेंच व इंग्लिश विद्वानांनीं त्या धर्मांचें मूळ भाषेंतील ग्रंथांचें अध्ययन करून पुष्कळ माहिती मिळविली आहे ती ह्या पुस्तकांत घेतली नाहीं; हिंदु धर्मग्रंथांत जें कांहीं सांगितलें आहे. त्याचा सारांश वर दिला आहे, रंगून येथील बाप्तिस्त कालेजाचे प्रोफेसर तिलबी ( Prof. Tilbe ) यांनीं अलीकडे विद्यार्थ्यांकरितां बौद्ध ध० एक उत्तम ग्रंथ रचिला आहे त्याचें इंग्रजींत "Pali Budhism" असें नांव आहे.

लागले, देवांची निंदा करूं लागले, कोणी ब्राह्मणांची निंदा करूं लागले, कोणी यज्ञकर्मकलापास धि:कारूं लागले; यज्ञार्थ पशुवध करणें पाप आहे, अग्नींत फलप्राप्तीसाठीं घृत टाकणें हा पोरखेळ आहे. इंद्रानें अनेक कर्मे करून देवत्व मिळविल्यावर पवित्र अग्नींत टाकलेल्या लांकडांचें त्याला भक्ष्य देतात. तर जो पशु पाला खाऊन वांचतो त्यापेक्षां तो कनिष्ठ आहे. जर यज्ञार्थ वधलेला पशु स्वर्गास जातो तर यज्ञ करणारानें आपल्या बापाचा यज्ञ कां करूं नये ? श्राद्धांत एकानें खाल्लें असतां दुसरा तृप्त होतो, तर जो दूर राहतो, त्याला अन्न पाठविण्याचें काय अगत्य आहे ? यास्तव कशावर विश्वास ठेवावा याचा निर्णय प्रथम बुद्धीनें करावा. असें केल्यानें तुह्मांला सुखप्राप्ति होईल. आप्त ( प्रमाण ) वचन आकाशांतून उतरत नाहीं. जें वचन युक्तिसिद्ध आहे तेंच प्रामाण्य होय."

ह्या उताऱ्यांत बौद्धधर्माचें सार आहे. त्यावरून बौद्धानें हिंदु धर्मांत केवढी मोठी उलटापालट केली हें दिसून येतें.

### जैनधर्म.

बौद्धधर्म हिंदुधर्मांतील पाखांड मत आहे, व जैनधर्म बौद्धधर्मांतील पंथ आहे.[1] सांप्रतकालीं बौद्धधर्म हिंदुस्थानांत

---

१ जैनधर्म हा बौद्धधर्मांतील पंथ आहे असें युरोपियन विद्वानांचें बहुत दिवसांपासून मत होतें, परंतु अलीकडे कित्येक विद्वानांनीं जैन व बौद्ध यांचे मूळ ग्रंथ फार बारीक रीतींत तपासून असा शोध लाविला आहे कीं हे दोन्ही धर्म प्रथमतः सुधारणुकेच्या रूपानें ब्राह्मण धर्मापासून निघाले, त्यांत जैनधर्म बुद्धापेक्षां पुरातन आहे. त्याचा स्थापक पारस्वनाथ होता, त्याला आतां २३ वा जीन मानितात. महावीर हा जैनधर्मांचा सुधारक असून बौद्धाचा एककालिन होता असें जाकोबी वगैरे विद्वानांचें मत आहे.

चालत नाहीं, परंतु जैनधर्म कोठें कोठें चालतो. त्या विषयींची थोडीशी माहिती वाचकांस दिली पाहिजे, ती "वेदशास्त्रादि विद्यासार" ह्या नांवाच्या गुजराती ग्रंथावरून देतोंः—

"जैनधर्मांत बौद्धाच्या जागीं दुसरे गुरु मानितात. प्रथम काशींतील ऋषभदेव नामक ब्राह्मणानें जैनधर्म प्रसिद्ध केला असें ह्मणतात. जैनांत चोवीस तीर्थंकर किंवा महायोगी मानिले आहेत, त्यांत **पारसनाथ** व **महावीर** हे शेवटले होते. त्यांच्या मूर्ति करून जैनलोक पूजितात.

"जैनलोकांचें मत बहुत प्रकारें हिंदुमताप्रमाणें आहे. ते त्यांच्याप्रमाणें अनेक जाती मानितात व त्यांचे बहुतेक संस्कार व क्रियाही त्यांच्यासारिख्या आहेत. पण ते श्राद्ध करीत नाहींत; व वेदाला मानित नाहींत; कारण त्यांत पशुवध सांगितला आहे. कोणत्याही प्राण्याला मारूं नये हा त्यांचा मुख्य सिद्धांत आहे.

"पृथ्वी आपोआप उत्पन्न झाली, जसें झाड सहज होतें तसे सर्व पदार्थ सहजधर्मानें होतात. आत्मा दोन प्रकारचा आहे, एक शरीरांत गुंतलेला व एक शरीरापासून मुक्त. आणि मनुष्याला आपला आत्मा मुक्त करण्यासाठीं मोठें तप केलें पाहिजे, सर्व स्त्रियांपासून दूर राहिलें पाहिजे; त्यानें भिक्षा मागावी, तीर्थंकरांचें स्मरण करावें, त्यांचीं नामें जपावीं, त्यांची प्रार्थना करावी, आणि रस्त्यांत चालतांना जे जीवजंतु आपल्या पायाखालीं मरत असतील त्यांच्या दोषापासून मुक्त होण्याकरितां मंत्र जपावा व प्रायश्चित्त घ्यावें; असें त्यांचें मत आहे. बौद्धधर्मांत ज्या पांच आज्ञा ( जीव न मारणें, चोरी न करणें, असत्य

न बोलणें, जारकर्म न करणें, दारू न पिणें) सांगितल्या आहेत त्या हे लोकही पाळतात. ते पाणी गाळल्याशिवाय वापरीत नाहींत, कोणी कोणी तर तें तापवितात. त्यांचे उपाध्ये तर तोंडांत कांहीं जीव जाऊं नये ह्मणून मुखास वस्त्र बांधतात, आणि जवळ एक कुंचा बाळगितात. कुंच्यानें जेथें बसावयाचें असेल ती जागा झाडतात. याप्रमाणें नियम पाळल्यानें मनुष्य पुण्यवान् होतो व मुक्ति (निर्वाण) पावतो.

निवळ नास्तिक मत मनुष्याच्यानें धर्माप्रमाणें आचरवत नाहीं. थोडे ज्ञानी ( ह्म० मूर्ख पुरुष ) तें कल्पनेंत बाळगितात, परंतु साधारण जनांस कांहीं तरी उपास्य वस्तु पाहिजे. त्यांशिवाय त्यांच्या मनाचें समाधान होत नाहीं, ह्या नियमास अनुसरून जैनमतस्थापकांनीं आपल्या धर्मांत जैन, तीर्थंकर इ० साधूंची भक्ति त्यांच्या मूर्तींच्या द्वारें चालू केली. ह्या मूर्ती त्यांच्या मंदिरांत मांडलेल्या असतात. इतकेंच नव्हे तर ज्या हिंदुधर्माचा त्यांनीं त्याग केला त्याच्याही कित्येक दैवतांस त्यांनीं आदरिलें आहे. इंद्र, लक्ष्मी, सरस्वती, गरुड, यांस ते पूजितात; ह्यांशिवाय व्योम, पृथ्वी, पाताळ, पर्वत, अरण्य, इ० स्थळीं भूपति, नाग, असुर इत्यादि वास करितात असें कल्पून त्यांसही भजतात.

जैन लोकांचें एक मुख्य व प्रसिद्ध देऊळ काठेवाडांत पालिटाना एथें सत्रंजय डोंगरावर आहे. तेथें एकच देऊळ नाहीं तर सर्व डोंगर देवळांनीं भरलेला आहे. जो यात्रेकरू तेथें जातो तो आपल्या सामर्थ्याप्रमाणें देऊळ बांधण्याची इच्छा बाळगितो. अगदीं लहान देऊळ तीन फूट उंचीचें असतें. ह्या स्थळीं थोडेसे यति व पूजारी खेरीज करून

कोणासही वस्तीस राहण्याची परवानगी नाहीं. यात्राविधि झाला कीं सर्वांनीं खालीं गेलेंच पाहिजे असा कडक कायदा आहे. तेथें कोणाला स्वयंपाकही करूं देत नाहींत. जैनांचें आणखी मोठें यात्रेचें स्थळ राजपुतान्यांत अबूच्या पहाडावर आहे. दुसरीं गिरनार, ग्वालेर इत्यादि ठिकाणीं आहेत. दक्षिण हिंदुस्थानांतील देवळांत बस्ती व बेत्तु असा भेद आहे. बस्तींत एखाद्या तीर्थंकराची मूर्ति असते, व बेत्तूंत गोमति नावांच्या कोणी साधूची मूर्ति असते. त्यास अन्य ठिकाणचे जैन ओळखीत नाहींत.

विठोबाच्या मूर्तीचें वर्णन जैन ग्रंथांत मिळतें.

जैनांनीं जसे ब्राह्मणांचे कित्येक देव आदरिले तसें ब्राह्मणांनींही केलें. निदान जैनांची एक प्रसिद्ध मूर्ति ब्राह्मणांनीं बळकावून घेतली, ती कोणती तर **पंढरीचा विठोबा.** जैन ग्रंथांत असा लेख आहे कीं, पुंडरीक नामें एक ब्राह्मण पंडीत होता, तो जैनमतानुयायी झाला. त्यानें युधिष्ठिर शक १७२५ विरोधकृत संवत्सरीं आषाढ शुद्ध ११ स एक मूर्ति स्थापिली, तिच्या आकृतीचें वर्णन येणेंप्रमाणें केलें आहे:—

नेमिनाथस्य या मूर्तिस्त्रिषु लोकेषु विश्रुता ॥
द्वौ हस्तौ कटिपर्यायेे स्थापयित्वा महात्मनः ॥
मूर्तिस्तिष्ठति सा सम्यक् जैनेंद्रेण च पूजिता ॥
अहिंसा परमं धर्मं स्थापयामास वै सच ॥ इ०

ह्या वर्णनांत मूर्तीचे दोन्ही हात तिच्या कमरेवर आहेत असें स्पष्ट सांगितलें आहे, व विठोबाच्या मूर्तीचीही तशीच आकृति आहे. ब्राह्मणांच्या कबजांत ही मूर्ति आल्यावर

त्यांनीं आपल्या चालीप्रमाणें वडाची साल पिंपळास लावून तिला कृष्णावतारांतील कथेशीं जोडून दिलें, ह्मणजे कृष्ण आपली रुसून गेलेली बायको रुक्मिणी इचा शोध करीत दिंडीर वनांत आला, तेथें त्याला मातापितरांच्या सेवेंत तल्लीन असलेला पुंडरीक भेटला, त्यानें त्याकडे एक वीट फेंकून तिजवर उभा राहून जे लोक तुझ्या दर्शनास येतील त्यांस तार इत्यादि सांगितलें. पंढरपुरांत विठोबाचे फार जुन्या जैन पुजाऱ्यांचे वंशज आहेत, व त्यांस विठोबाचे ब्राह्मण पुजारी आपल्या वृत्तीचा कांहीं अंश देतात; तसेंच विठोबाच्या अनेक नांवांत भीमातटविहारी असें एक नांव आहे. विहार हें जैन साधूच्या तपाच्या जाग्याचें ( मठाचें ) नांव आहे. याशिवाय पंढरपुरास ज्या दोन महाएकादशीच्या मोठ्या यात्रा भरतात, त्यांपैकीं एक वरील मूर्तिस्थापनेच्या दिवशीं ह्मणजे आषाढ शु० ११ स भरते. देवांचे देव जे महा पराक्रमी ब्राह्मण ( ब्राह्मणार्हा महात्मानो देवनामपि देवताः—महाभा० अनुशा० प० ) ते काय न करितील? ह्या विठोबाच्या भक्तीस पंढरपुरास लाखों लोक जाऊं लागले, ब्राह्मणांचें मोठें उत्पन्न वाढलें आणि ज्या जैन मूर्तीचें दर्शन देखील हिंदूंनीं घेऊं नये तिची मोठी संतमंडळी बनली ! !

### १० कल्की.

हा विष्णूचा दहावा अवतार पुढें होणार आहे. कलियुगाच्या शेवटीं पृथ्वीवर पाप फार वाढेल तेव्हां विष्णु पांढऱ्या घोड्यावर बसून हातांत खड्ग धारण करून येईल, आणि दुष्टांचा संहार करून धर्माची पुनः स्थापना करील, नंतर सत्ययुगास पुनः आरंभ होईल, असा लोकांचा साधा-

रण समज आहे; परंतु ह्याविषयीं पुराणांतरीं जें वर्णन आढळतें तें येणेंप्रमाणें आहे:—

मत्स्यपुराणांतील वर्णन.

"कलियुगांत शेवटीं संधिकालांत विष्णुयशा नामक ब्राह्मणापासून विष्णूचा १० वा अवतार होणार आहे. तो कल्की भगवान् हातांत आयुधें धारण केलेले सहस्रावधि ब्राह्मण घेऊन, धर्माविषयीं आळशी, पाखांडी अशा सर्व लोकांस मारील, आणि ब्राह्मणांचा द्वेष करणारे अशा सर्व शूद्रादिक राजांस तसेंच अवांतर ब्राह्मणांचे शत्रूंसही मारून त्या स्वरूपानें अठ्ठाविसावे कलियुगांत त्या ब्राह्मण सैन्यासहवर्त्तमान भूभार हरण करीत राहील. नंतर त्यांनीं समुद्राचे शेवटपर्यंत दुष्ट शूद्रांस शोधून आपलें सुदर्शन चक्र चालू करून अधर्मिष्ट अशा शूद्रप्रभृति दुर्जनांस राज्यावरून पदच्युत करून त्यांचा संहार करील. नंतर प्रजा त्या कल्कीदेवाची कृपा संपादन करितील. तेव्हां त्याचेयोगानें प्रजांचेंही बहुत कल्याण होईल............(संक्षेप) पुढें असें होईल कीं तो कल्की देव गुप्त होईल. मग प्रजा धर्मत्याग करितील, ब्राह्मण वेदविक्रय करितील, स्त्रिया भगविक्रय करितील, आणि सर्व प्रजा कलीचे संधिकालांत अतिशय कष्ट पावून कलियुगाचे समाप्तीबरोबर नाश पावतील. असें कलियुग संपल्यावर कृतयुगाची प्रवृत्ति होईल." (म. पु. अ. ४७. २४५–२६०.)

भारतांतील वर्णन.

"कलियुगांत अतिशय अधर्म वाढून त्या युगाची समाप्ति झाल्यावर कृतयुगास आरंभ झाला असतां सूर्य, चंद्र, गुरु हे पुष्यनक्षत्रीं एका राशीस येतील. त्या कालीं असें समजावें कीं, कृतयुगास आरंभ झाला. पर्जन्यकालीं सुवृष्टि होईल, नक्षत्रांची शोभा आकाशाचे ठायीं चांगली दिसेल, ग्रह सव्य जातील. त्या कालीं संभलग्रामीं कोणीएक ब्राह्मणाचे घरीं विष्णुयश नामक कल्लकी अवतार होऊन धर्मसंस्थापना करील. याच्या आज्ञेंत वहनें, आयुधें, शस्त्रास्त्रेंकवचें निरंतर राहतील. स्वधर्मेंकरून विजयातें पावेल. संपूर्ण वर्णांवर कृपा करून आपापले धर्मांचा स्वीकार करवील, या पृथ्वीवर बलाढ्य झालेले म्लेंछसमुदाय असतील त्यांचा तो नाश करील; याप्रमाणें धर्मव्यवस्थापक कल्लकी अवतार होईल. नंतर तो अवतारी पुरुष सर्व चोरांचा क्षय करून अश्वमेधामध्यें पृथ्वी ब्राह्मणांस देईल; ब्रह्मदेवांनीं ज्या मर्यादा केल्या आहेत त्या स्थापन करून वनांत जाईल, त्या कालीं संपूर्ण प्राणिमात्र त्याच्या शीलाप्रमाणें वर्तणूक करतील. ब्राह्मणांनीं चोरांचा नाश केला असतां त्यांचें कल्याण होईल. धर्म देशोदेशच्या ठायीं स्थापना करील. ब्राह्मणांनीं त्याची स्तुति केली असतां ब्राह्मणांचा तो संतोष ठेवील. असा तो कल्लकी अवतार चोरांच्या वधाकारितां उत्पन्न झाला असतां संपूर्ण लोक दुष्टांपासून त्रस्त होऊन हे तात, हे पुत्र, अशी भयंकर वाणी करीत असतां त्यांचें शांतवन करील. याप्रमाणें अधर्माचा नाश करून धर्माची वृद्धि करील. त्या कालीं

ब्राह्मण स्वकर्मास प्रवृत्त होऊन सर्व जन आपआपले कर्मास प्रवृत्त होतील. सर्व ऋतु आपआपले स्थानीं प्राप्त होतील, राजे स्वधर्मानें प्रजापालन करितील, चारी वर्ण आपआपले धर्मास प्रवृत्त होतील." (वनपर्व अ. १९०, १९१.)

---

## प्रकरण ६.

### शक्ति, माया, प्रकृति, देवी, उमा, गणपति, कार्तिकेय, दत्तात्रेय.

हिंदुधर्मांतील त्रिमूर्तीस तीन स्त्रिया आहेत, ह्मणजे ब्रह्मदेवाला सावित्री, विष्णूला लक्ष्मी, व शिवाला पार्वती; ह्या प्रत्येकीस **शक्ति** असें साधारण नांव आहे.

स्वधा, इच्छारूपा व माया.

वैदिक देवांपैकीं कित्येकांस स्त्रिया होत्या पण त्या त्यांच्या शक्ति होत्या किंवा त्यांस सृष्टि करण्याचें व युद्ध करण्याचें सामर्थ्य होतें असें वेदांत सांगितलें नाहीं. ईश्वराची सृष्टि उत्पन्न करण्याची जी इच्छा तिला वेदांत "स्वधा" ह्मटलें आहे; हीच शक्ति पुढें त्याची स्त्री अशी कल्पना निघाली. सामवेदांत असें सांगितलें आहे कीं, "त्याला एकटें राहण्यास संतोष वाटला नाहीं; त्यानें दुसऱ्याची इच्छा धरिली, आणि आपणच तसा झाला. त्यानें आपले दोन भाग होऊं दिले आणि नवराबायको झाला. तिच्याशीं त्यानें गमन केलें आणि त्यापासून मनुष्यें उत्पन्न झालीं." ईश्वराच्या ह्या इच्छेला "इच्छारूपा" ह्मटलें आहे, आणि ईश्वराला "स्वेच्छामय" ह्मटलें आहे; वेदांतामध्यें ह्या इच्छेला "माया" ह्मटलें आहे.

प्रकृति अनादि आहे.

सांख्यशास्त्रांत प्रकृति किंवा मूलप्रकृति अनादि आहे असें सांगितलें आहे. ती परमात्म्यापासून वेगळी आहे व तीच सर्व पदार्थांची आणि देवांची देखील उत्पादक आहे. यावरून प्रकृति ही देवांची व मनुष्यांची माता मानिली आहे, आणि ती मायाही आहे:—

सा च ब्रह्मरूपा माया नित्या सनातनी। (सांख्यकारिका.)

**अर्थ.**—तीच ब्रह्मरूपिणी माया नित्य व सनातन आहे.

कालिकापुराणः—

अभिन्ना प्रकृतिर्या सा जन्तून् सम्मोहयतेऽखिलान्॥

**अर्थ.**—प्रकृतीला अभिन्नमाया ह्मटलें आहे, कारण ती सर्व प्राण्यांस मोह घालिते.

गीतेंत प्रकृतीचें वर्णन येणेंप्रमाणें आहे:—

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा। (भ० गी० ७: ४.)

**अर्थ.**—ही माझी माया त्रिगुणात्मक अनिर्वचन प्रकृति जे ती आठ प्रकारें भेदांतें पावली. ते भेद—भूमि, जळ, अग्नि, वायु, आकाश, बुद्धि, मन, अहंकार.

कूर्मपुराण:—

तस्य सर्वजगन्मूर्तिः शक्तिर्मायेति विश्रुता।
तदेवं भ्रामयेदीशो मायावी पुरुषोत्तमः॥
सैषा मायात्मिका शक्तिः सर्वाकारा सनातनी।
विश्वरूपं महेशस्य सर्वदा संप्रकाशयेत्।

'त्याची शक्ति जी जगन्मूर्ति तिला माया ह्मणतात. तिला मायावी जो पुरुषोत्तम तो भ्रमण करायास लावितो.

ज्या शक्तीचें आत्मरूप माया आहे ती सनातन असून सर्वदा महेशाचें विश्वरूप दाखविते."

तिचीं पांच रूपें.

ह्या प्रकृतीचीं पुढें परमात्म्याच्या इच्छेनें सृष्टिकर्मांत पांच रूपें झालीं:—

तदाज्ञया पंचविधा सृष्टिकर्मविभेदतः। ( कू० पु० )

ह्मणजे, शिवाची शक्ति व माया दुर्गा; विष्णूची शक्ति व माया लक्ष्मी; ब्रह्म्याची शक्ति व माया सावित्री, हीच हरीची शक्ति व माया होती; आणि पांचवी, राधा; ही कृष्णाची शक्ति व माया.

शक्ति ही सर्व कांहीं आहे.

प्राचीन ग्रन्थांत शक्ति ही ब्रह्मा, विष्णु, इ० पासून झाली असें जरी सांगितलें आहे तरी अर्वाचीन ग्रंथांत तिच्यावांचून कांहींच झालें नाहीं; ब्रह्मा, विष्णु हे देखील तिचीं बाळें आहेत असें ह्मटलें आहे. काशीखंड:—

सर्वमंत्रमयी त्वं हि ब्रह्माद्यास्त्वत्समुद्भवाः।<br>
चतुर्वर्गात्मिका त्वं वै चतुर्वर्गफलोदया॥<br>
त्वत्तः सर्वमिदं विश्वं त्वयि सर्वं जगन्निधे।<br>
यद्दृश्यं यद्दृश्यं च स्थूलसूक्ष्मस्वरूपतः।<br>
यत्तत्वं शक्तिरूपेण किंचिन्न त्वदृते क्वचित्।

"ब्रह्मादिक तुझ्यापासून जन्मले. तूं चार अर्थ आहेस, ते तुझ्यापासून फलास येतात. सर्व विश्व तुजपासून झालें. आणि सर्व जगास तुझा आश्रय आहे. जें सर्व आहे तें तुझें शक्तिरूप आहे, तुजवांचून कांहींच झालें नाहीं."

याप्रमाणें मूळची जी ईश्वरेच्छा व ईश्वरी शक्ति तिची मनुष्याच्या कल्पनाशक्तीनें स्वतंत्र व्यक्ति होऊन मूळप्रकृति बनली. तिचीं पुढें अनेक रूपें झालीं; व शेवटीं इतर देवांचे जसे अवतार व गुणचरित्रें वाढलीं तशीं ह्या देवींचींही वाढलीं. त्यांस भक्त मिळाले, त्यांस त्यांनीं वर दिले; त्यांस शत्रु झाले, त्यांस त्यांनीं शाप दिले; इतकेंच नाहीं, तर त्यांशीं युद्धें करून त्यांचा त्यांनीं वधही केला. आणि ह्या कथांचीं पुराणें झालीं. त्यांच्या मूर्ति व देवळें झालीं. त्यांचे सणवार चालू झाले.

## उमा.

सर्व देवींत शिवाची स्त्री उमा हिची लोकांत जितकी प्रसिद्धि, माहात्म्य व भक्ति आहे तितकी दुसऱ्या कोणत्याही देवीची नाहीं.

तिची कथा रामायण, हरिवंश, भागवत, विष्णुपुराण इ० ग्रन्थांत आहे.

हरिवंशः—

हिमालयपर्वताला अपर्णा, एकपर्णा व एकपाटला अशा तीन कन्या होत्या. त्यांनीं असें तीव्र तप केलें कीं, तेणेंकरून सर्व देवदानव घाबरे झाले. एकपर्णा ही एकच पान भक्षण करीत असे. अपर्णा तर कांहींच खात नसे. तेव्हां तिची आई दुःखी होऊन निषेधार्थानें तिला उ मा ( अगे, असे—ह्मणजे व्रत नको ) असें ह्मणाली. त्यावरून त्रैलोक्यांत तिचें नांव उमा असें प्रसिद्ध झालें. ह्या तिघीजणी सुंदर असून योगधर्मिणी व ब्रह्मवादिनी होत्या. त्यांत उमा वडील व उत्तम होती. तिला आपल्या महायोगाच्या

उमेची उत्पत्ति.

बलानें महादेव पति मिळाला. उमेचीं दुर्गा, भवानी, कालिका इ० नांवें आहेत.

महाभारतांतील भीष्मपर्वांत दुर्गास्तोत्रांत उमेचें वर्णन आहे. हें स्तोत्र अर्जुनानें कृष्णाच्या सूचनेवरून केलें:—

दुर्गास्तोत्र.

नमस्ते सिद्धसेनानि आर्ये मंदरवासिनि ।
कुमारि कालि कापालि कपिले कृष्णपिंगले ।
भद्रकालि नमस्तुभ्यं महाकालि नमोऽस्तु ते ।
चंडि चंडे नमस्तुभ्यं तारिणी वरवर्णिनी ।
कात्यायनि महाभागे करालि विजये जये ।
शिखिपिच्छध्वजधरे नानाभरणभूषिते ।
अट्टशूलप्रहरणे खड्गखेटकधारिणी ।
गोपेंद्रस्यानुजे ज्येष्ठे नंदगोपकुलोद्भवे ।
महिषासृक्प्रिये नित्यं कौशिकी पीतवासिनि ।
अट्टहासे कोकमुखे नमस्तेऽस्तु रणप्रिये ।
उमे शाकंभरि श्वेते कृष्णे कैटभनाशिनि ।
हिरण्याक्षविरूपाक्षि सुधूम्राक्षि नमोऽस्तु ते ।
वेदश्रुतिमहापुण्ये ब्रह्मण्ये जातवेदसि ।
जंबूकटकचैत्येषु नित्यं सन्निहितालये ।
त्वं ब्रह्मविद्या वियानां महानिद्रा च देहिनाम् ।
स्कंदमातर्भगवति दुर्गे कांतारवासिनि ।
स्वाहाकारः स्वधा चैव कला काष्ठा सरस्वती ।
सावित्री वेदमाता च तथा वेदांत उच्यते ।
स्तुताऽसि त्वं महादेवि विशुद्धेनांतरात्मना ।
जयो भवतु मे नित्यं त्वत्प्रसादाद्रणाजिरे ।
कांतारभयदुर्गेषु भक्तानां पालनेषु च ।
नित्यं वससि पाताले युद्धे जयसि दानवान् ।

त्वं जंभनी मोहिनी च माया ऱ्हीः श्रीस्तथैव च ।
संध्या प्रभावती चैव सावित्री जननी तथा ।
तुष्टिः पुष्टिर्धृतिर्दीप्तिश्चन्द्रादित्यविवर्द्धिनी ।
भूतिर्भूतिमतां संख्ये वीक्ष्यसे सिद्धचारणैः । (२३. ४-१६.)

ह्या स्तोत्रांत उमेला अनेक नांवें दिलीं आहेत, तीं येथें अर्थांत सांगण्याचें कारण नाहीं. दुसरा भावार्थ असा आहे कीं, तिला मोराच्या पिसांचा ध्वज आहे, तिच्या अंगावर अनेक अलंकार आहेत, व तिनें अनेक शस्त्रें धारण केलीं आहेत. ती कृष्णाची धाकटी बहीण आहे. तिला महिषाचें रक्त प्रिय आहे. ती पीतवस्त्र नेसती. ती मोठ्यानें हंसती. तिचें तोंड लांडग्याच्या तोंडासारिखें (कोकमुख) आहे. तिला युद्ध आवडतें. ती वेदाची श्रुति आहे. ती स्त्रीअग्नि आहे. ती नित्य खडकांत व कबरस्थानांत राहते. ती ब्रह्मविद्या आहे व देहींची महानिद्रा आहे. तिचीं नांवें सरस्वती, सावित्री, वेदाची व वेदांताची माता अशीं आहेत. अर्जुन तिच्यापाशीं युद्धांत विजयी होण्याचा वर मागतो. तो ह्मणतो कीं, "तूं अरण्यांत, भयांत व अडचणींत व आपल्या भक्तापाशीं व पाताळांत सर्वकाळ राहतीस." इत्यादि.

तिचीं रूपें; दुर्गापूजा.

ह्याशिवाय दुसऱ्या ग्रंथांत दुसरीं नांवें तिच्या रूपांप्रमाणें आहेत; कालिका, भैरवी, छिन्नमस्तकीं हीं तिचीं उग्ररूपें दर्शक नामें आहेत. ह्यांतील शेवटल्या रूपांत ती आपलें छेद्लेलें मस्तक हातांत धरून आपल्या धडांतून वाहणारें रक्त प्राशन करीत आहे असें दर्शविलें असतें. इतकी तिला रक्ताची आवड आहे. दुर्गादेवीचा मोठा उत्साह कलक-

त्यांत आश्विन मासांत होत असतो, त्याला **दुर्गापूजा** ह्मणतात. ह्या पूजेंत पशुयज्ञ होतात. उमा, गौरी, पार्वती हीं ह्या देवीचीं सौम्य रूपें होत. तिच्या पूजेंत मद्यमांस लागत नाहीं. गणपति व कार्तिकेय हे तिचे दोन पुत्र होत.

**गणपति.**

गणपतीची उत्पत्ति मत्स्यपुराणांत येणेंप्रमाणें आहेः— एकदां पार्वतीनें आपल्या अंगास उटणें लावून त्याच्या मळीचा क्रीडेसाठीं एक बाहुला केला. त्याला तिनेंच हत्तीची सोंड केली. पुढें तिनें तो पुतळा भागीरथीच्या जलांत टाकिला. तेथें तो विशाल देह पावून सर्व जग व्यापिता झाला. तेव्हां पार्वतीनें त्यास पुत्रा अशी हांक मारिली. देवांनीं हा गंगापुत्र अशा बुद्धीनें त्याची पूजा केली. ब्रह्मदेवानें त्यास विनायकनामक गणांचें आधिपत्य दिलें. ( मत्स्यपु. अ. १५३. ) गणपतीच्या उत्पत्तीच्या आणखी कथा दुसऱ्या पुराणांत निराळ्याच आहेत.

गणपति हा विद्येचा देव आहे असा साधारण लोकांचा समज आहे. ग्रंथारंभीं त्यास नमन करितात, परंतु असें करण्याचें कारण तो विद्येचा देव समजून करीत नाहींत; सर्व विद्येची देवी शारदा आहे; तर विघ्ननिवारणार्थ त्याची प्रार्थना किंवा स्तुति करितात. हा मूळचा अर्थ आहे. गणपति हा शूद्रांचा देव आहे असें एका प्राचीन श्लोकांत सांगितलें आहेः—

> विप्रानां दैवतं शंभुः क्षत्रियाणां तु माधवः ।
> वैश्यानां तु भवेद्ब्रह्मा शूद्रानां गणनायकः ॥

गणपतीला विघ्ननाशक असें ह्मणण्याची चाल फार

आहे, परंतु त्याचीं "विघ्नेश" व "विघ्नराज" अशींही नांवें आहेत. सारांश, हा देव हिंदूंच्या क्षुद्रदैवतांपैकीं असून जीं भूतें मनुष्याच्या कार्यास विघ्नें आणितात त्यांच्या एका टोळीचा तो सरदार आहे. यावरून त्याला "गणपति, गणनायक" अशीं नांवें दिलीं आहेत. हा अर्धा देव व अर्धा भूत असा आहे. वेताळ, ह्मसोबा ह्यांस जसे इकडले लोक भितात तसेंच याचें भय दक्षिणहिंदुस्थानाकडील तामीळ वगैरे लोकांस आहे. ह्याची जर पूजा न केली तर तो अपाली भुतावळ उठवून घरांत व गांवांत भुतें सोडितो, शेतांचा नाश करितो, वाटा मारितो, गुरांवर मरी आणितो असा या लोकांचा समज आहे.

तुकारामानेंही याची गणना क्षुद्र दैवतांत केली आहे:—

रंडी चंडी शक्ति । मद्यामांसातें भक्षिती । बहिरव खंडेराव । रोटीसुटीसाठीं देव । **गणोबा । विकराळ लाडुमोदकांचा काळ ।** मुंजा ह्मैसासुरें । हें तों कोण लेखी पोरें । वेताळें फेताळें । जळो त्यांचें तोंड काळें ॥

वैष्णव लोकांच्या विचारसागर नामक ( गुजराथी ) ग्रंथांत त्याविषयीं पुढील लेख आढळतो:—

रूप अमंगळ शवसम ( प्रेतवत् ) जेनुं, ध्यान अमे न करिये तेनुं । राख डमरू, गजचर्म, कपाळ ( माणसाची करोटी ) धरे आप; शुं करे निहाळ ? तेनो पुत्र गणेशराज तेवो, रूप विलक्षण नरपशु जेवो ॥

## कार्तिकेय.

कार्तिकेयाची उत्पत्ति इतकी बीभत्स आहे कीं ती येथें सांगण्याजोगी नाहीं. त्याला सहा तोंडें व बारा हात होते.

शक्तीचें माहात्म्य वैष्णवांस फारसें आवडलें नाहीं असें दिसतें, कारण हरिवंशांत तिला कृष्णानें वर देऊन मोठ्या पदास चढविलें असें सांगितलें आहे. त्याचा सारांश येणेंप्रमाणें:—

शक्तीविषयीं वैष्णव मत.

विष्णूनें कंसाचा देवकीचीं बाळें मारण्याचा बेत मोडण्याकरितां पातळांत जाऊन निद्राकालरूपिणीचें सहाय मागितलें; आणि त्याजबद्दल ती त्याच्या कृपेनें सर्व जगतांत मोठी देवी होईल असें वचन दिलें. त्यानें तिला ज्या दिवशीं तो कृष्णाच्या रूपानें जन्मणार त्याच दिवशीं यशोदेच्या उदरीं जन्मायास सांगितलें. आणि "कंस तुला पायानें धरून शिळेवर आपटील, परंतु पुढें तूं आकाशांत अढळपद पावशील, आणि इंद्र तुला देवांमध्यें जागा देईल, तो तुला कौशिकी ह्या नांवानें आपली बहीण मानून घेईल, आणि त्यापासून विंध्य पर्वतावर तुला शाश्वत स्थान मिळेल; तेथें तूं माझें ध्यान करीत असतां शुंभ आणि निशुंभ ह्या दोघां असुरांस मारशील, आणि लोक तुला मांसाचें अर्पण करितील" असा तिला वर दिला.

हरिवंशांतही दुर्गास्तोत्र आहे; त्यांत वरील स्तोत्रांतील नांवें असून ती शाबर, बर्बर आणि पुलिंद ह्या रानटी लोकांच्या भक्तीस पात्र (सुपूजिता) आहे असें ह्मटलें आहे. तिला त्यांत यमाची ज्येष्ठ भगिनी ह्मटलें आहे, व 'सुरामांसप्रिया,' 'सुरादेवी' अशीं नांवें दिलीं आहेत.

हरिवंशांतील दुर्गास्तोत्र.

मार्कंडेय पुराणांतील देवीमाहात्म्य.

मार्कंडेयपुराणांत देवीमाहात्म्य नामक एक प्रकरण आहे, त्यांत दुर्गेच्या स्तुतीची व भक्तीची पराकाष्ठा केली आहे. तिनें जेव्हां महिषासुर नामक दैत्य मारिला तेव्हां इन्द्रादि देवांनीं तिची स्तुति केली, त्यांतील एक वचन येणेंप्रमाणें आहे:—

यस्याः प्रभावमतुलं भगवाननंतो।
ब्रह्मा हरश्च न हि वक्तुमलं बलं च।
सा चंडिकाखिलजगत्परिपालनाय।
नाशाय चाशुभभयस्य मतिं करोतु।

**अर्थ**—"जिच्या अतुल्य वैभवाचें व पराक्रमाचें वर्णन विष्णु, शिव अथवा ब्रह्मदेव यांच्यांनीं करवत नाहीं ती चंडिका जगाचें पालन करण्याचा व अशुभ भयाचा नाश करण्याचा निर्धार करो."

दुर्गेविषयीं वेदार्थयत्नकाराचें मत.

वैष्णवांनीं दुर्गादेवीला खालच्या पायरीवर तरी बसविलें, पण वेदार्थयत्नकारांनीं तिला कोठेंच थारा नाहीं असें करून ठेविलें:—

"ग्रहयज्ञ ह्मणून ग्रहादिक अनिष्ट देवतांचा क्रोध शांत व्हावा ह्या हेतूनें जें कर्म करितात त्यांत हा मंत्र॥
जातवेदसे सुनवाम सोममरातीयतो नि दहाति वेदः।
सनः पर्षदति दुर्गाणि विश्वा नावेव सिन्धुं दुरितात्यग्निः॥
(ऋ. वे. अष्ट. १. अ. ७ सू. ९९) ह्मटला ह्मणजे "शक्ति, बाण, शूल, तलवार, चक्र, ढाल, चंद्रबिंब, रुंडमाळा, कुठार, परशु यांस धारण करणारी दाहा हातांची दुर्गा देवी" सिंहावर बसून दैत्यांचें प्राणहरण

करणारी अशी येऊन प्रत्यक्ष ग्रहयज्ञ करणाऱ्या पापी उपासकाच्या घरीं बसते असें समजून तिला हा मंत्र ह्मणून बोलावितात ( जातवेदसमितिमंत्रमुक्त्वा शक्तिबाणशूलखड्गचक्रचंद्रबिंबखेटकमालापरशुटङ्कोपेतदशभुजां सिंहारूढां दुर्गाख्यां दैत्यासुहारिणीं दुर्गाम् आवाहयामि ); आणि असा मंत्र ह्मणून आणविलेली भयंकर जी देवी ती येऊन अनिष्ट निवारण करिते असें लोक समजतात. पण ती येईल कशी ? कारण हा मंत्र दुर्गादेवीविषयीं मुळींच नाहीं....या मंत्रांत "दुर्गाणि" हा शब्द आला आहे आणि त्यांत दुर्गा हीं अक्षरें आलीं आहेत इतकाच काय तो देवी दुर्गेचा या मंत्राशीं संबंध...............पुरातन काळीं दुर्गा अथवा कालिका देवी ही ऐकून सुद्धां ठाऊक नव्हती. ती मागाहून प्रसिद्धीला आल्यामुळें आमच्या धर्मांत व कर्मांत शिरली." ( वे. य. पु. २. पृ. ५६५.) वरच्या वेदमंत्रांतील "दुर्गाणि": शब्दाचा अर्थ दुःखें असा आहे, व सर्व मंत्रांचा अर्थ येणेंप्रमाणें वेदार्थयत्नकर्त्यांनीं दिला आहे:—

"आपण जातवेदा ( अग्नि ) साठीं सोम काढूं. तो आह्मांबरोबर द्वेष करणाऱ्या मनुष्याचें धन जाळून टाको, तो आह्मांला सकळ दुःखांच्या पार पाडो. नावेच्या योगानें समुद्र पार पाडल्याप्रमाणें अग्नि आह्मांला पापाच्या पैलतीरीं नेवो."

## दत्तात्रेय.

दत्तात्रेयाच्या अवताराविषयींची पुढील कथा भागवत, मत्स्यपुराण व भारत ह्या ग्रंथांत मिळत नाहीं. भारतांत

( वनपर्व अ. ११५ ) इतकेंच सांगितलें आहे कीं, "सहस्रार्जुन महापराक्रमी व सहस्र बाहूंनीं गर्विष्ठ असतां दत्तात्रेयाच्या प्रसादानें त्यास यथेच्छ गमन करणारें असें एक सुवर्ण विमान मिळालें; त्यामध्यें बसून त्यानें संपूर्ण देवाचें मर्दन केलें, ऋषींस बहुत त्रास दिला, आणि संपूर्ण भूतांस बहुतप्रकारें पीडा दिली." मत्स्यपुराणांत ( ४७. २३९, २४० ). इतकेंच आहे कीं, "प्रथम चौकडींत त्रेतायुगांत चतुर्थांश धर्म क्षीण असतां विष्णूचा दत्तात्रेय नामें अवतार झाला. त्याच्या सर्व कार्याचा अधिकार मार्कंडेयाकडे होता. हा अवतार भृगुऋषीच्या शापाच्या कारणानें झाला." भागवतांत ( स्कं. ९. अ. २३. ) "सहस्रार्जुन हा सप्तद्वीप पृथ्वीचा अधिपति होत्साता श्रीहरीच्या अंशभूत दत्तात्रेयापासून तो महायोगासिद्धि पावला." इतकेंच आहे:—

दत्तात्रेयाद्धरेरंशात् प्राप्तयोगमहागुणः ।

दत्तात्रेयाची सावित्री, लक्ष्मी व उमा यांच्या संबंधानें जी कथा आहे ती येणेंप्रमाणें:—कोणेकाळीं ह्या देवींस असा गर्व झाला कीं, आपल्यासारिख्या पतिव्रता त्रिभुवनांत नाहींत. तेव्हां तेथें नारद आला व त्यानें सांगितलें कीं, अत्रिऋषीची स्त्री अनसूया ही परमपतिव्रता आहे. मग त्यांच्या आग्रहावरून ब्रह्मा, विष्णु व शिव हे त्या ऋषिपत्नीचें सत्त्व पाहण्याकरितां तिच्या घरीं अतिथीच्या रूपानें गेले आणि तिला ह्मणाले कीं, नग्न होऊन आह्मांस भिक्षा घाल. तेव्हां तिनें बरें आहे असें ह्मणून त्यांच्या अंगावर हात फिरविला, त्याबरोबर ते तिघे लहान बाळ झाले, त्यांस तिनें पाळण्यांत नेऊन ठेविलें. ते तेथेंच

हजारों वर्षें होते. इकडे त्यांच्या बायकांस आपले नवरे कोठें आहेत याचा कांहीं पत्ता लागेना, तेणेंकरून त्या फार चिंताक्रांत व श्रमी झाल्या. मग नारदानें येऊन त्यांस सर्व वर्तमान सांगितलें. तेव्हां त्या अनसूयेकडे जाऊन आपले नवरे मागूं लागल्या. तिनें त्यांस पाळण्यांतील बाळें दाखवून आपापले नवरे ओळखून घ्या असें सांगितलें; परंतु त्यांस ते ओळखतां येईनात, ह्मणून अनसूयेनें त्यांजवर हात फिरवून त्यांस पूर्ववत् करून त्यांच्या स्वाधीन केलें. दत्तात्रेयाचे चित्रांत तीन मस्तकांचा एक पुरुष गाय जवळ असलेला असा काढितात. त्याच्या सहा हातांत विष्णु, शिव इ० त्रिमूर्तींचीं आयुधें असतात, त्याबरोबर एक कुत्री असते तिचें तो दूध काढून त्यांत भाकर चुरून खातो, असा लोकांचा समज आहे.

दुसरी कथाः—अत्रीनें मोठें तप करून ब्रह्मा, विष्णु व शिव यांस प्रसन्न केलें, आणि ते त्याचे सोम, दत्त, आणि दुर्वास असे तीन अंशभूत पुत्र झाले. ह्यांपैकीं कोणती कथा खरी, व कोणत्या दत्तास त्याचे भक्त मानितात ह्याचा निर्णय वाचकांनीं करावा.

---

## खंड ६.—तंत्रशास्त्रें.

वेद, शास्त्रें, व पुराणें यांच्या मागून तंत्रें या नांवाचे ग्रंथ झाले. तंत्रशास्त्रांतील धर्मास वाममार्ग ( डाव्या हाताचा धर्म ) ह्मणतात, कारण तो पौराणिक धर्माच्या उलट आहे. तथापि याचें मूळ पुराणांतच आहे, असें

ह्मटलें पाहिजे; कारण पुराणांत शिव आणि शक्ति यांची उपासना सांगितली आहे. इतकेंच नाहीं, तर ह्याचें बीज अथर्ववेदांत देखील सांपडतें. त्यांत जी मांत्रिकविद्या आहे ती तांत्रिक मंत्रांची माताच होय. ह्या मार्गाचा स्थापक शिव होता असें ह्मणतात व याचे कित्येक ग्रंथ शिवपार्वतीसंवादरूपानें लिहिले आहेत.

तंत्राचा अधिकार व माहात्म्य.

हिंदुस्थानांतील कित्येक भागांत तंत्रशास्त्राचा अधिकार वेदापेक्षां विशेष मानितात. ह्या मार्गाचें माहात्म्य असें वर्णिलें आहे:—

कृते श्रुत्युक्त आचारास्त्रेतायां स्मृतिसंभवः ॥
द्वापरे तु पुराणोक्तः कलौ केवलमागमः ॥
सर्वेभ्यश्चोत्तमा वेदा वेदेभ्यो वैष्णवं परम् ॥
वैष्णवादुत्तमं शैवं शैवाद्दक्षिणमुत्तमम् ॥
दक्षिणादुत्तमं वामं वामात्सिद्धांत उत्तमः ॥
सिद्धांतादुत्तमं कौलं कौलात्परतरं न हि ॥

**अर्थ सारांश**—वेदादि सर्व मार्गांमध्यें वाममार्ग उत्तम आहे. त्याहून सिद्धांत, त्याहून कौलमार्ग. त्यापरता दुसरा श्रेष्ठ मार्ग नाहीं.

वैदिक मार्गाची निंदा.

शक्तिउपासक वेदाची अगदीं उघड निंदा करितात:—

वेदशास्त्रपुराणानि समस्ता गणिका यथा ।
एकैव शांभवी विद्या गुप्ता कुलवधूरिव । ( हठदीपिका, )

**अर्थ**—वेदशास्त्र, पुराणें, हीं सर्व कसबिणीसारखीं आहेत. केवळ शंकराची विद्या गुप्त कुलीन स्त्रीसारखी आहे.

वेदशास्त्रार्णवे घोरे मुह्यमाना इतस्ततः ।
षट्दर्शनमहाकूपपतिताः पशवः प्रिये ॥१॥
परमार्थं न जानंति पशुपाशनियंत्रिताः ।
पठन्नहर्निशं देवीं परतत्वपराङ्मुखः ॥ २ ॥
न जानाति परं तत्त्वं दर्वी पाकरसं यथा ॥
कुलधर्ममहामार्गं गत्वा मुक्तिपुरीं व्रजेत् ॥ ३ ॥
कुलशास्त्रमनादृत्य पशुशास्त्राणि योऽभ्यसेत् ॥
स्वगृहे पायसं त्यक्त्वा भिक्षामटति दुर्मतिः ॥४॥ (कौलरहस्य)

**अर्थ.**—" वेदशास्त्रें व षट्दर्शनें हीं घोर समुद्राप्रमाणें आहेत, त्यांत जे लोक पडले आहेत ते पशुवत् आहेत. ते परमार्थ न जाणतां पशूप्रमाणें बांधलेले आहेत. पळी स्वयंपाकांत वापरते, परंतु तिला अन्नाची रुचि नसते; वाममार्ग हा मुक्तिप्राप्तीचा मार्ग आहे; ह्या मार्गाचा जे अनादर करून अज्ञानी पशूंच्या शास्त्राचा अभ्यास करितात, ते घरांत तयार झालेला स्वयंपाक टाकून बाहेर भीक मागायास जातात."

शिवतंत्रांत असें ह्मटलें आहे:—

मम पंचमुखेभ्यश्च ये चाम्नाया विनिर्गताः ।
पूर्वश्च पश्चिमश्चैव दक्षिणश्चोत्तरस्तथा ॥
ऊर्ध्वाम्नायश्च पंचैते मोक्षमार्गाः प्रकीर्त्तिताः ।
आम्नाया बहवः संति ऊर्ध्वाम्नायेन नो समाः ॥

**अर्थ.**—"माझ्या मुखापासून पांच शास्त्रें निघालीं. तीं पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर आणि ऊर्ध्व अशीं होतीं. हीं पांच मोक्षाचे मार्ग होत. शास्त्रें बहुत आहेत, परंतु ऊर्ध्व शास्त्राच्या तुल्य कोणतेंच नाहीं."

कौलमार्ग.

ज्यांत कुल व अकुल यांची उपासना सांगितली आहे त्याला कौलमार्ग ह्मणतात (कुल ह्मणजे शक्ति व अकुल ह्मणजे ब्रह्म).

कुलं स्याद्ब्रह्मण: शक्तिरकुलं ब्रह्म ईरितम् ।
कुलाकुलनियोगेन कौल इत्यभिधीयते ॥

तंत्रशास्त्राचे ग्रंथ व विषय.

तंत्रशास्त्राचे ग्रंथ रुद्रयामल, कालिकातंत्र, महानिर्वाण, कुलार्णव, श्यामरहस्य, शारदातिलक, मंत्रमहोदधि, कामद, आम्नाय, कल्प, इ० आहेत. ह्या ग्रंथांची संख्या वेद, शास्त्रें, पुराणें यांच्यापेक्षां मोठी आहे असें ह्मणतात. यांत पुराणाप्रमाणें मुख्य पांच विषय असावे असें तांत्रिक ह्मणतात; ह्मणजे उत्पत्ति, लय, देवपूजा, परमार्थप्राप्ति व परमात्म्याशीं संयोग पावण्याचीं अनेक ध्यानें किंवा योग. परंतु यांखेरीज दुसऱ्या बहुत विषयांचा त्यांत भरणा आहे; जारण, मारण, उच्चाटण, पुष्टिकरण, पुष्टिनाश, मुकेपणा, बहिरेपणा, ताप वगैरे उत्पन्न करणें, शेताचा नाश करणें, गर्भपात करणें, नानाप्रकारचीं अरिष्टें टाळणें यांचे मंत्र; पशुपक्षी यांच्या भाषा समजण्याची विद्या इ० विषय आहेत. शाक्तांच्या सर्व अनुष्ठानांत मद्य, मांस, व स्त्री हीं अवश्य पाहिजेत. यांचें कर्म सर्व विपरीत प्रकारचें आहे. यांची तिथि, वार, पर्वणी इतर अनुष्ठानांच्या उलट आहेत. यांचा मुख्य ग्रंथ **चंडीपाठ** ह्मणून आहे, तो मार्कंडेय पुराणांत व कात्यायनीतंत्र यांत आहे. त्यावर नवचंडी, शतचंडी, सहस्रचंडी, इ० होम, मार्जन, तर्पण, जप करितात. तंत्रांत **दशमहाविद्या** ही मुख्य

देवता मानिली आहे. तांत्रिक लोक ताईत, दोरे, यंत्रें इ० वापरतात.

ह्या मताची प्रवृत्ति.

हा मार्ग हिंदुस्थानांतील बहुत ठिकाणीं चालत असून ब्रह्मचारी, संन्यासी, परमहंस, अग्निहोत्री, शास्त्री, पंडित असे अनेक प्रकारचे लोक तो आचरितात. ज्या गुजराथी हिंदु ग्रंथांतून आह्मीं ही पुढील माहिती घेतली आहे, त्याचा कर्त्ता असें ह्मणतो कीं, "बंगाल व द्रविड देश यांत लक्षावधि ब्राह्मण ह्या मार्गाचे अनुयायी आहेत. राजेरजवाडे मंत्रशास्त्र्यास अनुष्ठानास लावितात. शंकराचार्य देखील शाक्त होते असें शंकरविजय ग्रंथावरून दिसतें; कारण त्या ग्रंथांत श्रीचक्रपूजेची मोठी स्तुति केली आहे, आणि त्या नांवाचे त्यांनीं स्थापना केलेले मठ शृंगेरी वगैरे ठिकाणीं आहेत."

दक्षिणाचारी.

शाक्तांमध्यें दोन भेद आहेत, ह्मणजे दक्षिणाचारी व वामाचारी. दक्षिणाचारी वामाचाऱ्यांचे भ्रष्ट आचार चालवीत नाहींत, परंतु ते बलि नामक जे अर्पण देवीस करितात त्यांत पशुवध करितात; बकरीं वगैरे देवीपुढें कापितात, अथवा बुक्यांनीं त्यांचा जीव घेतात. बहुतेक दक्षिणाचाऱ्यांचे बली अन्न, दूध व शर्करा यांचेच असतात. ह्यांच्या ग्रंथांत वामाचाराचा निषेध केला आहे. शिव ह्मणतो:—

वामागमो मदुक्तोऽयं सर्वशूद्रपरः प्रिये ।
ब्राह्मणो मदिरापानाद्ब्राह्मण्येन वियुज्यते ॥
न कर्त्तव्यं न कर्त्तव्यं न कर्त्तव्यं कदाचन ।
इदं तु साहसं देवी न कर्त्तव्यं कदाचन ॥

**अर्थ.**—" वाममार्ग जरी मींच सांगितला तरी तो शूद्राकरितां आहे. ब्राह्मणानें मदिरापान केलें असतां त्याचें ब्राह्मण्य जातें, यास्तव तें कधीं करूं नये. " इ०.

वाममार्गाचें रूप येणेंप्रमाणें आहे:—

साधारण स्वरूप.

प्रथम शक्तिशोधन करितात; ह्मणजे नटी, वेश्या, परटीण, न्हावीण, ब्राह्मणी, शूद्रीण, माळीण, अथवा गौळीण यांतून कोणतीही स्त्री आणून तिला मंत्रोच्चारांनीं शुद्ध केल्यावर शक्ति ह्मणतात. तिच्या अंगावरील सर्व वस्त्रें काढून तिला अलंकारांनीं मंडित करून चक्राच्या उजव्या बाजूस बसवितात. हें चक्र मंत्र ह्मणून भूमीवर मंडलाकार काढलेली मर्यादा व नानाप्रकारच्या मुद्रा करून तयार करितात. मग त्या शक्तीवर मद्य शिंपडतात ह्मणजे ती शुद्ध होते. नंतर तिला कांहीं मंत्र शिकवितात किंवा तिच्या कानांत सांगतात. तदनंतर तिला चक्रांत बसवून तिची पूजा करितात. ह्या पूजेंत मांस, मत्स्य, मद्य, मैथुन, मुद्रा हे पंचमकार असले पाहिजेत. भक्ष्य व पेय पदार्थांचे कवल ( घांस ) उपासक मंडळी एकमेकांच्या मुखांत घालतात. एथें जातिभेद मानीत नाहींत. पुरुषांस भैरव किंवा वीर ह्मणतात. स्त्रियांस भैरवी व नायका ह्मणतात. शक्तीला प्रथम मद्यमांस अर्पिल्यावर मग इतर मंडळी ह्या पदार्थांचें सेवन करितात. प्रत्येक भैरव गुरूच्या नांवानें मद्याचें तर्पण करितो; तें असें कीं, उजव्या हाताच्या तीन बोटांवर मद्यपात्र ठेवून डाव्या हातानें त्यांत मांसाचा रज बुडवून मंत्रोच्चारानें गुरु व शक्ति यांजवर शिंपडतो व आपल्याही मस्तकावर त्याचें सिंचन करितो.

वाममार्गाच्या पूजापद्धतींत अनेक मंत्र, मुद्रा, तर्पणें, न्यास हीं असतात. तसेंच दमनकपूजा, दूतीयाग कुमारीपूजा, योगिनीपूजा, —पूजा, पात्रस्थापन, तंतुविधान इ० कर्में आहेत. मद्यप्राशनाचीं सोळा पात्रें असतात. प्रत्येक पात्र पितांना मंत्र ह्मणतात, त्यांपैकीं एक दोन मंत्र सांगतों:—

प्रथम व द्वितीय पात्रांचा मंत्रः—

भूदेवा यत्र देवा सुललितवदना दिव्यकन्याभिमाना ।
सानंदा गीतगाना विदधति विधिवद्विप्रवत्सर्ववर्णाः ॥
द्वारं सायुज्यमुक्तेर्विधिहरहरिभिः सर्वदा सेव्यमानं ।
श्रीचक्रं संप्रवृत्तं जगति विजयते दैवतं देवतानाम् ॥
आत्मतत्त्वं स्थूल शरीरं शोधयामि जुहोमि स्वाहा ॥

प्रथमपात्रं पिबेत् ॥ १ ॥

द्वितीये त्रिपुरापात्रं शिवोऽहं परिचिंतयेत् ॥
दहंति सर्वपापानि मोक्षरूपी प्रजायते ॥

द्वितीयपात्रं पिबेत् ॥ २ ॥

मद्यपानाचें महात्म्य येणेंप्रमाणें वर्णिलें आहे:—

आनंदात्तृप्यते देवी मूर्छया भैरवः स्वयम् ॥
वमनात्सर्वदेवाश्च तस्माद्विविधमाचरेत् ॥ ( कुलार्णव. )

**अर्थ.**—“ मद्यपानाच्या आनंदानें देवी तृप्त होते. मद्यपानानें बेशुद्ध झालें असतां भैरव तृप्त होतो, आणि वमन ( उलटी ) झालें असतां सर्व देवता तृप्त होतात. यास्तव अनेक रीतींनीं मद्यपान करावें.”

वाममार्गी एकमेकांचें उच्छिष्ट खातात व चक्रांत असतां जातिभेद मानीत नाहींत:—

उच्छिष्टं भक्षयेत्स्त्रीणां ताभ्यश्चोच्छिष्टमर्पयेत् ॥
स्त्रीवाथ पुरुषः षंढश्चांडालो वा द्विजोत्तमः ॥
चक्रमध्ये न भेदोस्ति सर्वे देवसमाः स्मृताः ॥
क्षीरेण सहितं तोयं क्षीरमेव यथा भवेत् ॥
तथा श्रीचक्रमध्ये तु जातिभेदो न विद्यते ॥ ( कुलार्णव. )

**अर्थ.**—"स्त्रीचें उष्टें आपण खावें, तसेंच आपलें उष्टें स्त्रीला द्यावें. स्त्री अथवा पुरुष अथवा नपुंसक, चांडाल अथवा पवित्र ब्राह्मण हे सर्व पूजनचक्रांत देवतांप्रमाणें समजावे, भेदाभेद बिलकूल नाहीं. जसें दुधांत पाणी घातलें असतां तें दूधरूपी होतें, तसा पूजाचक्रांत जातिभेद राहत नाहीं."

मंत्रावांचून कोणताही आचार शुद्ध नाहीं.

वाममार्गी ह्मणतात कीं, मंत्रावांचून त्यांचा आचार शुद्ध नाहीं, व जातिभेद न मानणें इ० जीं त्यांचीं लोकाचारविरुद्ध कर्मे आहेत तीं केवळ पूजेच्या वेळेस मात्र शुद्ध होत, एऱ्हवीं तीं अशुद्ध आहेत.

ह्या मार्गाविषयीं विशेष लिहिण्यास आमचें मन घेत नाहीं. यांत केवढी अनीति व दुराचार आहे हें त्याच्याच एका ग्रंथांतील उताऱ्यावरून दाखवून हा विषय पुरा करितों:—

अनाचारात्सदाचारस्त्वकार्यात्कार्यमुत्तमम् ॥
असत्यमपि सत्यं स्यात्कौलिकानां कुलेश्वरि ॥
अपेयमपि पेयं स्यादभक्ष्यं भक्ष्यमेव च ॥
अगम्यमपि गम्यं च कौलिकानां कुलेश्वरि ॥
न विधिर्न निषेधश्च न पुण्यं न च पातकम् ॥
न स्वर्गो नैव नरकः कौलिकानां कुलेश्वरि ॥

दुर्गुणाः सुगुणायंते अकुलं सत्कुलायते ॥
अधर्मश्चापि धर्मो वै कौलिकानां कुलेश्वरि ॥
सर्वव्यापी यथा सूर्यः सर्वभक्षी यथाऽनलः ॥
सर्वस्पर्शी यथा वायुस्तथा योगी सदा शुचिः ॥
सर्वधर्माधिको देवि कुलधर्मः शिवोदितः ॥
मद्यं मांसं च मत्स्यं च मुद्रा मैथुनमेव च ॥
मकारपंचकं देवि देवताप्रीतिकारणम् ॥

**अर्थ.**—"अनाचार तो सदाचार आहे. असत्य तें सत्य आहे, जें न करायाचें कर्म तें करण्याविषयीं कौलधर्म मानणारास कांहीं चिंता नाहीं...............त्याला पुण्य नाहीं, पाप नाहीं, स्वर्ग नाहीं, नरक नाहीं. हा धर्म पाळणारास दुर्गुण ते सद्गुण, व अधर्म तो धर्म आहे. नीच कुळाचा उंच कुळाचा आहे; ज्याप्रकारें सूर्याचा प्रकाश सर्वत्र पडतो आणि अग्नींत जें टाकलें तें भस्म होतें; जसा वायु सर्वांस स्पर्श करितो त्याप्रमाणें कौलधर्म मानणाराला सर्व शुद्ध आहे. पंचमकारांनीं देवी प्रसन्न होते." इ०.

अघोर पंथ.

ह्या मार्गाचें दुसरें एक रूप आहे त्याला अघोर पंथ ह्मणतात. अघोरपंथी मनुष्यांचीं प्रेतें खातात, कोणी मंत्रसाधनार्थ स्मशानांत स्त्रीच्या प्रेताचें आसन करितात; कोणी नरकपालांत पशु व कीटक यांचें मांस ठेवून त्यांचा रस झाल्यावर पितात; कोणी कोणी तर मलमूत्र देखील भक्षण करितात; कोणी मनुष्याच्या दांताच्या माळा अथवा सर्पांच्या माळा गळ्यांत घालतात, व्याघ्रचर्माचें आसन करितात, आणि अंगास चिताभस्म ( स्मशानांतील राख ) चर्चितात.

गुप्त आचार.

शाक्तमार्गाचे सर्व प्रकार फार गुप्त रीतीनें चालतात, व ते तसेच चालवावे असें तंत्रांत सांगितलें आहे. जे त्यांच्या मताचे नाहींत त्यांस ते पशु, कंटक असें ह्मणतात. ज्यांनीं त्यांची दीक्षा घेतलेली आहे त्यांस सिद्ध ह्मणतात, व त्यांच्या आश्रितांस साधक ह्मणतात:—

प्राकट्यं न कुयात्, न कुर्यात्पशुसंभाषणम् ॥
अंतः शाक्तः बहिः शैवः लोके वैष्णवः अयमेव आचारः ।
लोकान्न निंद्यात्, नियमान्न मोक्षः न तिष्ठेन्नियमेत ॥

कौलोपनिषद.

**अर्थ.**—"हा मार्ग प्रकट करूं नये. हा धर्म न जाणणारा पशु आहे, त्याशीं बोलूं नये. गुप्त रीतीनें शक्त्युपासना करावी. बाहेरून शिवधर्मानें चालावें. लोकांमध्यें वैष्णवमार्ग आचरावा. कोणाची निंदा करूं नये. नियमांनीं मोक्ष प्राप्त होत नाहीं, ह्मणून कोणतेही नियम पाळूं नयेत."

तंत्रशास्त्रांतील ही उपासना अति निंद्य व वेदशास्त्रविरुद्ध आहे असें बहुत हिंदु लोक ह्मणतात, व शक्त्युपासक ब्राह्मण मद्यपानाच्या योगानें प्रसिद्धीस आला तर त्याला बहिष्कृतही करितात, परंतु ह्या मार्गाचें कोणी पूर्वीपासून संस्कृत भाषेंत ग्रंथद्वारें खंडन केलें नाहीं असें दिसतें; इतकेंच नाहीं, तर तंत्रशास्त्रांतील बहुत कर्मपद्धति जे तांत्रिक नव्हेत असे ब्राह्मण चालवितात. ब्राह्मणाच्या संध्येंत मुद्रा, आसन व अर्घ्यप्रदान हीं तंत्रांतून घेतलीं आहेत. शंकराचार्यांनीं द्वैतमत व बौद्धमत यांच्या खंडनार्थ बहुत ग्रंथ लिहिले, पण तंत्रशास्त्राविरुद्ध कांहीं लिहिलें नाहीं असें ह्मण-

तात. हिंदुस्थानांत कोणी निश्चलनामक एका दादुपंथी साधूनें हिंदीभाषेंत विचारसागर नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे, त्यांत ह्या मताविरुद्ध चर्चा केली आहे.

आपल्या महाराष्ट्र देशांतील प्रसिद्ध कवि व निस्सीम विठ्ठलभक्त तुकाराम यांचे शाक्ताविषयीं कांहीं अभंग आहेत, त्यांतून हा पुढील उतारा आहेः—

राजा प्रजा द्वाड देश । शाक्त वास करीती तो ॥
शाक्त गधडा जये देशीं । तेथें राशी पापाच्या ॥
अवध्या पापें घडला एक । उपासक शक्तीचा ॥
त्याचा विटाळ नको अंगा । पांडुरंगा माझिया ॥
काम क्रोध मद्या अंगीं । रंगला रंगीं अवगुणी ॥
करितां पाप न धरी शंका । म्हणे तुका कोणीही ॥
वारितां बळें धरितां हातीं । जुलमें जाती नरकामधीं ॥

[ ह्या खंडांतील विषय अमदाबाद एथें छापलेला आगमप्रकाश नामक ( गुजराथी ) ग्रंथ व प्रो० विल्सन यांचा हिंदू पंथांविषयींचा ग्रंथ व स्वतांची माहिती व हिंदुधर्माचा अनुभव यांवरून घेतला आहे. ]

'अहिंसा परमो धर्मः' असें ज्या धर्माचें मुख्य तत्त्व आहे.

बौद्धधर्मांतील तंत्रशास्त्र.

त्या बौद्धधर्माला देखील तंत्रशास्त्रानें सोडिलें नाहीं.

"तथागतगुह्य" किंवा "गुह्यसंमध" नामक बौद्ध धर्माच्या ग्रंथांत पूजेच्या समयीं हत्ती, घोडा, कुत्रा यांचें मांस खाणें शुद्ध मानिलें आहेः—

हस्तिमांसं हयमांसं श्वानमांसं तथोत्तमम् ।
भक्षयेदाहरं कृत्यर्थंनचान्न तु विभक्षयेत् ॥

व्रत, देहदंडन इत्यादिकेंकरून जी सिद्धि प्राप्त होत नाहीं ती सर्व कामोपभोगापासून होतेः—

दुष्करैर्नियमैस्तीव्रैः सेव्यमानो न सिद्ध्यति ।
सर्वकामोपभोगैस्तु सेवयं श्वाशु सिद्ध्यति ॥

चांडाल कन्यादिकांशीं संभोगानें सिद्धि प्राप्त होतेः—

द्वादशाब्दिकां कन्यां चण्डालस्य महात्मनः ।
सेवयेत् साधको नित्यं विजनेषु विशेषतः ॥

पूजकांनीं अन्नांत मलमूत्र मिश्रित करून तें खावेंः—

विण्मूत्रशुक्ररक्तानां जुगुप्सां नैव कारयेत् ।
भक्षयेद्विधिना नित्यमिदं गुह्यं त्रिवज्रम् ॥

---

## उपसंहार.

जे कोणी हें पुस्तक विचारपूर्वक वाचतील त्यांस हिंदुधर्माचें स्वरूप काय आहे हें दिसून आल्यावांचून राहणार नाहीं. ह्यांत जें कांहीं लिहिलें आहे त्याला ग्रंथांचा आधार दाखविला आहे. आतां ह्यांत आपण काय पाहिलें याचा पुनः विचार करूंः—

वेदांचें ईश्वरप्रणीतत्व व अनादित्व.

ज्या वेदांस हिंदु लोक ईश्वरप्रणीत व अनादि समजतात त्यांविषयीं त्यांमध्यें कांहीं प्रमाण मिळत नाहीं. वेदमंत्र प्राचीन आर्यऋषींनीं रचलेल्या प्रार्थना होत, ते त्यांनीं जगाच्या कल्याणासाठीं अथवा दुसऱ्यास उपयोगीं पडण्याच्या हेतूनें मुळींच रचिले नव्हते; त्यांस स्वतां ज्या संसाराच्या वस्तूंची गरज होती, त्या आपल्या उपास्य देवतांपाशीं मागण्याच्या हेतूनें रचलें. पापक्षमाविषयींचे मंत्र क्वचित् आढळतात.

दुसरी गोष्ट आपण अशी पाहिली कीं, वेदांची अनेक काळीं व अनेक प्रकारें उत्पत्ति झाली असें हिंदु ग्रंथकारच कबूल करितात. तेव्हां त्यांचें अनादित्व तें कोठें राहिलें?

वेदांची योग्यता कोणीं कमी केली?

हिंदु ग्रंथकारांनींच रामायण, भारत, पुराणें इ० ग्रंथांस ईश्वरप्रणीत मानून वेदांची योग्यता कमी केली. एका वेदांत तर असें ह्मटलें आहे कीं, यज्ञाच्या उच्छिष्टापासून वेद झाले. एका ब्राह्मणांत (कौषीतकी ब्रा.) यजुर्वेद व सामवेद यांस ऋग्वेदाचे परिचर (सेवक) ह्मटलें आहे. एक पुराण ह्मणतें कीं, वेदाच्या भ्रमखंडनार्थ तें रचिलें. तेव्हां वेदाशिवाय दुसरेही ग्रंथ ईश्वरप्रणीत असून प्रमाणभूतही मानिले पाहिजेत. परंतु असें मानणारास एक मोठी अडचण ही आहे कीं, वेद व पुराणें यांतील बहुत महत्त्वाच्या गोष्टी परस्परांशीं अत्यंत विरुद्ध आहेत (हें आह्मी पुढें दाखवूं), तेव्हां त्यांतून कोणतें खरें मानावें?

वेदाची चोरी.

वेदाच्या उत्पत्तीसंबंधी ज्या कथा आहेत त्यांपैकीं ब्रह्मदेवापासून एका असुरानें वेद चोरून नेले व त्यामुळें ब्रह्मदेवानें मोठा शोक केला, अशी जी कथा आहे, तींत वेदाचा अपमान करावा किंवा ब्रह्मदेवाची दुर्बलता दाखवावी, ह्यांतून कोणतें कथारचकाच्या मनांत होतें हें समजत नाहीं.

वेदमंत्रच देव झाले.

वेदमंत्रांच्या काळांमागून झालेलीं जीं बहुत ब्राह्मणें त्यांनीं तर त्या मंत्राचा चिवडा करून टाकला आहे. प्रोफेसर मोक्षमुल्लर यांचें मत असेंच आहे. ते ह्मणतात कीं, "ब्राह्मणांच्या कर्त्यांस

वेदमंत्राचा खरा अर्थ अगदीं समजेनासा झाला. ह्याचें कारण असें दिसतें कीं वेद व ब्राह्मण यांच्या मध्यें दीर्घकाळ जाऊन वेदार्थाची परंपरा तुटली असावी." ( Anc. Sanskr. Lit. पृ. ४३२. )

प्रो. हेजलिंग यांनीं श. प. ब्रा. चें भाषांतर केलें आहे. ते ह्मणतात कीं, मी जें भाषांतर करीत आहें त्याचा स्वीकार साधारण वाचक कसा करितील याची मला भ्रांति बाळगायाला नको. जगांत जितके विद्याविषयक ग्रंथ आहेत त्यां सर्वांत ब्राह्मणें नामक जे हिंदु देवज्ञानाचे ग्रंथ आहेत त्यांविषयीं त्या ग्रंथाचा विशेष अभ्यास करणारीं मनुष्यें खेरीज करून दुसरें कोणी अगत्य बाळगिणार नाहींत. त्यांत जसें कंटाळवाणें, लांबलचक अर्थवाद ( टीका ) आहेत व त्या अर्थवादांत सयुक्तिक विचारांबद्दल जितक्या हटवादाच्या उपपत्ति व असार सांकेतिक लक्षणाच्या पद्धति आहेत तितक्या कदाचित् दुसऱ्या कोणत्याही ग्रंथांत क्वचित असतील ( वै. हि. ध. पृ. १०६ ).

ह्या ब्राह्मणांनीं यज्ञादि क्रियांचा इतका पाल्हाळिक अर्थ केला कीं, त्याप्रमाणें प्रयोग चालविणें कठीण पडूं लागलें; ह्मणून पुढें त्या ब्राह्मणांचा अर्थ समजण्याकरितां वेदांगें झालीं. त्यांत कल्पसूत्रें हीं मोठ्या महत्त्वाचीं होऊन बसलीं. त्यांच्या अर्थाची पुढें भ्रांति पडूं लागली ह्मणून त्यांवर भाष्यें व टीका झाल्या. याप्रमाणें मूळच्या सुलभ, सरळ, साध्या व घरगुती वेदमंत्रांवर काळाचें व अर्थवादाचें दाट धुकें पडून त्यांचें खरें स्वरूप झांकून गेलें.

आणखी ह्या ब्राह्मणांनीं ब्राह्मवर्गाचें मोठें स्तोम माजविलें, वैदिक क्रियांचें महत्त्व व कर्मठपणा वाढविला, आणि

तो ब्राह्मणांच्या अधिकारांत दिला. जादूच्या मंत्रांत मानिल्याप्रमाणें वेदमंत्रांत सामर्थ्य आलें. मंत्रांनीं आवाहित केलेल्या देवतांपेक्षां मंत्रच थोर देव होऊन बसले. तसेंच हे मंत्र कोणीं ह्मणावे, केव्हां ह्मणावे, केव्हां ह्मणूं नयेत, कसे म्हणावे, कोणता वेद केव्हां पठण करावा असेही विचार कालेंकरून निघाले. वेदमंत्रांमध्यें कित्येक शब्द हळू व कित्येक मोठ्यानें ह्मटले पाहिजेत असेही विचार निघाले. "वौशट" आणि "रुद्र" हे यज्ञकर्त्याचा नाश करणारे शब्द आहेत असें मानून ते हळू ह्मणूं लागले. मोठ्यानें ह्मणायाच्या शब्दास "उपांशु" व हळु ह्मणायाच्यास "तूष्णीम्" व मध्यम स्वरानें ह्मणायाच्या शब्दास "मध्यम" व फार मोठ्यानें ह्मणायाच्यास "उत्तम" अशीं नांवें पडलीं. वेदविक्रय करूं नये व वेद लिहूं देखील नये, ह्मणजे त्याच्या प्रती करूं नये याविषयीं कठीण निषेध होऊं लागला. भारतांत असें सांगितलें आहे कीं जे वेदविक्रय करितात अथवा जे तो लिहितात ते नरकास जातातः—

> वेदविक्रयिणश्चैव वेदानां चैव लेखकाः ।
> वेदानां दूषकाश्चैव ते वै निरयगामिनः ॥

याप्रमाणें वेदाच्या ठायीं जी अंगभूत पूज्यता व योग्यता नव्हती ती ह्या ब्राह्मणग्रंथांनीं व मन्वादि स्मृतींनीं त्याला दिली.

वैदिक देव.

वेदांत एकदेवमत नाहीं हें सांगणें नको. प्रोफेसर मोक्षमुल्लर, ज्यांनीं वेदाचा चांगला अभ्यास केला होता, त्यांचीही ह्याजविषयीं हीच साक्ष आहे. ऋग्वेदाच्या पहिल्या अष्टकाच्या सत्ताविसाव्या सूक्ताच्या श्लो-

वटीं येणेंप्रमाणें आहेः—"मोठ्या देवांस नमस्कार असो. लहान देवांस नमस्कार असो. तरुण देवांस नमस्कार असो. ह्मातान्या देवांस नमस्कार असो....हे देवांनो, कोणत्याही एकाद्या जुन्या देवाच्या स्तुतीचा अतिक्रम मजकडून होऊं देऊं नका."

देव तेहतीस आहेत असें वेदांत वारंवार ह्मटलें आहे हें आह्मीं मागें सांगितलेंच आहे. प्रोफेसर व्हिटनी असें ह्मणतात कीं, "वेदांचीं बहुतेक सूक्तें वैदिक मंडळांतील देवतांची स्तुति करण्यांत तल्लीन झालीं आहेत; आणि एकाच देवाचीं हीं अनेक रूपें आहेत अशी जी ( ब्राह्मणांची ) व दयानंद सरस्वतींसारख्या वेदाचा विपरीत अर्थ करणारांची कल्पना ही त्यांच्या गांवीं मनीं देखील नव्हती."

"कित्येक सुक्तांत बहुदेवमत अगदीं ढळढळीत दिसून येतें, कांहीं स्तोत्रांत तें धुंद दिसतें, आणि कित्येक स्तोत्रें अशीं आहेत कीं, जर तेवढींच मात्र वेदांत असतीं तर त्यांत एकेश्वरी मत आहे असें ह्मणण्यांत हरकत नसती. एकाच उत्पन्न झालेल्या देवांची थोडका काळपर्यंत सद्दी चालल्यावर ते एकमेकांत मिळून गेले. द्यौस हा सर्वत्र असणान्या प्रकाशादाखल आकाश होता. वरुण हा सर्वव्यापक आकाश होता. मित्र प्रभातकाळचें प्रकाशित झालेलें आकाश होता. सूर्य हा आकाशांत प्रकाशणारा रवि होता. सविता हा प्रकाश व जीवन आणणारा सूर्य, विष्णु हा तीन पदांनीं आकाशाचें आक्रमण करणारा सूर्य. इंद्र हा पर्जन्याचा दाता असा आकाशांत प्रगट झाला. आणि मरुत हे वादळांतून आकाशाक्रमण करीत चालले. वात आणि वायु हे अंतरिक्षांतील वारे होते. अग्नि हा विस्तव व उजेड होता."

"यामुळें सर्वदा असें होई कीं, एका देवाविषयीं जें सांगितलें जाई तेंच दुसऱ्याही देवाविषयीं सांगण्यांत येई. एका देवाचे नांवाचे बहुत जण वांटेकरी होत, एका देवाच्या कथा अनेक देवांविषयीं सांगण्यांत येत असत."

वैदिक देवांविषयीं हे वरील विचार 'वैदिक हिंदुधर्म' ह्या नांवाच्या पुस्तकांतून घेतले आहेत.

वैदिक ग्रंथांतील क्षुल्लक कथा.

ब्राह्मणनामक ग्रंथांत वैदिक यज्ञ व मंत्र आणि विशेषेंकरून प्रजापति व इतर देव यांच्या ज्या कथा आहेत त्या वेदांतील मंत्रांशीं जुळत नसून फारच पोरकट आहेत, व "आर्यलोकांच्या विधिनिषेधात्मक धर्माचें मूळ, सकल शास्त्रांचें आदिस्थान, सकल स्मृतींचें आदिकारण, सकल पुराणांचें उत्पत्तिस्थान" असा वर्णिलेला व अनादिसिद्ध मानिलेला जो वेद त्याला त्या अगदीं शोभण्याजोग्या नाहींत. जे उतारे आह्मी ह्या पुस्तकांत ( **ब्राह्मण** प्रकरणांत ) उदाहरणार्थ घेतले आहेत ते पहावे; त्यांवर एथें विशेष चर्चा करणें नको.

सृष्ट्युत्पत्तीसंबंधी अज्ञान.

सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं हिंदुशास्त्रकारांमध्यें जसें अज्ञान दिसून येतें तसें दुसऱ्या कोणत्याच गोष्टीविषयीं दिसत नाहीं असें ह्मटलें असतां चालेल. ईश्वराविषयीं मनुष्याला जें स्वाभाविक ज्ञान व्हावयाचें तें उत्पत्तीच्या कृत्यावरून होतें, त्यांत त्याचा अनाद्यनन्त शक्ति व देवत्व हीं दिसून येतात; परंतु वेदशास्त्रादि ग्रंथांत जें सृष्ट्युत्पत्तीचें वर्णन आहे त्याजवरून ईश्वराच्या गुणांवर अगदीं छाया पडते. ईश्वरानें आपल्या

इच्छामात्रेंकरून, आपल्या परम सामर्थ्यानें आपलें महत्व प्रगट करण्यासाठीं शून्यापासून सकल वस्तु उत्पन्न केल्या, व त्या सर्व अत्युत्तम होत्या, आणि त्याच्याच शक्तीनें त्या स्थित आहेत, व तोच त्या सर्वांचा परमसमर्थ शास्ता आहे, ही कल्पना हिंदुशास्त्रकर्त्यांच्या मनांत आली नाहीं. "प्रजापतीला आपणच बहुत व्हावेंसें वाटलें. त्यानें तप केलें, त्यानें कष्ट केले, तो आपणच जन्मला, तो द्विधा झाला, तो आपणच सृष्टि बनला, तो अंड्यांत राहिला, तो स्वकीय सृष्टिला भ्याला;" अशा प्रकारचे ब्राह्मणादि प्राचीन वैदिक ग्रंथांतील वर्णन सर्वसमर्थ, सर्वज्ञ व सर्वज्ञानी सृष्टिकर्त्याला अगदीं शोभत नाहीं. त्यापेक्षां ऋग्वेदांत इंद्रादि देवांनीं सृष्टि केली असें जें साधारण वर्णन आहे तें बरें ह्मटलें पाहिजे.....वैदिक ऋषींपाशीं ह्या सृष्टिकर्मासंबंधी कांहीं तरी सत्यज्ञान होतें; कारण ते आद्य सत्याचा कांहीं अंश घेऊन मूळ जनस्थानापासून ह्या देशांत आले होते; परंतु त्यांच्या मागून सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं ज्या ज्या कल्पना निघाल्या त्या सर्व स्वप्नसृष्टिवत् होत्या. सृष्ट्युत्पत्तीचा ईश्वरी हेतु लीला ह्मणजे खेळ करण्याचा होता असें पुढें पुराणकर्ते ह्मणूं लागले.

उपनिषदांची वेदविरुद्ध बंडाळी.

ब्राह्मण ग्रंथांनीं जशी वेदमंत्रांच्या अर्थांची चिवडाचिवड केली तशी उपनिषदांनीं वेद व ब्राह्मण यांची उघड निंदा केली. ज्या यज्ञाला भाविक आर्यऋषि 'सत्यधर्माचा मार्ग,' 'स्वर्गास जाण्याचा सेतु' असें ह्मणत व यज्ञशालेला '———' (मन्याचें घर) ह्मणत, त्या यज्ञापासून, ह्या उपनिषदांतील पंडितांनीं ठरविलें !

विद्येचे परा व अपरा असे भेद केले—"जे पुरुष यज्ञ करणाराचें कर्म चांगलें नव्हे असें जाणत नाहींत ते पीडायुक्त होतात व नष्ट होऊन खालीं पडतात" ( मुंडकोपनिषद ) असें बेधडक ह्मणूं लागले. जर वेदसंहिता ईश्वरदत्त आहे तर तिचा वेदभीरु लोकांनीं असा अपमान करावा काय ? तसेंच सर्व वेद समान मानिलेले असून सामवेद अशुद्ध व तीन वेदांचे उपाध्ये वर्ज करून केवळ अथर्ववेदी ब्राह्मणास राजानें आपला गुरु करावा असे नेम कां घालून दिले ? ह्याला वेदविरुद्ध बंडाळी नाहीं तर काय ह्मणावें ?

सच्छास्त्राचीं कित्येक लक्षणें.

वैदिक धर्माचा निरोप घेण्यापूर्वीं आणखी एक दोन गोष्टींचा विचार केला पाहिजे. वेदाला हिंदु लोक ईश्वरी शास्त्र मानितात, तर ईश्वरी शास्त्रांचीं लक्षणें त्यांत कोणतीं दिसतात हा प्रश्न करणें साहजिक व यथार्थ आहे. वेदांत सत्य व जीवंत अशा एकाच परमेश्वराची भक्ति कोठे सांगितली आहे ? जसें आतां हिंदुलोक अनेक देवांची भक्ति करितात तशीच आर्यलोक करीत असत. सच्छास्त्राचें आणखी एक लक्षण हें आहे कीं, त्याच्या द्वारें ईश्वर मनुष्याशीं बोलतो. वेदमंत्रांच्या द्वारें ईश्वर मनुष्याशीं बोलतो काय ? निदान ज्या देवतांची त्यांत आराधना केली आहे तीं दैवतें तरी आपल्या भक्तांशीं बोलतात काय ? ज्या ब्रह्मदेवाच्या मुखापासून वेदोत्पत्ति झाली त्याविषयीं तर वेदांत कांहींच उल्लेख नाहीं, व तोही आपल्याविषयींचें कांहींच ज्ञान प्रगट करीत नाहीं. अत्यंत प्राचीन व पूज्य मानिलेला

जो ऋग्वेद त्यांत जिकडे पहावें तिकडे ऋषीच आपल्या उपास्य दैवतांची प्रार्थना व स्तुति व धांवा करितात; ते त्यांचे गुण वर्णितात, त्यांस निमंत्रण करितात, आपण रचलेल्या स्तोत्रांची व यज्ञांची प्रशंसा करितात; इंद्रादि देवांस यज्ञाला बोलावितात; पण इंद्र किंवा अग्नि किंवा अदिती त्यांस दर्शन देतो, व स्वकीय ज्ञान शिकवितो, त्यांस बोध करितो, त्यांच्या सत्कर्मांची स्तुति किंवा कुकर्मांचा निषेध करितो, त्यांस अभिवचनें व आशीर्वाद देतो, स्वर्गाची आशा लावितो व नरकाचें भय दाखवितो कसें कांहीं आढळत नाहीं. पाप्याचा उद्धार कसा होईल, पाप्याचा मार्गदर्शक व तारक कोण ? जगाची दुरावस्था कशी दूर होईल इत्यादि अगत्याचे विषय वेदमंत्रद्वारें ईश्वरानें प्रगट केले नाहींत. तर अशा शास्त्राला ईश्वरी प्रगटविणें कसें ह्मणावें ? विचारवंतांनीं याचा विचार करावा.

वैदिक व पौराणिक परलोकांचें वर्णन.

वैदिक ग्रंथांत स्वर्ग, नरक, मनुष्याची मरणोत्तर स्थिति इ० पारलौकिक गोष्टींची जी माहिती मिळते ती पुराणादिक ग्रंथांतील त्याच विषयींच्या माहितीहून अगदीं भिन्न आहे. भूलोकींची स्थिति जशी कालगतीनें बदलते तशी परलोकाचीही स्थिति बदलत असते काय ? पौराणिक स्वर्ग व नरक यांचें वर्णन खरें आहे तर वैदिक स्वर्ग व नरक हीं मिथ्या आहेत असें ह्मटलें पाहिजे; वेद व पुराणें यांस ईश्वरी शास्त्र मानणारानें यांतून कोणतें ग्रहण करावें ? वेदांतांतील ब्रह्म व ब्रह्मसाक्षात्कार यांजवर विश्वास ठेवणारानें तर ह्या गोष्टीचा अगदींच त्याग केला पाहिजे, कारण वेदांतील स्वर्गवास व वेदांतांतील मोक्ष यांत वस्तु व अवस्तु यांच्यासारखा भेद आहे.

वेदांतील परंपरागत कथा व सांप्रदाय.

वेदांत ज्या देवादिकांच्या कथा आहेत त्यांतून कित्येकांस पूर्वी घडलेल्या गोष्टींचा आधार दाखविला आहे, व दाखले दिले आहेत, तसेंच यज्ञयागादि क्रियांचे प्रयोग पूर्वींच्या सांप्रदायांवर स्थापिले आहेत; तर ह्या पूर्वापार कथा व पूर्वसांप्रदाय कोणत्या ग्रंथांत पहावे? वेद अनादि आहेत तर अनादिकालाच्या पूर्वी काय होतें, व कोणत्या गोष्टी घडूं शकतात व कोणते सांप्रदाय चालू असतात? वेदाच्या पूर्वी कांहीं ग्रंथ आर्य लोकांपाशीं होते असें ह्मणावें तर त्याला कांहीं प्रमाण सांपडत नाहीं, व ते ग्रंथही उपलब्ध नाहींत; तेव्हां वैदिक धर्माला आधार परंपरागत चालत आलेल्या दंतकथा व वडिलांचे सांप्रदाय हींच होत. परंतु दंतकथा व सांप्रदाय हे स्थिर रहात नसतात; बहुतेक दंतकथा अविश्वसनीय असतात. त्या पराच्या कावळ्याप्रमाणें कालेंकरून वाढतात. रजाचा गज होतो. उदाहरणार्थ वैदिक त्रिविक्रमाच्या बीजरूप कथेपासून वामनावताररूप महावृक्ष झाला. 'दुर्गाणि' ह्या एक वैदिक शब्दापासून दुर्गादेवी उत्पन्न झाली! सांप्रदायही वारंवार बदलतात. वेदाचे सांप्रदाय वेदांत देखील बदललेले दृष्टीस पडतात. ऋग्वेद व अथर्ववेद यांतील कर्मकांडांत व दैवतांत पुष्कळच अंतर दिसून येतें. याची चर्चा मागें आह्मीं केली नाहीं ह्मणून एथें एक दोन उदाहरणें सांगतों—"अथर्ववेदांत विष्णूचें एकही स्तोत्र नाहीं; तसेंच अग्नीचें माहात्म्य ऋग्वेदांतल्याप्रमाणें त्यांत वर्णिलेलें नाहीं, तर दक्षिणाग्नि, पूर्वाग्नि व गार्हपत्य असे त्याचे विभाग केले आहेत. अथर्व-

वेदांत ऋग्वेदांत नाहीत असे नवे देव सांगितले आहेत. भवशार्व हा एक नवा देव, आणि सर्प देव ( तक्षक ) हा एक दुसरा स्तविला आहे, तसेंच काल आणि काम हेही अ० वे० तील नवे देव होत." ( म्यूरकृत ग्रंथांवरून. ) वेदांतील सांप्रदाय ब्राह्मणांत बदलले व ब्राह्मणांतील सांप्रदाय पुराणकर्त्यांनीं ग्रहण केले नाहींत, व पौराणिक कालांतील सर्व सांप्रदायाप्रमाणें प्रस्तुतचे हिंदुलोक चालत नाहींत. सूत्रें व शाखा, गोत्रें व जाति, कुलाचार व देशाचार व रूढी यांच्या संबंधानें हिंदुलोकांच्या धर्मकर्मांमध्यें अनेक भेद पडून तेच शास्त्र होऊन बसले आहेत[1].

ब्रह्म व ब्रह्मदेव.

षट्दर्शनांतील पारमार्थिक ज्ञानाचा मुख्य विषय जें ब्रह्म त्याचें मूळ वेदांत ह्मणजे ऋग्वेदांत सांपडत नाहीं. इंद्र, वरुण, अग्नि, आदित्य यांचें जसें वर्णन वेदांत आहे असें ब्रह्माचें नाहीं. ब्राह्मणधर्माच्या वाढींत ब्रह्म व ब्रह्मा (स्तोत्र व स्तोत्रकर्ता) ह्या शब्दांचे अर्थ बदलून त्यांपासून त्या नांवाचा एक नवीन देव उत्पन्न

१ आश्वलायन गृह्यसूत्र भाषांतरसहित प्रसिद्ध करणारे विद्वान् रा० ब० गोपाळ हरि देशमुख त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत ( पृ० ५३ ) असें ह्मणतात कीं, " सूत्रोक्त रीतीनें मृताकरितां अग्नींत पिंड देऊन दुग्धप्राप्त्यर्थ अनुस्तरणी ( गाईचें दहन ) करण्याची पूर्वीं रीत होती. त्याचप्रमाणें एकंदर श्राद्धांतही कव्यवाहन नामक अग्नीचे द्वारेंच मृताला पिंड देण्याची चाल होती. इत्यादि पूर्वरीति जाऊन अनुस्तरणीच्या बदला गोदान करून व कव्यवाहन अग्नि ब्राह्मणाचे दक्षिण हस्तांत असल्यामुळें ब्राह्मणांसच भोजन घालून लोक निर्वाह करूं लागले. इत्यादिक आचार विचार बदलत चालले आहेत."

झाला. एका विद्वानाचें असें मत आहे कीं, "वेदमंत्रांतील देवतांचा उपनिषद व दर्शनकार यांस कंटाळा आला किंवा विसर पडला, आणि त्यांची उपासना फारच स्थूल व पोरकट वाटूं लागली. आणखी तशांत विष्णु व शिव यांची भक्ति लोकांत फार पसरत चालली, तेव्हां त्यांनीं ज्ञानी लोकांच्या तार्किक विचारांकरितां हें ब्रह्म उत्पन्न केलें, आणि त्यास आपल्या काल्पनिक ज्ञानाला शोभेल व आपल्या गूढ व भ्रमिष्ठ विचारांला रुचेल असें रूप दिलें. त्याच्यापूर्वी वेदांतील जें ब्रह्म (स्तोत्र) त्याला ब्रह्मा असें रूप देऊन त्याच्या ठायीं देवत्व आरोपिलें होतें. हा ब्रह्मदेव ज्ञान व विद्या यांचा रक्षक, मनुष्यांचा जनिता, सकल सृष्टीचा उत्पादक असा कल्पिला गेला. त्याला त्याच्याच गुणाची सरस्वती किंवा वाच्नामक कन्या करून दिली. त्याच्यासाठीं त्याच्या नांवाचें एक पुराणही रचलें. त्याला शिव आणि विष्णु यांच्यापेक्षांही कित्येकांनीं श्रेष्ठत्व दिलें; तरी ह्या ब्रह्मदेवाची भक्ति बहुत काळ चालली नाहीं. ती जी एकदां बुडाली ती पुनः वर आलीच नाहीं." ख्रिस्ती शास्त्रांत असें एक भविष्य आहे कीं, "ज्या देवांनीं आकाशें व पृथ्वी उत्पन्न केलीं नाहींत ते पृथ्वीवरून व या आकाशांखालून नष्ट होतील." (इर्मया. १०. ११.) त्याप्रमाणें हा मिथ्या सृष्टिकर्ता नष्ट झाला. असेच दुसरेही होतील.

त्रिमूर्ति.

याप्रमाणें वैदिक देवांचा महिमा अस्तास जात असतां व ब्रह्मदेव ध्यानस्थ होऊन लोकांच्या मनांतून उतरल्यावर, व त्याच्या भक्तीचा लोप झाल्यावर हिंदुधर्मस्थापकांनीं आणखी दोन देव निर्माण क-

रून जशी वेदांत एक प्रकारची त्रिमूर्ति होती तशी, किंबहुना तिजपेक्षां महापराक्रमी, गुणसंपन्न, क्रियाविशिष्ट, सर्वव्यापक व अत्यंत जाज्वल्य अशी त्रिमूर्ति कल्पिली. हे तीन देव केवळ नवीन होते असें नाहीं. जसा ब्रह्मा ब्रह्म शब्दापासून झाला तसेच विष्णु व रुद्र हेही त्या त्या नांवाच्या वैदिक दैवतांपासून झाले. पण जे वेदांत सूक्ष्म रज (बारीक कण) होते ते पुराणादि ग्रंथांत महागज (मोठे हत्ती) झाले. वेदांत विष्णु हा इंद्राचा कनिष्ठ बंधु, (उपेंद्र) व इतर देवांच्या बरोबरीचा होता, तो 'परब्रह्म,' 'विश्वरूप,' 'विश्वाधार' असा झाला. सौम्य स्वभावाचा जो वैदिक रुद्र तो रूपांतर पावून अतिशय उग्र व तामसी गुणाचा घोर व भीम (भयानक) रूपाचा 'महादेव' होऊन 'ओंकाररूप' पावता झाला.

पौराणिक देवांचें माहात्म्य.

वैदिक ऋषींनीं आपल्या उपास्य दैवतांचीं लहान लहान स्तोत्रें रचिलीं होतीं, व तीं आपआपल्या घरांत, गाईच्या गोठ्यांत, लौकिक यज्ञशाळेंत, शेतांत रानांत, युद्धांत गाण्याची चाल असे, परंतु ह्या पौराणिक देवांचीं मोठालीं पुराणें झालीं, व तीं मूर्तींच्या देवळांत, मोठ्या लोकसमाजापुढें, वर्षांतून अनेक काळीं व अनेक मासांत वाचून दाखवूं लागले. याशिवाय त्यांच्या अवतारवर्णनाचे रामायण व भारत असे दोन मोठाले ग्रंथ झाले. वेदधर्मी लोकांमध्यें केवळ शाखाभेदी होते, परंतु शिव आणि विष्णु यांच्या उपासकांचे परस्पर विरोधी असे महाप्रचंड पंथ माजले. वैदिक देव आपआपल्या भक्तांच्या रक्षणार्थ एकमेकांशीं युद्ध करीत असत असें कोठें आढळत नाहीं. वैदिक ऋषि एका देवाच्या भयापासून किंवा शिक्षेपासून

आपलें रक्षण व्हावें ह्मणून दुसऱ्या देवाची प्रार्थना करीत असें कोठें कोठें आढळतें; कामापुरता एखादा देव त्याच्या भक्तापासून उसना घेत असत. परंतु शिव विष्णु यांनीं आपापल्या भक्तांचा पक्ष धरून परस्परांशीं युद्ध केल्याच्या व एकमेकांचा अपमान केल्याच्या अनेक कथा पुराणांतरीं आहेत.

त्रिमूर्तींची उत्पत्ति.

त्रिमूर्तींच्या उत्पत्तीविषयीं कांहींच संगतवार वृत्तांत सांपडत नाहीं. ब्रह्मा, विष्णु, शिव हे परब्रह्मापासून झाले असें सांगितलें असून ते त्याचे तीन गुण आहेत असेंही ह्मटलें आहे. आणखी शिवापासून विष्णु, विष्णूपासून शिव व ब्रह्मा झाला, आणि ब्रह्मदेवापासून शिव झाला असेंही सांपडतें. एका शैव पुराणांत तर ब्रह्मा शिवविष्णूच्या संयोगापासून झाला असें सांगितलें आहे. आणि उमेला विचारिलें असतां ती ह्मणते कीं, ब्रह्मा, विष्णु, शिव हीं माझीं बाळें आहेत; व मीच सर्वांची आदिमाता !

ह्या देवांचे उपासक जेव्हां त्यांची स्तुति करितात तेव्हां ते त्यांस त्यांच्या बरोबरीच्या देवांस अत्यंत नीच समजतात, ह्मणजे शिवाचा उपासक विष्णूला शिवापेक्षां कनिष्ठ समजतो, व तसेंच शिवाविषयीं विष्णुभक्त समजतो. इतक्यानें हे भक्त तृप्त झाले नाहींत, तर त्यांनीं आपआपल्या देवाचें महत्त्व वाढविण्याकरितां दुसऱ्या देवांस नीचत्व येईल अशा कथा रचिल्या. ब्रह्मदेवास विष्णूच्या नाभिकमलाचा थांग लागला नाहीं; ब्रह्मा आणि विष्णु ह्यांस शिवलिंगाचा थांग लागला नाहीं; ब्रह्मदेवानें शिवाला यज्ञांत भाग असावा असें ठरविलें. ह्या देवांस जणूं काय कमळ व लिंग यांचा

थांग लावण्यावांचून दुसरें कामच नव्हतें; व त्यांच्या भक्तांस, त्यांस एकमेकांच्या पायां पडायास लाविल्यावांचून त्यांचें ऐश्वर्य वर्णन करण्याचा दुसरा मार्गच नव्हता. वैदिक देवांचे भक्त आपल्या देवांविषयीं असें समजत नसत. जो तो देव त्यांस परमश्रेष्ठ वाटत असे खरा, पण इतर देवांला ते कनिष्ठ मानीत नसत.

त्रिमूर्तींची सृष्ट्युत्पत्ति.

ह्या त्रिमूर्तींतील प्रत्येक देव सृष्टिउत्पादक होता, पण त्यांचा उत्पत्तिक्रम एक नसून फार विलक्षण होता. कोणी प्राणी सहज त्यांच्या शरीरांतून निघे, कोणी असुर कानांतून निघे, कोणी अंगुष्ठांतून, कोणी केशांतून अशीं त्यांचीं सृष्ट्युत्पत्ति कार्यें. ब्रह्मदेव सृष्टि करितां करितां थकला, शेवटीं त्याला ती नीट साधेना ह्मणून त्यानें दुसऱ्यास तें काम सोंपविलें. प्रजापति आपल्याच सृष्टीला भिऊन पळत सुटला व पाण्यांत लपून बसला. सृष्टींत पापी व पुण्यवान्, सात्विक, राजस व तामस अशा गुणांचे देव, मनुष्य, राक्षसादि प्राणी आरंभापासूनच उत्पन्न झाले. प्रजापतीनें जी आपली तनु टाकिली तिचें धुकें झालें. गायींस पूर्वीं शिंगें नव्हतीं, तीं त्यांच्या विनंतीवरून ब्रह्मदेवानें त्यांस मागाहून दिलीं. प्रजापतीनें हात चोळिले ह्मणून आतां आपल्या तळहातास केश नाहींत !!

त्यांच्या सृष्टींतील बंदोबस्त.

अशा सृष्टीवरून सृष्टिकर्त्यांचें स्वकीय गौरव तर प्रगट झालें नाहीं तर उलटें त्यांचें दौर्बल्य दिसून आलें. त्यानें उत्पन्न केलेल्या प्राण्यांनीं त्यांनींच दिलेल्या वरांच्या जोरावर त्यांवर बंडावून त्रिभुवनांत धुमाळी करीत सुटावें; असें झाल्यावर एका थोर देवानें

दुसऱ्या थोर देवास शरण जावें, तेव्हां त्यानें त्याला अभयवचन देऊन व स्वतां अवतार धरून, अथवा आपला एक केश किंवा अंश पाठवून बळानें किंवा कपटानें त्यांच्या शत्रूंला जिंकावें. याप्रमाणें एकामागून एक राक्षसांची किंवा दैत्यांची त्रैलोक्यांत बंडाळी युगानुयुग चालतच असे. सृष्टीचा बंदोबस्त ह्मणून ह्या त्रिमूर्तींच्या हातून कधीं झालाच नाहीं. देव आणि दानव यांचे युद्ध कधीं संपलेंच नाहीं. एकावर एक चढाओढीनें तप करणारा असूर व राजा व राक्षस उठायाचाच. अवतारामागून अवतार, युद्धावर युद्धें; तींही केवळ ह्या पृथ्वीवरच नाहीं, तर स्वर्ग आणि पाताळ यांतही चालायाचीं. एका जन्मांत अशा धुमाळीची हौस पुरली नाहीं तर अनेक जन्म घेऊन व अनेक देहांतरें करून ती पुरवावी. असे हे वरदी दैत्य दानव होते.

युग, मन्वंतर, कल्प यांचें रहाटगाडगें.

इतकेंच नाहीं, तर कथारचकांनीं ही स्थिति निरंतर चालत आहे असें लिहून ठेविलें आहे. ब्रह्मादिकांच्या आयुष्याचे जे कल्परूप कूप खणिले आहेत त्यांत हेंच रहाटगाडगें फिरायाचें; युगांच्या चौकड्या अनंत वेळां येऊन जायाच्या; जसा पृथ्वीवर सूर्योदय व सूर्यास्त नित्य होतो त्याप्रमाणें धर्माचा उदय व अस्त व्हावयाचा असें त्यांचें मत आहे. यांच्या पोटीं सृष्ट्युत्पत्तीच्या सर्व परस्परविरुद्ध व बऱ्यावाईट अकटोविकट कथा गडप होतात. ह्मणजे अमक्या मन्वतरांत त्या घडल्या असें सांगून हत्तींचे कळपांचे कळप निसटून जाण्याजोगी फट ठेविली आहे. हें युगांचें, मन्वंतरांचें व कल्पांचें वेड प्राचीन वैदिक ग्रंथकारांच्या डोक्यांत शिरलें नव्हतें.

वैदिक युगांत यज्ञद्वारें देव प्रसन्न होत अशी समजूत होती, तिचा हळु हळु ऱ्हास होऊन तपाचें खूळ माजलें. तपाचा मासला आम्हीं रामावतारवर्णनांत रावणादिकांच्या कथेंत दाखविला आहे. प्राचीन वैदिक ऋषींस आपल्या दैवतांपाशीं कांहीं मागायाचें झालें तर ते अशीं घोर तपें इतका दीर्घकाल करीत नसत. त्यांस मुळींच शंभर वर्षांच्या वर आयुष्य नसे, तेंही पुरतें मिळावें ह्मणून ते मोठ्या काळजीनें व दीनतेनें प्रार्थना करीत. पण सत्य-युगाच्या मागून धर्माचा ऱ्हास होत चालला असतां आयु-ष्याची वृद्धि कशी झाली? हजारों वर्षें तप करणारांचें प्राण कसे वांचले असतील? तप करणाराचा हेतु शुद्ध नसला तरी तो आपल्या तपाच्या बलानें सिद्धीस नेई. देवांस त्याला वर देणें भागच पडे. आपल्या सृष्ट प्राण्यांशीं व आपल्या प्रजेशीं याप्रकारें वागणें परमपवित्र व परमन्यायी सर्वसमर्थ परमेश्वराला शोभतें काय? ईश्वरानें दिलेले हस्तपादादि अव-यव व बुद्धि हीं त्याच्या सेवेस व मनुष्याच्या कल्याणार्थ सत्कर्मी खर्चण्याबद्दल अजगरवृत्ति धारण करून हजारों वर्षें जो तपांत आपलें आयुष्य व्यर्थ घालवितो अथवा स्वार्थबु-द्धीनें व नीच हेतूनें व्रतें आचारितो, त्याला ईश्वर प्रसन्न होईल काय? मुसलमान लोकांत खरखरमुंडा नांवाचे फकीर आहेत, ते भीक मागते वेळीं लोकांचें लक्ष आपल्याकडे लागावें व जें ते मागतील तें त्यांनीं द्यावें ह्मणून त्यांच्या दाराशीं धरणें धरून बसतात व अंगाला घाव करून घेतात; तशा प्रकारचे हे देवांपासून वर उपटणारे तपस्वी होते.

तपोबल.

अवतार.

अवतारांचीं कारणें पाहूं गेलें असतां जगास पापापासून तारण्याकरितां ह्मणून एकही अवतार झाला नाहीं. विष्णूचे अवतार ब्रह्मशापामुळें झाले, असें असतां तो धर्मरक्षणार्थ व भक्तरक्षणार्थ आला होता असेंही मानिलें आहे. वैदिक देव पृथ्वीवर येऊन मनुष्यरूपानें दीर्घ काल रहात नसत, परंतु रामकृष्णादि अवतार बहुत वर्षे जगांत राज्य व विलास करीत राहिले हें कसें? दहा अवतारांतून कोणता अवतार पाप्यास तारायास आला होता?

त्रिमूर्तींच्या आचरणाविषयीं लोंकाचा समज.

ब्रह्मा, विष्णु, शिव यांच्या गुणकर्मांविषयीं त्यांच्या अर्वाचीन उपासकांचा ग्रह फारच निराळा होऊं लागला; तेणेंकरून लोकांची व धर्मप्रवर्तकांची नीति व वर्त्तन कसें बिघडत चाललें हें दिसतें. उदाहरणार्थ ब्रह्मदेवाचे कन्यागमनाच्या दोषाविषयीं प्राचीन ग्रंथाकारांची कल्पना कशी होती ती पहा. त्याला देवांनीं भाल्यानें भोंसकिलें असें ब्राह्मणांत सांगितलें आहे, आणि ज्या भागवतांत ब्रह्मदेवाला त्या कर्माबद्दल मुनींनीं निषेधरूप बोध केला त्यांतच ( **त्रिमूर्ति** हें प्रकरण पाहा. ) कृष्णाच्या व्यभिचाराविषयीं असें लिहिलें आहे कीं, “जो कोणी त्याची रासक्रीडा श्रवण करील व दुसऱ्यास श्रवण करायास लावील त्याच्या मनांतील रोगरूपी अनादि विषयवासना दूर होतील.” ॥ विक्रीडितं व्रजवधूभिरिदं च विष्णोः श्रद्धान्वितोऽनुशृणुयादथ वर्णयेद्यः। भक्तिं परां भगवति प्रतिलभ्य कामं हृद्रोगमाश्वपहिनोत्यचिरेण धीरः॥ भा. १०. स्कं ३३. अ. ४०. श्लोक ॥

त्रिमूर्तींच्या इतर गुणांमध्यें कापटय हा गुण विशेष दिसून येतो. ब्रह्मदेवानें कपट करून कुंभकर्णास फसविलें. ( **रामावतार**वर्णन पहा. ) विष्णूनें बलीस व इतर असुरांस फसविलें. ( **वामन** व बौद्ध अवतार पहा. ) शिवाला तर स्वतां पार्वतीनेंच " वंचक " ह्मटलें आहे, मग दुसऱ्या साक्षीचें काय कारण ? काशीखंडांत ( अ. ७ ) ऋषि व देव हे मदनाच्या पाशांत सांपडून कसकसे वर्त्तते झाले याची एक याद दिली आहे:—

ह्यांचें कापट्य.

त्यांची कामवशता.

ऋषीमध्यें विभांडक महामुनी । दुसरा च्यवन ब्रह्मज्ञानी । त्यांनीं भोगिल्या शतकामिनी । ऐसा हा प्रकार जाणपां ॥ शतधृति कुमारी पारियेसी । तपोनिधी पराशरऋषी । तेणें स्वीकारलें मत्स्यगंधेसी । मग ते झाली सुगंधा ॥ या मकरध्वजाचे आवर्तीं । नारद होऊन पडला युवती । ते धीवरा घरीं जाहली जनिती । साठी संवत्सर एकदां ॥ जो शेषशाई नारायण । त्यासही छळता झाला मदन । तेणें सुंदर वेष घेऊन । वृंदा सती भोगिली ॥ जो ब्रह्मयांचा सुत पुलस्ती । तो या पंचबाणें केला युवती । तीतें भोगिता झाला सविता-सुरपती । झाले वाळी सुग्रीव ॥ मकरध्वजें भोगिल्या पतिव्रता । जे अहिल्या ब्रह्मयाची दुहिता । तिचे कटाक्ष बाण लागतां । चळ झाला इंद्रादिकां ॥ ब्रह्मांडाधिपति चंद्रचूडा । गजांबरी आणि त्र्यंबक मेंढा । तांडव नृत्यें भिल्लीपुढां । नाचविलें मज मदनें ॥ तैसेची हिमाद्री पाठारीं । भस्मासुर नाचविला वटेश्वरीं । तें माहाविष्णु केली नोवरी । या मदनेची ती ॥

पुराणकर्त्यांनीं जशी वैदिक देवांची भक्ति बुडविली तशीच वैदिक यज्ञक्रियेचीही मोठी उलटापालट केली. पौराणिक ऋषींनीं पशुयज्ञ हिंसा अशी

पशुयज्ञ.

ठरवून इंद्रास दोष, व वसुराजास शाप दिला. आणि इकडे आपण ठरविलेल्या यज्ञाचा काळ, खटपट, खर्च हीं अमर्याद वाढविलीं.

एक नवीन अप्रतिम देव.

परंतु सर्व देव, दानव, क्षत्रिय व राक्षस यांच्यापेक्षां थोर व पराक्रमी, अचाट कर्में करणारा, वामनाप्रमाणें त्रिपादानें नव्हे पण एका शब्दानें त्रिभुवन व्यापणारा, एकाच युगामध्यें नव्हे तर युगानुयुग मनुष्याच्या मनावर सत्ता चालविणारा, मुख्य देवांची कसोटी पाहणारा, इंद्राची खरडपट्टी काढणारा, विष्णूस शाप देणारा, शापानें त्रिभुवन कंपायमान करणारा, असुरांस पाण्यांत बुडविणारा, देवांस मंत्राधीन ठेवणारा, सर्व अवतारी पुरुषांपासून पूजा घेणारा, त्यांस त्यांच्या अवतारसंबंधी पापांपासून मुक्त करणारा, सर्व तीर्थांपेक्षां पवित्र, सर्व कर्मांचा अधिकारी, सर्व मालमत्तेचा स्वामी, सर्व शास्त्रांचा प्रवर्तक, सर्व शास्त्रांचा भ्रमहारक, नवीन शास्त्ररचक, अखिल जगताचा नियामक, सकल पापपरिहारक, महाफलदायक, सुरेंद्र, नरेंद्र, धर्ममूर्ति, धर्मावतार असा एक नवीन देव उत्पन्न झाला. त्याचें नांव ना इंद्र ना चंद्र, तो ना विष्णु ना शिव, ना ब्रह्मा ना ब्रह्म. तर तो कोण ? तो **ब्राह्मण** ! वेदांतील होता, पुरोहित, अध्वर्यु व ऋत्विज हे सर्व मावळले, आणि वैदिक ब्रह्म्याचा ब्राह्मण उगवला, सर्व देवांचें मुख, सर्व देवांस यज्ञ पोंचविणारा, सर्व देवांस यज्ञास बोलविणारा जो अग्नि तो विझाला, आणि ज्याचे उजव्या हातांत अग्नि व उजव्या कानांत गंगा, आणि उजव्या पादांगुष्ठांत सकल तीर्थें

असा महाबली ब्राह्मण प्रगट झाला. पृथ्वीवर त्याचा जन्म होणें ह्मणजे धर्मावतारच होणें असा मनूचा शेरा आहे.

अशा ह्या ब्राह्मणदेवानें कोणतीं कृत्यें व पराक्रम केले?

त्यांचीं अचाट कर्मे.

वैदिक देव अस्तास गेल्यावर त्यांच्या जागीं ब्राह्मणांनीं त्रिमूर्ति उदयास आणिली, आणि तिच्यापैकीं एकाला ध्यानस्थ बसवून विष्णु व शिव यांचे महाविस्तीर्ण, महासमर्थ आणि परस्परांचे दीर्घद्वेषी असे दोन पंथ उपस्थित केले. शैवमताचीं पुराणें झालीं व वैष्णवमताचीं पुराणें झालीं. तीं एकमेकांस पाखंडी ह्मणूं लागलीं, इतकेंच नाहीं, तर एकमेकांच्या देवांची निंदा करून त्यांस तुच्छ मानूं लागलीं. शिवानें दक्षयज्ञाचा नाश केल्यावर भृगूनें शिवव्रत व शिवभक्त यांस पाखांडी ठरविलें. ह्याच भृगुऋषीनें विष्णूला लाथ मारून त्याची परीक्षा केली. इतकेंच नाहीं तर ह्या उभयपंथांच्या लोकांनीं आपापले देवांस एकमेकांशीं युद्ध करायास देखील समरांगणीं आणिलें. शैव मतवाल्यांनीं विष्णूस कृष्णाच्या रूपानें शिवपार्वतीला प्रसन्न करून वर मागण्याकरितां सहस्र वर्षें तप करायास व शिवलिंगाच्या मूळाचा पत्ता लावायास हजारों वर्षें भ्रमण करायास व शिवापुढें गुडघे टेंकून त्याची प्रार्थना करायास लाविलें! तसेंच वैष्णवमतवाल्यांनीं शिवाला जो यज्ञभाग पूर्वीं मिळत नव्हता तो ब्रह्मदेवाच्या मध्यस्थीनें विष्णूकडून देवविला; शिवाच्या मुखांतून अनेक वेळ विष्णूची स्तुति वदविली; नारायणाच्या मिठीनें शिवाचा कंठ काळा करविला. याप्रमाणें ब्राह्मणांचा पराक्रम व ब्राह्मणांचें म-

हत्त्व सांगत गेलें असतां सर्व पुराणें व धर्मशास्त्रें एथें उतरून घ्यावीं लागतील. हें ब्रह्मबंड अप्रतिहत वाढत गेलें व त्याला कधीं कोणींच अटकाव केला नाहीं असें नाहीं; तर क्षत्रियांनीं प्रथम आपले हक्क चालविण्याचा प्रयत्न केला, व इतरांनींही वारंवार ही बंडाळी मोडण्याचा प्रयत्न केला; पण त्यांनीं शेवटीं हात टेंकले. विश्वामित्राचे उद्गार पुनः एक वेळ ऐका. ( भारतांतील ९ वा उतारा पाहा. पृ० १५६ ) "या क्षत्रियबळाला धिक्कार असो. ब्रह्मतेज यासच बल ह्मणावें, इतर सर्व बलें व्यर्थ आहेत." बौद्ध, जैन व लिंगाईत ह्या पंथांच्या स्थापकांनीं ब्राह्मणांच्या जुंवाखालून लोकांस काढण्याचे यत्न केले व ते कांहीं अंशीं सिद्धीसही गेले. पण त्यांनीं दुसऱ्या प्रकारचें जूं त्यांच्या मानेवर ठेविलें.

ब्राह्मणांनीं काय देशहित केलें ?

ब्राह्मणांच्या योगें हिंदुलोकांचें कांहींच हित झालें नाहीं असें आमचें ह्मणणें नाहीं. ह्या देशांत जी विद्या, जें वाङ्मय ( ग्रंथ ), जें ज्ञान, जी नीती व सुधारणूक आहे ती पुष्कळ अंशीं त्यांच्या परिश्रमाचें फल असून तिचे रक्षकही तेच होत; परंतु ह्या सर्वांवर ब्राह्मणत्वाचा शिक्का मारिलेला आहे. जसे सर्व ग्रह सूर्याच्या भोंवतीं फिरतात व त्याकडून आकर्षित आहेत, त्याप्रमाणें सर्व कांहीं, देव, मनुष्य, स्वर्ग, नरक, कर्म, धर्म, शास्त्र, रूढि, पाप, पुण्य हीं ब्राह्मणरूप सूर्यानें आकर्षित आहेत; तीं त्यास प्रदक्षिणा घालितात, व त्याच्याच तेजानें प्रकाशतात. ह्या ब्रह्ममहत्त्ववर्णनांत कांहीं अतिशयोक्ति नाहीं. ह्या पुस्तकांत **मनुस्मृति** प्रकरणांत जे उतारे घेतले

आहेत त्यांजवरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. एथें महाभारतांतून एक वचन घेतों:—

ब्राह्मणानां प्रसादाच्च देवाः स्वर्गनिवासिनः।
अशक्यं स्त्रष्टुमाकाशमचाल्यो हिमवान् गिरिः॥
अधार्या सेतुना गंगा दुर्जेया ब्राह्मणा भुवि।
न ब्राह्मणविरोधेन शक्या शास्तुं वसुन्धरा॥
ब्राह्मणा हि महात्मानो देवानामपि देवताः॥ ( अनुशासन पर्व. )

**अर्थ.** "ब्राह्मणांच्या प्रसादानें देव स्वर्गाचे ठायीं वास करितात. आकाश उत्पन्न करवत नाहीं, हिमालय पर्वत हालविणें अशक्य आहे, गंगा नदीला बांधतां येत नाहीं. ब्राह्मणांस पृथ्वीवर कोणाच्यानें जिंकवत नाहीं. ब्राह्मणांशीं विरोध करून कोणाच्यानेंही पृथ्वीवर राज्य करवत नाहीं. कारण महापराक्रमी ब्राह्मण देवांचेही देव आहेत."

ह्या ब्रह्मतेजाची झुळुक उपाध्यांचा वर्ग स्थापिला नव्हता अशा प्राचीन काळांत ह्मणजे वैदिक युगांत देखील कांहींशी दिसत होती, आणि ब्राह्मणादि ग्रन्थांच्या काळांत त्याचा उदय होऊन धर्मशास्त्राच्या काळीं तर तें मध्यान्हींच्या प्रखर सूर्याप्रमाणें हिंदुधर्मरूप नभोमंडलांत प्रकाशूं लागलें. ह्या ब्रह्मतेजापुढें इतर तेजें लोपलीं ( वसिष्ठ व विश्वामित्र यांची कथा ध्यानांत आणा ). जें कांहीं खरें देवज्ञान आर्यलोकांमध्यें होतें तें निस्तेज झालें. जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं अवघा ब्राह्मण भरला; त्यावांचून लोकांचें पाऊल पडेनासें झालें, व स्वर्गाचें द्वार उघडण्यास त्याशिवाय कोणीं राहिला नाहीं. त्याच्या उपाध्येपणाशिवाय सर्व धर्मकर्में निःसत्व झालीं.

ब्राह्मणासारिखा महापराक्रमी असा दुसरा एक देव उत्पन्न झाला, त्यानें देवांचें सामर्थ्य व मनुष्यास देवांची गरज ह्यांस मागें सारलें. ह्या देवाचें नांव **मंत्र.** तत्त्वज्ञानी लोक प्रथम वेदांतील मंत्रासच देव मानूं लागले; इंद्र ह्मणजे इंद्र हा शब्द अथवा इंद्राप्रीत्यर्थ स्तोत्र असा अर्थ करूं लागले. मंत्रांवांचून कोणतेंही धर्मकार्य चालेनासें झालें; जितकीं कर्में तितके मंत्र. जितकीं व्रतें, उपवास, देव, देवपूजा, तितके मंत्र. मंत्रानें मूर्त्तींत देव येऊं जाऊं लागले. मंत्रानें वांझ स्त्रिया पुत्रवंती होऊं लागल्या. मंत्रानें रोग बरे होऊं लागले, सर्पाचें विष व विंचवाचा दंश उतरूं लागला, प्रेतें उठूं लागलीं, शत्रु मरूं लागले, युद्धांत शस्त्रांचीं अस्त्रें झालीं. मंत्रानें ऋद्धि सिद्धि मनुष्याच्या घरीं पाणी भरूं लागल्या. भूतबाधा दूर होऊं लागली. लग्नांत तर सर्व कर्मांस पदोपदीं मंत्र. “ परगांवीं लग्न करून येतांना वधूला वाहनांत बसविण्याचा मंत्र, नावेंत बसविण्याचा व उतरण्याचा मंत्र. वधू रडूं लागली तर ह्मणण्याचा मंत्र.” जसा वायु सर्वत्र संचार करीत आहे तसा मंत्र हिंदुलोकांच्या सर्व संसारांत व शरीरांत व जीवात्म्यांत संचारला; इतकेंच नाहीं तर मनुष्य मेल्यावर त्याची जी रक्षा होते तींत देखील तो शिरला, त्याच्या अस्थिही त्यानें सोडल्या नाहींत. मंत्रच त्याला स्वर्गास नेऊन पोंचविणारा व तेथें त्याला श्राद्धाचें भोजन घालणारा झाला. पण हा मंत्रदेव ब्राह्मण देवाच्या स्वाधीन राहिला. द्विजातीशिवाय इतरांस मंत्राचा अधिकार नाहीं. शूद्रादिकांनीं

दुसरा एक देव.

जादू, टाणेटोणे, छाछूं करावें; विंचु, सर्प उतरण्याचे मंत्र फुंकावे; पण वेदमंत्रांचे अधिकारी ब्राह्मण! असे हे सिद्ध-साधक परस्परांस आधारभूत होऊन राहिले.

षट्दर्शनें.

ब्राह्मण लोकांत जे ज्ञानी पुरुष झाले त्यांनीं तत्त्वविचार काढले. याचेंही मूळ इतर विचारांच्या मूळाप्रमाणें उपनिषदादि वैदिक ग्रंथांत आहे. यांतील विचार जरी गहन व गंभीर आहेत तरी ते मनुष्याला भ्रमांत पाडणारे आहेत. याविषयीं आह्मीं स्वतां कांहीं लिहिण्यापेक्षां ब्राह्मणाच्या घरांतील एकाची साक्ष देतों:—

शिव पार्वतीला सांगतो: ( पद्मपुराण ).

शृणु देवि प्रवक्ष्यामि तामसानि यथाक्रमम् ॥
येषां श्रवणमात्रेण पातित्यं ज्ञानिनामपि ॥
प्रथमं हि मयैवोक्तं शैवं पाशुपतादिकम् ॥
मच्छक्त्या वेशितैर्विप्रैः संप्रोक्तानि ततः परम् ॥
कणादेन तु संप्रोक्तं शास्त्रं वैशेषिकं महत् ॥
गौतमेन तथा न्यायं सांख्यं तु कपिलेन वै ॥
द्विजन्माना जैमिनिना पूर्वं वेदमयार्थितः ॥
निरीश्वरेण वादेन कृतं शास्त्रं महत्तरम् ॥
धिषणेन तथा प्रोक्तं चार्वाकमतिगर्हितम् ॥
दैत्यानां नाशनार्थाय विष्णुना बुद्धरूपिणा ॥
बौद्धशास्त्रमसत्प्रोक्तं नग्ननीलपटादिकम् ॥
मायावादमसच्छास्त्रं प्रच्छन्नं बौद्धमेव च ॥
मयैव कथितं देवि कलौ ब्राह्मणरूपिणा ॥
अपार्थं श्रुतिवाक्यानां दर्शयल्लोकगर्हितम् ॥
कर्मस्वरूपत्याज्यत्वमत्र च प्रतिपाद्यते ॥

सर्वकर्मपरिभ्रंशान्नैष्कर्म्यं तत्र चोच्यते ॥
परात्मजीवयोरैक्यं मयात्र प्रतिपाद्यते ॥
ब्रह्मणोऽस्य परं रूपं निर्गुणं दर्शितं मया ॥
सर्वस्य जगतोऽप्यस्य नाशनार्थं कलौ युगे ॥
वेदार्थवन्महाशास्त्रं मायावादमवैदिकम् ॥
मयैव कथितं देवि जगतां नाशकारणात् ॥

ह्या उताऱ्याचा सारांश हा आहे कीं, जगाचा नाश करण्यासाठीं शिवानें हीं षट्दर्शनांतील **अंधकाराचीं मतें** स्वतां शिकविलीं, आणि जशीं बौद्धधर्माचीं मतें वेदमार्ग-नाशक आहेत तशींच हीं आहेत.

भगवद्गीता व अनुगीता.

यांविषयीं आह्मीं आपला अभिप्राय दर्शविलाच आहे (पृ० ९८ पाहा) तरी एथें अन्य स्थळींचा पूर्वींचा स्वकीय लेखाचा एक उतारा घेतों, तो अठरा वर्षांमागें "हिंदुधर्मविवेचक" नामक एका मासिक पुस्तकास उत्तररूपानें लिहिला होता:—

ज्या काळीं ही अनुगीता भारतांत घुसडून दिली, त्या काळीं तिच्या कर्त्यास व लोकांत कृष्णाचें माहात्म्य विशेष नव्हतें असें दिसतें. यांत कांहीं नवल नाहीं. इंद्रादि वैदिक देव, वेदांतींचें ब्रह्म, व पुराणांतील ब्रह्मा, विष्णु, इ० त्रि-मूर्ति हीं सर्व सांगड बाहुल्यांप्रमाणें असून त्यांचे सूत्रधार ब्राह्मण होत, ते जसे त्यांस नाचवितात तशीं तीं नाचतात. अर्जुनाला कृष्णानें गीतेंत मोक्षप्राप्तीकरितां कर्मत्याग करायास सांगितलें. परंतु धर्मराजाला भीष्माचार्यानें कर्मेंच करायाला सांगितलें,— "कर्में करूनच तूं निष्पाप होशील. यज्ञरूप क्रिया व दानें

अवश्य करावीं, कारण हीं कर्मैं इहलोकीं देखील पावनकारी होत." अनुशा. प० अ० ५७. जर कृष्णाला सर्व पांडवांच्या मुक्तीची काळजी होती, तर त्यानें त्या सर्वांस जवळ घेऊन भगवद्गीता अथवा अनुगीता कां कथिली नाहीं ? बिचारा धर्मराज तर भीष्म, बृहस्पती इत्यादिकांस प्रश्न करकरून थकत असे. "हे बृहस्पते, अहिंसा, वैदिक कर्म, ध्यान, इंद्रियदमन, तप व गुरुशुश्रषा यांत श्रेयस्कर कोणतें ? ( अनु. प. अ. ११३. ) "हे भीष्मा, चांगला स्वभाव, आचार, ज्ञान, निष्ठारूप धर्म यांत कोणतें केल्यानें पुरुष ब्रह्मपद पावतो हें सांगा." ( मोक्षधर्म पर्व अ. १०९ ) याप्रमाणें त्याचे शेंकडो प्रश्न आहेत, त्या सर्वांचें समाधान कृष्णानें " मामेकं शरणं व्रज " असें सांगून कां केलें नाहीं ? अथवा भीष्मादिकांनीं त्याला "कृष्ण परमात्म्यास" शरण जाण्यास कां सांगितलें नाहीं ? असें करण्याबद्दल त्याला अनेक यज्ञयागादि कर्मैं व दानें करायास सांगितलीं, व जो ज्ञानोपदेश ह्मणून केला, त्याला आधार प्राचीन मुनींचा दाखविला.

तंत्रें. तंत्रशास्त्राविषयीं काय बोलावें ? हिंदुधर्मदृष्ट्या पाहिलें असतां जशीं इतर शास्त्रें ब्रह्मा, विष्णु, शिव इ० पासून आहेत तसेच तंत्रकारही आपल्या शास्त्रास शिवाचें व शक्तीचें प्रमाण दाखवितात. हें प्रमाण हिंदूंच्या इतर ग्रंथांच्या ईश्वरप्रणीतत्त्वाच्या प्रमाणाच्याच योग्यतेचें आहे. शिव शक्ति यांचें माहात्म्य इतर हिंदुग्रंथांत काय थोडें वर्णिलें आहे ? आणि कोणत्याहि

संस्कृत ग्रंथांत शक्त्युपासनेचा निषेध केला नाहीं, असें एक हिंदु ग्रंथकारच लिहितो. असो. मत्स्यपुराणांत देखील जारणमारणाचे प्रयोग सांगितले आहेत. त्यांत इतकेंच विशेष सांगितलें आहे कीं, ते "परलोकीं सुखप्रद नाहींत." (म. पु. अ. ९२. १९३). शक्तीची व शाक्तांची खबर तुकारामांनीं मात्र चांगली घेतली आहे. आणि त्याची एकंदर वैष्णव भक्तमंडळी ह्या मळीण मताच्या विरुद्धच होती. इतकेंच नाहीं, तर तंत्रशास्त्रांत देखील एका ठिकाणीं ह्या मताचा शिवानें ब्राह्मणास मात्र निषेध केला आहे:—

वामागमो मदुक्तोयं सर्व शूद्र परः प्रिये ।
ब्राह्मणो मदिरा दानाद्ब्राह्मण्येन विपुज्यते ॥
न कर्त्तव्यं न कर्त्तव्यं कदाचन ।
इदं तु साहसं देवी न कर्त्तव्यं कदाचन ॥ (दक्षिणाचार तंत्रशजं.)

**अर्थ.** शिव ह्मणतो—वाममार्ग जरी मींच लावून दिला, तरी तो शूद्रांकरितां मात्र होता, ब्राह्मणानें मद्यदान घेतलें असतां तो ब्राह्मणत्वास मुकतो. यास्तव असें कधीं करूं नये. हे देवी, हें साहस आहे, तें कधीं करूं नये.

यावषयीं आह्मीं मागें लिहिलेंच आहे. आमचे आधुनिक

बौद्धावतार.

विद्वान व सुधारलेले यांपैकीं कित्येक जण बुधाला भुलून त्याचे पवाडे गात सुटले आहेत, परंतु ज्या तुकारामाला ते अत्यंत पूज्य मानितात, व आपण त्याचे अनुयायी आहों अशी शेखी मिरवितात त्याला बौद्धांचा कंटाळा आला होता, व ह्या अवताराच्या काळांत आपण जन्मास आलों हें आपलें मोठें दुर्दैव होय असें त्यास वाटत असे:—

बौद्ध अवतार माझीया अदृष्टा। मौन्य मुखें निष्ठा धरियेली ॥
आलें कलियुग माझिया संचिता। डोळां हांकलितां न पडेसी ॥
म्यांच तुझें काय केलें नारायणा। कां नये करुणा तुका ह्मणे ॥

बौद्ध धर्माचें शंकराचार्यानें खंडण केलें, व हिंदु राजाकडून त्याचा छळ होऊन तो तिबेट, चीन, लंका इ० देशांत परागंदा झाला. जैनधर्म अद्याप गुजराथ, मारवाड, महाराष्ट्र इ० देशांत आहे, पण त्याची वृद्धि होत नाहीं. आलीकडील कित्येक सुधारलेले हिंदु विद्वान ह्या दोन्ही धर्मांची मोठी तारीफ करितात. ते त्यांच्या ग्रन्थांतून वेंचे आपल्या लेखांत मोठ्या आदरानें घेतात. ते त्यांच्या नीतीस भुलले आहेत. पण हें भुलणें एखाद्या वेश्येच्या रूपास भुलण्यासारिखें आहे. वास्तविक पाहतां हे दोन्ही धर्म **निवळ नास्तिक** आहेत. त्यांस धर्म ही संज्ञा शोभते तर व्यभिचारिणीस पतिव्रता कां ह्मणूं नये? पण हा सर्व प्रताप ब्राह्मण धर्माचा होय. ब्राह्मण व क्षत्रिय ह्या वर्गांतील कित्येक विचारी पुरुषांनीं आपला धर्म निकृष्टावस्थेस पोंचलेला पाहून त्याची सुधारणा करण्यासाठीं ह्मणून जे प्रयत्न स्वबुद्धीवर अवलंबून केले त्यांचें हें फळ. त्यांनीं मानवी स्वभावाचें वाटोळें व मनुष्य जिण्याचें मातेरें करून सोडलें. 'जर हे पुरुष नम्रतेनें ईश्वराची प्रार्थना करून त्यापासून सुबुद्धि मागते तर हा दुष्परिणाम घडला नसता. 'परमेश्वर ज्ञान देतो त्याच्या मुखांतून विद्या व विवेक येतात.'— जर कोणी ज्ञानाविषयीं उणा आहे, तर जो देव सर्वांस उदारपणें देतो व दोष लावीत नाहीं, त्यापाशीं त्यानें मागावें ह्मणजे त्याला मिळेल.'—'तूं आपल्या सर्व हृदयानें भाव ठेव, आपल्या

विवेकाचा भरवसा धरूं नको.'—हीं ईश्वरी शास्त्रवचनें सर्व धर्मसुधारकांनीं मनांत बाळगून त्याप्रमाणें वागावें.

सारांश.

वैदिक ऋषींनीं यज्ञ हाच सत्यधर्म आहे असें समजून तो चालविला, त्यांच्या मागून ब्राह्मण ग्रंथकारांनीं यज्ञविधीची पद्धत लावण्याच्या व अर्थ करण्याच्या निमित्तानें कर्मकांड माजविलें; उपनिषत्कारांस कर्मकांड पसंत पडलें नाहीं, ह्मणून त्यांनीं ब्रह्मविद्या काढली, ती षट्दर्शन-कारांनीं ब्रह्म, जीव, माया व अज्ञान यांच्या अढींत घालून इतकी परिपक्क केली कीं तिचा रस होऊन ती गळूं लागली, आणि जरी कित्येक पंडितांनीं तो रस प्राशन केला व साधारण लोक त्याच्या वासाला मात्र भुलले, तरी पंडित व प्राकृतजन ह्या उभयतांची त्याकडून तृप्ति झाली नाहीं. पंडितजन त्याच्या गुंगींत तल्लीन झाले व प्राकृतजन कर्ममार्गाच्या खटपटीस लागले असतां अनेक जन्मांच्या फेऱ्यांत पडण्याचे भयानें व्याकुळ झाले आहेत.

अशा प्रकारचा ब्रह्मघोटाळा कित्येक सुज्ञ व विचारी हिंदु साधुसंतांच्या ध्यानीं येऊन चुकला होता. रामदासांनीं आपल्या दासबोध नामक ग्रंथीं त्याचें येणेंप्रमाणें यथार्थ व खेदयुक्त वर्णन केलें आहे:—

देव झाले उदंड। देवांचें मांडिलें बंड। भूतां देवतांचें थोतांड। एकचि जाहलें॥ **मुख्य देव तो कळेना**। कशास कांहींच मिळेना। एकास एक वळेना। अनावर॥ ऐसा नासला विचार। कोण पाहतो सारासार। कैंचा लहान कैंचा थोर। कळेचिना॥ **शास्त्रांचा बाजार भरला। देवांचा गलबला झाला।** लोक कामनेच्या व्रताला। झोंबोन पडती॥ ऐसें अवघें नासलें।

सत्यासत्य हारपलें । अवघें अनायक एक झालें । चहूंकडे ॥ **मता मतांचा गलबला** । कोणी पुसेना कोणाला । जो जें मतीं सांपडला । तयासि तेंचि थोर ॥ **असत्याचा साभिमान । तेणें पाविजे पतन । ह्मणोनियां ज्ञाते जन । सत्य शोधिती ॥**

**( दासबोध ११. २. २०–२६ )**

**ख्रिस्ती धर्माचें स्वरूप.**

आतां कोणी ह्मणतील कीं, जर आमच्या वाडवडिलांस वैदिक काळापासून सत्य सांपडलें नाहीं तर यापुढें काय सांपडणार, त्यापेक्षां जी वडिलांची रूढि चालत आली आहे तिजप्रमाणें चालावें ह्मणजे झालें. हें ह्मणणें निराधार व मनुष्यबुद्धीला लांच्छनदायक आहे. जगांत सत्य नाहीं ह्मणणें हें आकाशांत सूर्य नाहीं असें ह्मणण्याप्रमाणें आहे. जसा मनुष्याच्या प्रपंचासाठीं देवानें भौतिक सूर्य दिला आहे तसा परमार्थासाठीं त्यानें दैविक सूर्यही दिला आहे.

ज्याला ख्रिस्ती लोक बैबल किंवा पवित्रशास्त्र ह्मणतात तें जो कोणी चित्त लावून व परमेश्वराचें सहाय मागून शोधून पाहील त्याला खचीत समजेल कीं तेंच केवळ खरें ईश्वरदत्त शास्त्र आहे.

ह्या शास्त्राविषयीं ह्या पुस्तकांत विस्तारानें सांगण्याचा आमचा उद्देश नाहीं, तर केवळ त्याच्या सत्यतेच्या मुख्य प्रमाणांचें व सिद्धांतांचें दिग्दर्शन मात्र करितों.

**ख्रिस्ती शास्त्र.**

१. ख्रिस्ती शास्त्राच्या सत्यतेचीं मुख्य प्रमाणें हीं आहेत. त्यांच्या बहुतेक लेखकांनीं चमत्कार केले, त्यांत जीं भविष्यें सांगितलीं आहेत त्यांप्रमाणें घडून आलें. त्यांत ईश्वर

व मनुष्य यांविषयीं जें आरंभापासून शेवटपर्यंत सांगितलें आहे तें सर्व सत्य असून त्यांत कांहीं विपर्यास नाहीं. जो उपदेश त्यांत आहे तो दिव्य व शुद्ध आहे, आणि जो तारणारा त्यांत प्रगट केला आहे तो दैवी, अप्रतिम, निष्कलंक, निष्पाप, सर्वसमर्थ, परमप्रीतियुक्त, नित्यजीवनदायक, जगत्प्रकाशक असा वर्णिला आहे. हें शास्त्र सर्वांकरितां आहे. सर्वांनीं तें वाचावें व शिकावें अशी त्यांत आज्ञा आहे.

२. ह्या शास्त्राचे मुख्य धर्मसिद्धांत असे आहेत कीं, खरा व जीवंत असा एकच परमेश्वर आहे. तो निराकार, आत्मरूपी असून गुणसंपन्न आहे. तो पूर्ण पवित्र, पूर्ण न्यायी, व परम दयाळु असा आहे. त्याचें सामर्थ्य अपार, त्याचें ज्ञान अगाध, व त्याची सत्ता अमर्याद आहे. देवपणामध्यें बाप, पुत्र आणि पवित्र आत्मा अशा तीन व्यक्ति आहेत. हे तीन मिळून एकच देव आहे, अनेक देव नाहींत. हा त्र्येक परमेश्वर हिंदूंच्या ब्रह्मप्रमाणें निर्गुण निष्क्रिय नाहीं, आणि त्रिमूर्तीप्रमाणें उत्पन्न झालेला व लय पावणारा नाहीं, अथवा परस्परविरुद्ध गुणांचा असाही नाहीं.

३. सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं असें सांगितलें आहे कीं, ती परमेश्वरानें आपल्या इच्छामात्रेंकरून आपल्या सामर्थ्यानें शून्यापासून केली, ती त्यानें आपल्या तत्त्वांतून काढली किंवा ती करण्यासाठीं त्याला तप करावें लागलें असें नाहीं. आणि जें कांहीं त्यानें केलें तें चांगलें होतें. त्याला ब्रह्मदेवाप्रमाणें तें बदलावें लागलें नाहीं, अथवा दुसऱ्यास करावयास सांगावें लागलें नाहीं.

४. मनुष्याविषयीं ह्या शास्त्राचा असा उपदेश आहे कीं, सृष्टीच्या आरंभीं देवानें मनुष्य पवित्र, ज्ञानी व न्यायी व अमर असा उत्पन्न केला, परंतु तो स्वेच्छेनें पापांत पडला, व त्याची सर्व संतती पापी झाली. पापामुळें तो भ्रष्ट, मूढ, दुःखी, मर्त्य व अक्षय नरकदंडांस पात्र झाला आहे; त्याला स्वतां आपलें तारण करण्याची शक्ति नाहीं. तप, योग, ज्ञान, ध्यान, भक्ति इत्यादिकांकडून त्याला मुक्ति प्राप्त होत नाहीं; स्नान, संध्या इ० कर्मांनीं तो निष्पाप होत नाहीं. दानानें पापदंड चुकत नाहीं. कोणीही मनुष्य पुण्यवान् नाहीं, व कोणाच्यानें पुण्य करवत नाहीं. सर्व मनुष्यें जन्मस्वभावानें भ्रष्ट व स्वकर्मांनीं पापलिप्त असून ईश्वराच्या यथार्थ न्यायास व अत्यंत तीव्र क्रोधास व अक्षय दंडास पात्र झालीं आहेत.

५. मनुष्याच्या तारणाचा केवळ एकच उपाय असून तो परमेश्वरानेंच परमकृपेनें लावून दिला आहे. तो हा कीं, त्यानें आपला एकुलता पुत्र जगाच्या उद्धाराकरितां पाठविला. हा तारणारा येण्याचें वचन आमचे मूळपूर्वजांस तीं पापांत पडलीं तेव्हांच देवानें दिलें, व तो येईपर्यंत त्याचें प्रायश्चित्तात्मक मरणदर्शक असा यज्ञविधि स्थापिला. हा विधि सार्वत्रिक असून ह्याचा खरा अर्थ मनुष्यजातीला कांहीं काळ चांगला अवगत होता, परंतु पुढें एक राष्ट्र खेरीजकरून सर्व लोक तो अर्थ विसरले. वैदिक यज्ञांत कोठें कोठें ह्या अर्थाचें आर्य लोकांस स्मरण असल्याचें दिसून येतें.

६. ह्या तारणाविषयीं तो येण्यापूर्वीं अनेक भविष्यें सांगितलीं होतीं, तीं ख्रिस्ती शास्त्राच्या पूर्वभागांत ( जुन्या करारांत ) हजारों वर्षें अगोदर लिहून ठेविलीं होतीं. त्या

प्रमाणें तीं तो आल्यावर प्रचीतीस आलीं. त्यांत मुख्य भविष्य असें होतें कीं तो मनुष्यांच्या पापांकरितां प्रायश्चित्त करील, ह्मणजे पाप्यांचा बदला होऊन मरण पावेल. याविषयीं एथें केवळ एकच शास्त्रप्रमाण सांगतों, तें यशाया भविष्यवाद्याच्या ग्रंथांत ५३ व्या अध्यायीं आहे. तें सर्व सत्यशोधकांनीं अवश्य वाचून पाहावें.

७. पुढें काळाची पूर्णता झाल्यावर देवाचा पुत्र येशू ख्रिस्त मनुष्यावतार धारण करून जगांत आला. तो हिंदु अवतारांप्रमाणें ब्रह्मणाच्या शापामुळें किंवा दुष्टांस शासन करण्यासाठीं आला नाहीं, तर पाप्यांचा दंड स्वतां सोसून त्यांस तारण देण्याकरितां आला, त्यानें जगांत राहून ऐषआराम भोगिले नाहींत, किंवा लढाया करून ऐहिक राज्याची स्थापना केली नाहीं. तर तो सर्वत्र दयेचीं कर्मे व देवज्ञानाचा उपदेश करीत फिरला. त्यानें बहुत चमत्कार हजारों लोकांदेखतां केले. आंधळ्यांस दृष्टि दिली, रोगग्रस्तांस बरें केलें, मृतांस उठविलें. पवित्रता, न्यायत्व, क्षमा, दया, शांति, सहनशीलता, निर्लोभता, पाप्यांवर करुणा, पतितांचा कळवळा हे गुण त्याच्या ठायीं परिपूर्ण व अनुपम वसत होते. त्याचें आचरण अत्यंत शुद्ध असून तें त्याच्या उपदेशांस अनुसरून होतें. अति अज्ञान, अधम व लोकांनीं दूर टाकलेले अशा मनुष्यांस त्यानें जवळ बोलाविलें, त्यांस ईश्वरप्रीतीच्या गोष्टी शिकविल्या व आपण जगाचा तारणारा आहें अशी त्यांची खातरी केली. जे त्याला शरण आले त्यांस त्यानें तारिलें. दांभिक, लोभी व गर्विष्ठ धर्माधिकाऱ्यांचा त्यानें खडसून निषेध केला. त्याचा पवित्र उपदेश व शुद्ध आचरण दुष्ट व ढोंगी लोकांस सहन झालें नाहीं. त्यांनीं त्याचा द्वेष केला आणि त्याला

द्रोहबुद्धीनें व पापी हातांनीं मारिलें. तथापि हें त्याचें मरण अनादि कालापासून नेमलेलें होतें. तो पाप्यांकरितां मरायासच आला होता. त्याला देवानें मरणाच्या बंधनापासून सोडविलें. तो तिसऱ्या दिवशीं मेलेल्यांमधून उठला, आणि चाळीस दिवस पृथ्वीवर राहून आपल्या शिष्यांस आपल्या धर्माच्या ह्मणजे शुभवर्त्तमानाच्या प्रसाराविषयीं आज्ञा करून त्यांच्या समक्ष सदेह स्वर्गास गेला; तेथें तो कालाच्या समाप्तीपर्यंत राहून पुनः पृथ्वीवर सर्व मनुष्यांचा न्याय करायास मोठ्या गौरवानें येणार आहे. त्या काळीं जगाच्या आरंभापासून मरण पावलेलीं सर्व मनुष्यें त्याची वाणी ऐकून उठतील, आणि त्यांच्या कर्मांप्रमाणें न्याय होईल. तेव्हां न्यायीजन सर्वकालिक सुख भोगण्यास देवापाशीं राहतील, व दुष्ट मनुष्यें अनंतकालिक नरकांत भूतांसमागमें यातना भोगतील: ज्यांनीं ह्या तारणाराचें शुभवर्त्तमान कधींच ऐकिलें नसून पाप केलें त्यांचा न्याय त्यांच्या अंतःकरणांवर लिहिलेला जो ईश्वरी शास्त्रनेम त्याप्रमाणें होईल, आणि ज्यांनीं देवाच्या तारक कृपेचा निरोप ह्मणजे शुभवर्त्तमान ऐकून त्याचा धिक्कार केला त्यांचा न्याय त्या शुभवर्त्तमानानुसार होईल. ( रोम. २ : १४–१६ पहा. ) त्यानंतर पृथ्वीवर पुनः अधर्म वाढणार नाहीं, तर परमेश्वराच्या ज्ञानानें सर्व जग भरेल, आणि केवळ त्याचीच भक्ति सर्व करितील. ही अत्यंत पवित्र, गौरवयुक्त व सुखदायक स्थिति, हें खरें 'सत्ययुग' चिरकाल चालेल.

८. ख्रिस्ताच्या मरणाचा आशय ख्रिस्ती शास्त्रांत अनेक स्थळीं असा दर्शविला आहे कीं, तें मनुष्याच्या उद्धाराकरितां झालें. ह्याविषयींचीं दोन चार शास्त्रवचनें येथें घेतों:—

"ख्रिस्तानें एकदांच पाप्यांकरितां ह्मणजे न्यायीनें अन्यायी यांकरितां सोसिलें; त्यानें आह्मांस देवाजवळ पोंचवावें ह्मणून." ( १. पे. ३. १८. )

"ख्रिस्तानें आमच्या ठिकाणीं शापपात्र होऊन आह्मांस नेमशास्त्राच्या शापापासून खंडून घेतलें आहे." ( गल. ३. १३. )

"काळाची पूर्णता झाली तेव्हां देवानें आपला पुत्र, स्त्रीपासून जन्मलेला नेमशास्त्राच्या आधीन झालेला असा पाठविला, यासाठीं कीं, जे नेमशास्त्राच्या आधीन त्यांस त्यानें सोडवावें, असें कीं, आह्मी दत्तपुत्रपण पावावें." ( गल. ४. ४, ५. )

ख्रिस्त स्वतां ह्मणतोः—"मी उत्तम मेषपाळ आहें, उत्तम मेषपाळ मेंढरांकरितां आपला जीव देतो." "मेंढरांसाठीं मी आपला जीव देतों." ( यो. १०. ११, १५. )

९. पाप्याचें पूर्ण तारण होण्याकरितां त्याच्या पापांची क्षमा झाली पाहिजे. इतकेंच नाहीं, तर त्याचें अंतःकरण शुद्ध होऊन त्याच्या ठायीं पापाचा द्वेष व पवित्रतेची आवड उत्पन्न झाली पाहिजे. असें झालें ह्मणजे ईश्वराची प्रीतियुक्त सेवा व मनुष्याचें अस्वार्थ बुद्धीनें कल्याण करण्याची इच्छा व शक्ति मिळते. ख्रिस्ती शास्त्र असें सांगतें कीं, मनुष्याचे ठायीं हें कार्य देवाचा पवित्र आत्मा करितो. त्याच्या शक्तीनें मनुष्य पुनर्जन्म पावतो; ह्मणजे त्याला नवीन अंतःकरण मिळतें, व तो पापाच्या सत्तेंतून उत्तरोत्तर सुटून पवित्राचरणास लागतो. प्रभु येशू ख्रिस्तानें स्वतां याविषयीं असें सांगितलें आहे कीं, "आत्म्यापासून जन्मल्यावांचून

कोणाच्यानें देवाच्या राज्यांत प्रवेश करवत नाहीं." ( यो. ३. ५. )

१०. हा धर्म सर्व मनुष्यजातीस सांगावा व जे विश्वास धरतील त्यांस बाप्तिस्मा देऊन मंडळींत घ्यावें अशी येशू ख्रिस्तानें आपल्या शिष्यांस आज्ञा दिली आहे. ती अशी कीं,

**"तुह्मी जाऊन सर्व राष्ट्रांतील लोकांस शिष्य करा. त्यांस पित्याच्या व पुत्राच्या व पवित्र आत्म्याच्या नामानें बाप्तिस्मा द्या. जो विश्वास धरितो व बाप्तिस्मा घेतो त्याचें तारण होईल, जें सर्व कांहीं मीं तुह्मांस आज्ञापिलें तें पाळायास त्यांस शिकवा, आणि पाहा, युगाच्या समाप्तीपर्यंत मी सदोदित तुह्मांबरोबर आहें."**

प्रिय देशबांधव हो, याप्रमाणें ख्रिस्ती धर्माचीं मूलतत्वें अगदीं थोडक्यांत तुमच्यापुढें ठेविलीं आहेत. त्यांचा तुह्मीं अवश्य विचार करावा. ह्या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत ह्या धर्माचें आणखी कांहीं अंग दर्शविलें आहे, व ख्रिस्त सद्गुरूचें वर्णन केलें आहे. तुह्मीं विशेषेंकरून ख्रिस्ती शास्त्र वाचून पाहावें, त्याचा अर्थ समजावा ह्मणून ईश्वराची प्रार्थना करावी ह्मणजे तो तुह्मांला प्रकाश देईल.

"जो बुद्धिमान् आहे तो या गोष्टीकडे लक्ष पुरवील. तो परमेश्वराच्या दयाकर्माचें ध्यान करील" ( गीत. १०७: ४३ ).

**ख्रिस्ती शास्त्रांतील कित्येक वचनांचे संस्कृत भाषांतरावरून उतारे.**

ह्या पुस्तकांत हिंदुधर्मग्रंथांतून पुष्कळ मूळ संस्कृत उतारे घेतले आहेत, त्याप्रमाणें ख्रिस्ती शास्त्रांतील मूळ भाषेंतील उतारे घेतां येत नाहींत, कारण तें शास्त्र इब्री व

ग्रीक या मूळभाषांत लिहिलेलें आहे, व त्या भाषा ह्या ग्रंथाच्या बहुतेक वाचकांस अवगत नसतील. तथापि खिस्ती शास्त्राचें सुमारें ३५० भाषांत भाषांतर झालें आहे, त्यांत संस्कृत भाषाही आली आहे. यास्तव पुढील शास्त्रवचनें त्या भाषांतरावरून उतरून घेतलीं आहेत.

शास्त्रं सिद्धं परेशस्य मनसः परिवर्त्तकं ।
साक्ष्यं सत्यं परेशस्य ज्ञानश्चाल्पमेधसे ॥
विधयः परमेशस्य न्यायाश्चित्तस्य नन्दनाः ।
आज्ञा शुद्धा परेशस्य नेत्रयोर्दीप्तिवर्द्धिनी ॥
परमेशाच्च या भीतिः साशुचिर्नित्यवर्त्तिनी ।
राज्यनीतिः परेशस्य सत्या साध्वी च सर्वथा ॥
वाञ्छनीया सुवर्णात् सा कनकात् प्रचुरादपि ।
सुस्वाद्वी पुष्पनिर्यासात् मधुवासस्य वारसात् ॥
अयं त्वदीयदासोऽपि भवत्येतैः सुशिक्षितः ।
एतेषां पालनादेव लाभश्चोत्पदयते महान् ॥

(**गीतसंहिता १९. ७—११**)

सत्यमार्गो मयाग्राहि त्वन्नीतिर्लक्ष्यते मया ॥
ज्ञानं देहि तदा शास्त्रं पालयिष्याम्यहं तव ।
तत् समुपाचरिष्यामि सर्वान्तःकरणेन च ॥
प्राचीनेभ्योऽप्यहं विज्ञस्त्वन्नियोगानुपालनात् ॥
दीपो मदीयपादस्य मार्गे ज्योतिश्चते वचः ॥

(**गीतसंहिता. ११९. ३०. ३४, १००, १०५**)

ईश्वर इत्थं जगददयत यत् स्वमद्वितीयं तनयं प्राददात यतो यः-कश्चित् तस्मित् विश्व सिष्यति । सोऽविनाशः सन् अवन्तायुः प्राप्स्यति (योहन ३. १६).

खिस्ती लोक ईश्वरभजनाच्या वेळीं जीं गीतें गातात त्यांपैकीं मराठी गीताच्या पुस्तकांतून हीं पुढील दोन गीतें घेतलीं आहेतः—

## ईश्वराचें शास्त्र.

( इंग्रेजी चाल. )

८, ८, ८ अक्षरी.

१ सच्छास्त्र मला आवडे,
लक्ष विशेष त्याकडे,
अंधकाराच्या समयीं,
हे देवा, तुझें बोलणें,
तुझीं उत्कृष्ट वचनें,
हीं देती शांति हृदयीं.

२ शास्त्राचें करितांना ध्यान,
मनांत बिंबे पूर्ण ज्ञान,
तें दीपावाणी तेजोमय,
मधेपेक्षांही गोड तें,
सुवर्ण तुच्छ वाटतें,
कळेना मोल अतिशय.

३ उत्कृष्ट शास्त्रें सत्वरी,
सुबोध ठसे अंतरीं,
दंडाचें भय सुचतें;
ख्रिस्ताचें शुभवर्त्तमान
येणेंचि तारणाचें ज्ञान,
दंडाचें भय टळतें.

४ आंतील पापें सगळीं,
कोणाला कधीं कळलीं ?
हे देवा, माझी क्षमा कर;
ऐकावी माझी प्रार्थना,

दे मला भक्ति भावना,
सद्गुण माझ्या मनीं भर.

( ईश्वरभजनाचीं गीतें. गीत, २०० )

---

## शास्त्राचें अगत्य.

( मराठी पुस्तक. )

### अभंग.

१ शास्त्ररूप दिवा, देवानें दिधला;
वाट दावायाला, पाप्यालागीं.

२ शास्त्राविण पाप्यां, कैसी दिसे वाट;
अंधकार दाट, जगदरण्यीं.

३ निःशास्त्रीवादी हे सांगती कौतुक;
सदसद्विवेक, हेंचि शास्त्र.

४ तुह्मां आह्मां एक सदसद्विवेक;
मग कां अनेक, भिन्न मतें ?

५ सदसद्विवेका, वाट दावायास;
शास्त्राचा प्रकाश, पाहिजेचि.

६ होउनियां नम्र, सोडा ऐसें मत;
पाहा कीं प्रचीत सच्छास्त्राची.

(ई० भ० गी. गी. २०९.)

परिशिष्ट, (पृ० ५५).

## (७) रुद्र हाच एक देव आहे.

श्वे० उ० अ. ३:२ कां तर एकच रुद्र आपल्या अधिकारशक्तीनें ह्या भुवनांवर अधिकार चालवितो. तो सर्व मनुष्यांच्या अंतरीं वास करितो, त्यानें सर्व भुवनें उत्पन्न केलीं, तो त्यांचा पालनकर्त्ता होत्साता अंतकाळीं क्षोभायमान होतो. त्यांचा लय करितो. ३ तो सर्वांचा नेत्र आहे, सर्वांचें मुख आहे, सर्वांचा भुज आहे, सर्वांचा पायही आहे. तो मनुष्याला भुज जोडतो, पक्ष्याला पंख जोडतो. तो एकच देव स्वर्ग व पृथ्वी उत्पन्न करिते समयीं (असें करितो).

## (८) देव किती आहेत?

(१) विदग्धानें विचारिलें, हे याज्ञवल्क्य, देव किती आहेत? तो ह्मणाला, हें वैश्वदेवशास्त्राच्या निवितावरून समजतें, (ह्मणजे) तीन तीनशें, आणि तीन तीनहजार (३,३०६.)

तो ह्मणाला—ॐ! "हे या० देव किती आहेत?" '३३'.

तो ह्मणाला—"ॐ! देव किती आहेत?" "सहा."

तो ह्मणाला—"ॐ! देव किती आहेत?" "तीन."

तो ह्मणाला—"ॐ! देव किती आहेत?" "दोन."

तो ह्मणाला—"ॐ! देव किती आहेत?" "अध्यर्ध."

तो ह्मणाला—"ॐ! देव किती आहेत?" "एक."

तो ह्मणाला—"ॐ! तीन आणि तीनशें, आणि तीन आणि तीन हजार हे कोण! (२) तो ह्म० हें त्यांच्या गौरवार्थ आहे; (खरोखर तेहत्तीस देव आहेत). "हे तेहतीस कोण?" "आठ वसू, अकरा रुद्र, आणि बारा आदित्य. इंद्र व प्रजापती मिळून तेहतीस."

# सूचीपत्र.

# AUTHORITIES CONSULTED.

## ग्रंथसहाय.

ह्या ग्रंथाच्या (पहिल्या व दुसऱ्या भागास) ज्या पुस्तकांचे सहाय घेतलें आहे त्यांची ही याद ज्यांस हिंदुधर्माचें विशेष ज्ञान प्राप्त करून घेण्याची इच्छा असेल त्यांच्या उपयोगीं पडावी या हेतूनें दिली आहे. ही सुमारें २/३ आहे, बाकीची दु० भागांत पाहावी.


A Rational Refutation of Hindu Philosophy—N.Goreh.

Essays on the Religiou of the Hindus—H. H. Wilson.

Muir's Sanskrit Texts.

Indian Wisdom.—Sir Monier Williams.

Hinduism.—Sir M. Williams.

Indian Epic Poetry.—Sir M. Williams.

Wheeler's History of India.

History of the Sect of the Maharajas.

Indian Caste.—Rev. John Wilson, D. D.

Bombay Gazetteer.

Christianity and Hiuduism.

Dialogues on the Hindu Philosophy.—Revd. K. M. Banerjea, L. L. D.

Sanskrit Dictionary.—Sir M. Williams.

A Manual of Hindu Pantheism.—Col. G. A; Jacob.

History of Ancient Sanskrit Literature.—Prof. Max Muller.

Religious Thoughts and Life in India.—Sir Monier Williams.

Journal of the Bombay Branch of the R. A. Society. (Several volumes).

Hinduism, Past ond Present.—Revd. J. Murray Mitc hell, M. A., L. L. D.

Aitarya Brahman.—Dr. M. Haug,

Bhagwad Gita.—Hon. Justice Telang.

Anugita.—Hon. Justice Telang,

Bhagwad Gita.—J. C. Thomson.

Notices of Sanskrit Budhistical Works.—Dr. Rajendralal Mitra,

Parsi, Jain, and Sikh.—D. M. Thornton, B. A.

